दादा भगवान प्ररूपित

# आप्तवाणी

## श्रेणी - 6


मूळ गुजराती संकलन : डॉ. नीरूबहन अमीन

मराठी अनुवाद : महात्मागण

# त्रिमंत्र







नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो उवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं

पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥

ॐ नमः शिवाय ॥ ३ ॥

जय सच्चिदानंद



## दादा भगवान कोण?

जून 1958 संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्भुत आश्चर्य! एका तासात त्यांना विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवित आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षुनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्भुत ज्ञान प्रयोगाद्वारे! त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोकाचे' नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! मी स्वत: भगवान नाही. माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

## आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

परम पूज्य दादा भगवान (दादाश्री) यांना 1958 मध्ये आत्मज्ञान प्रकट झाले. त्यानंतर 1962 ते 1988 पर्यंत देश-विदेश परिभ्रमण करून मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत.

दादाश्रींनी आपल्या हयातीतच आत्मज्ञानी पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरूमा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञान प्राप्ती निमित्त भावाने करवित असत.

आत्मज्ञानी पूज्य दीपकभाई देसाई यांना सुद्धा दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. वर्तमानात पूज्य नीरूमांच्या आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात निमित्तभावाने आत्मज्ञान प्राप्ती करवित आहेत.

या आत्मज्ञान प्राप्तीनंतर हजारो मुमुक्षु संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळत असताना सुद्धा आतून मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव घेत आहेत.

# समर्पण

अनादी काळापासून

आत्मसुखाच्या शोधात गुंतलेले,

अतृप्तीच्या तापात,

या कळीकाळातही

दिग्मूढ होऊन तप्त हृदयाने भटकणाऱ्या

मुक्तीगामी जीवांना

परम मार्गावर पोहोचविण्यासाठी,

रात्रंदिवस झुंजणारे,

कारुण्यमूर्ती श्री 'दादा भगवान' यांच्या

विश्व कल्याणक यज्ञात

परम ऋणीय भावाने

समर्पित.

# निवेदन

ज्ञानी पुरुष संपूज्य दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहारज्ञाना संबंधीत जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केले जात आहे. विभिन्न विषायांवर निघालेल्या सरस्वतीचे अद्‌भुत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे नवीन वाचकांसाठी वरदान रूप सिद्ध होईल.

प्रस्तुत अनुवादामध्ये विशेष लक्ष ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला दादाश्रींची प्रत्यक्ष वाणीच ऐकली जात आहे असा अनुभव व्हावा. याच कारणाने कदाचित काही ठिकाणी अनुवादाची वाक्य रचना मराठी व्याकरणानुसार त्रूटीपूर्ण जाणवेल, परंतु तिथे जर आशय समजून वाचण्यात आले तर अधिक लाभदायी होईल.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत. दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही शब्द जसेच्या तसेच *इटालिक्स* मध्ये ठेवलेले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठी भाषेत असे शब्द नाहीत की जे त्याचा पूर्ण अर्थ देऊ शकतील. तरी पण त्या शब्दांचे समानर्थी शब्द कंसात तसेच पुस्तकाच्या शेवटी पण लिहिले गेले आहेत.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे. अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.



# संपादकीय

आप्तवाणी-श्रेणी 6, ही तर एका अद्भुत प्रतिभेने संपन्न आहे. एका बाजूला व्यवहारात क्षणोक्षणी येणाऱ्या समस्या आणि दुसऱ्या बाजूला स्वत:शीच झुंझणारा एकटा, स्वत: ! या दोघांच्या रस्सीखेचीत रात्रं-दिवस उत्पन्न होणाऱ्या संघर्षावर उपाय स्वत:लाच कसे सापडणार! कोण सांगेल ते उपाय? तो संघर्षच आतमध्ये कुरतडत राहतो आणि गाडी यार्डातच फिरत राहते.

जो कोणी आपल्या संघर्षाचा हिशोब घेऊन दादाश्रींकडे येतो, त्याला दादाश्री अशी कडी दाखवतात की त्यामुळे त्या व्यक्तीला संघर्षातून संधी प्राप्त होते!

शब्दांद्वारे, सत्संग करून, सेवा करून जसे आहे तसे ज्ञान प्राप्त करणे शक्य नसते. ज्ञानींच्या अंतरआशयाला समजणारी दृष्टी विकसित केल्यानंतरच ज्ञान साध्य करता येते आणि ती प्रत्येकाची वेगळीच अभिव्यक्ती - अनुभूती असते.

या वीतराग पुरुषांना यथार्थपणे ओळखायचे आहे. त्यांना कशा प्रकारे ओळखता येईल? आजपर्यंत अशी कोणतीच दृष्टी, अशी कोणतीच मोजपट्टी मिळाली नव्हती की जिच्याद्वारे त्यांना मापता (ओळखता) येईल. ती दृष्टी तर पूर्वजन्माच्या कमाईच्या रूपात, आत्म्यावर असलेल्या अनंत आवरणातील एखादे आवरण संपूर्णपणे दूर करून, अंतरसूझच्या निर्मळ किरणांद्वारे प्राप्त होऊ शकते आणि त्यामुळे ज्ञानींची पारदर्शकता समजता येते. अशी निर्मळ दृष्टी आपल्याजवळ आहे का? दृष्टी निर्मळ कशा प्रकारे होईल? आजदिवसापर्यंत जन्मोजन्मी 'वीतराग दशेची प्राप्ती करून देणारे ज्ञानी पुरुष मिळवायचेच आहेत. त्या व्यतिरिक्त दुसरी कुठलीच कामना आता नाही.' अशी भावना केली असेल, तरच ज्ञानींच्या अंगुलीनिर्देशाने ज्ञान बीजाचा चंद्र त्याच्या दृष्टीत उमलू शकतो.

जिथे पुण्य किंवा पाप नाही, जिथे पवित्रता किंवा अपवित्रता नाही, जिथे कोणतेच द्वंद्व नाही, जिथे आत्मा संपूर्ण शुद्ध रूपात प्रकाशित झाला आहे, अशा ज्ञानींना एखादे विशेषण दिले तर स्वत:च स्वत:ला

आपण गुन्हेगार आहोत असे वाटते. ज्यांनी निर्विशेषपद प्राप्त केले आहे, त्यांना विशेषणाने नावाजणे म्हणजे सूर्यप्रकाशाला मेणबत्तीने अलंकृत करण्यासारखे आहे आणि तरीही त्याला आपण ज्ञानींचे काय उत्तम वर्णन केले असा अहंकार वाटतो! याला काय म्हणणार? काय करणार?

ज्ञानींची प्रत्येक गोष्ट मौलिक असते. त्यांच्या वाणीत कुठेही कोणत्याच शास्त्राची छाप नसते, अन्य उपदेशकांची सावली पण नसते किंवा एखाद्या अवतारी व्यक्तीची भाषा पण नसते. त्यांची उदाहरणे-उपमा पण मौलिक असतात आणि त्यांच्या सहज स्फूर्तीत विनोदात पण चोख मार्मिकता आणि मौलिकता पाहायला मिळते. इथे प्रत्येक व्यक्तीला स्वत:च्याच भाषेत स्वत:च स्वत:चा गुंता सोडवत आहे असा स्पष्ट अनुभव येतो!

अनुभवज्ञान तर ज्ञानींच्या हृदयात सामावलेले आहे. ते ज्ञान प्राप्त करण्यासाठी तर जेव्हा एखादी तृषातुर व्यक्ती, ज्ञानींच्या हृदयरूपी विहीरीत संपूर्ण समर्पणाने आपला घडा बुडवील, तेव्हाच त्याला परमतृप्तीचा अनुभव मिळेल.

ज्ञानींची ज्ञानवाणी, अनुभवात येणारे त्यांचे कथन आणि स्वत:च्या चुकांसाठी समोरून मिळणाऱ्या हृदयगम्य चाव्या, की ज्या सहज कोणाला मिळतील अशा नाहीत. शिशु सहज निखालसता आणि निर्दोषता स्वत:च पुढे येऊन, त्यांच्या ज्ञानी पदाची ओळख करून देते.

ज्ञानींच्या एकाएका शब्दाने मनाचे अंगण मोहरून जाते.

जो जो कोणी ज्ञानींजवळ स्वत:ची अंतरव्यथा घेऊन गेला, ज्ञानी त्याची अंतरव्यथा त्याचक्षणी जशीच्या तशी समजून जातात आणि त्याला इतक्या सहजपणे शांत करतात की क्षणभरात त्या व्यक्तीला वाटते अहाहा! बस, फक्त इतकाच दृष्टीभेद होता? असे बाहेर बघत बसण्याऐवजी दृष्टी 180 डिग्री वळविली असती तर केव्हाच उत्तर सापडले असते! पण 180 डिग्रीच काय, स्वत: स्वत:हून 1 डिग्रीसुद्धा कसा वळेल? हे तर फक्त सर्वदर्शी ज्ञानींचेच काम आहे.

जिथे आत्मविज्ञान संपूर्णपणे प्रकट झाले आहे, जिथे आपला अनंतकाळापासून चालू असलेला 'आत्म्याचा शोध' याचा अंत येतो, तिथे अशी संधी गमावून पुन्हा एकदा अनंत जन्मांची भटकंती भोगणे हे कोणाला आवडेल?

फक्त आत्मविज्ञानच नाही, तर त्याचबरोबर इथे प्रकृतीचे विज्ञान पण प्रकट झाले आहे. असे पूर्वी कधीच घडलेले नाही, याचा अनुभव इथे मिळतो. तर मग इथे त्याचा पूर्णपणे लाभ मिळवून पुरुष आणि प्रकृती यांच्यातील एक्झॅक्ट भेदांकन करून, प्रकृतीच्या जाळ्यातून का बरे सुटू नये? या प्रकृतीच्या दबावात कधीपर्यंत दबून राहायचे? प्रकृतीपलीकडे जाण्याचे विज्ञान इतके जवळच आहे, तर मग आपल्या प्रकृतीचे वर्णन ज्ञानी पुरुषांसमोर का ठेवू नये? ज्याला सुटायचेच आहे, त्याने प्रकृतीच्या विकृतीचे समर्थन का करत राहावे?

ज्ञानींना पूर्णपणे केव्हा ओळखता येईल?

जेव्हा ज्ञानींचे 'ज्ञान' जसे आहे तसे, पूर्णपणे समजून येईल तेव्हा! तेव्हा तर ओळखणारा कदाचित स्वतःच तद्रूप होऊन गेलेला असेल!

असे ज्ञान धारण करणाऱ्या ज्ञानींना जेव्हा जग ओळखेल, त्यांना प्राप्त करेल आणि त्यांच्या अहोभावात रममाण होईल, तेव्हा संसाराचे स्वरूप संपूर्ण समजून येईल आणि मग त्यापासून असंगतता अनुभवेल.

वीतरागींच्या वाणीच्या विशालतेला कागदाच्या सीमेत बांधताना उद्‌भवणाऱ्या क्षती ह्या फक्त संकलनाच्याच आहेत, त्याबद्दल क्षमाप्रार्थना!

**- डॉ. नीरूबहन अमीन यांचे जय सच्चिदानंद**

# उपोद्घात

निसर्ग काय म्हणतो की मी तुला जे जे काही देतो ते सर्व तुझ्याच बुद्धीच्या आशयानुसार आहे. मग तरी तू त्यात अरेरे, हाय, हाय असे का करतोस? जे मिळाले आहे ते सुखाने उपभोग ना! बुद्धीच्या आशयात 'कशी पण असली तरी चालेल, पण बायको तर हवी, बायकोशिवाय चालणार नाही.' असे असेल तर त्याला मग कशी पण बायकोच मिळेल. मग आज एखादी परस्त्री बघून स्वत:ला अपूर्ण वाटते, पण तरी संतोष तर स्वत:च्या बायकोबद्दलच वाटतो. मग त्यात तू कितीही गोंधळ घातलास तरी तुझे काहीही चालणार नाही. म्हणून समजून जा ना! समभावाने निकाल करून टाक ना! कलह केल्याने तर नवीन प्रतिष्ठा उत्पन्न होत राहील. आणि त्यामुळे मग संसाराचा कधीच अंत येणार नाही. या संसाराच्या भटकंतीमुळे हरला-थकला. तेव्हा शेवटी त्याला एका गोष्टीचा निश्चय पक्का होतो की आता सुटका झाली तर बरे होईल! तेव्हा त्याला ज्ञानी पुरुष अवश्य भेटतातच. मग त्यांच्या कृपेने स्वत:च्या स्वरूपाचे भान होते आणि आत्मसुख चाखायला मिळते. मग तर त्याची दृष्टीच बदलते. मग ती दृष्टी स्वत:चे घर सोडून बाहेर भटकतच नाही. आणि परिणामी नवीन प्रतिष्ठा उत्पन्न होत नाही.

कोणाला फटकारले आणि जर मनात असे भाव केले की असे केल्याशिवाय हा सरळ होणारच नाही. तर मग 'फटकारायचे आहे' या कोडवर्डमुळे तशी वाणी चार्ज होते. त्याऐवजी फटकारणे हे चुकीचे आहे, असे होता कामा नये, असा भाव मनात ठेवला तर मग 'फटकारायचे आहे' हा कोडवर्ड लहान होतो आणि मग तसे चार्जिंग होते. आणि 'माझी वाणी कधी सुधारेल? कधी सुधारेल?' असे भाव सतत होत राहिले तर त्याचा कोडवर्ड बदलून जातो. आणि 'माझ्या वाणीने या जगातील कोणत्याही जीवाला किंचितमात्र पण दु:ख न होवो' अशा भावनेमुळे जे कोडवर्ड निर्माण होतात, त्यामुळे तीर्थंकरांच्या देशनेच्या वाणीचे चार्जिंग होते!

ह्या काळात वाणीच्या-शब्दांच्या घावामुळेच लोक रात्रंदिवस दु:खी होत आहेत. तिथे काठीचे घाव नसतात, समोरच्याचे वाक्बाण चालू असतात तेव्हा 'वाणी पर आहे आणि पराधीन आहे' हे ज्ञानी पुरुषांनी

दिलेले ज्ञान जर हजर राहिले तर मग त्या वाक्बाणांचे घाव पडतील का? समोरच्याला वाईट वाटेल असे शब्द जर स्वत:च्या तोंडातून बाहेर पडले, तर अशा वेळी प्रतिक्रमण हाच उपाय आहे आणि परिणामी समोरच्या व्यक्तीचेही सर्व प्रकारे सॉल्यूशन येईल.

या जगात प्रत्येक गोष्ट पॉझिटिव्ह (सकारात्मक) घ्यायला हवी. नेगेटिव्हकडे (नकारात्मकतेकडे) वळला तर स्वत: पण चुकीच्या दिशेने चालेल आणि समोरच्याला पण चुकीच्या दिशेने चालवेल.

व्यवहार म्हणजे कोड्यांचे संग्रहस्थानच आहे. एक कोडे सुटले की लगेच दुसरे कोडे आ वासून उभेच असते. जेव्हा स्वत: स्वत:ला ओळखेल तेव्हा जग संपुष्टात येईल. दुसऱ्यांच्या प्रश्नात गुंतण्यासाठी हे जग नाही. स्वत:ला स्वत:ची सेफसाइड करून घेण्यासाठी हे जग आहे.

जोपर्यंत स्वत:ची बिलीफ (मान्यता) अशी असेल की 'माझ्यामुळे समोरच्याला दु:ख होते.' तोपर्यंत त्या मान्यतेच्या स्पंदनांमुळे समोरच्याला दु:ख होईलच. आणि असे जे दिसते ते स्वत:च्याच सेन्सिटिवनेस (भावनाशीलता) या गुणामुळे आहे. हा एक प्रकारचा अहंकारच आहे. तो अहंकार असेल, तोपर्यंत समोरच्याला दु:ख होईलच. तो अहंकार जेव्हा संपेल, तेव्हा कोणालाच आपल्यामुळे दु:ख उत्पन्न होणार नाही. आपण चोख (शुद्ध) झालो तर जग चोखच आहे.

ज्या मार्गाद्वारे ज्ञानी सर्व परिणामातून मुक्त झाले, तो त्यांनी जाणलेला, पाहिलेला आणि अनुभवलेला मार्गच या जगातून सुटण्यासाठी ते आपल्याला दाखवितात.

आलेल्या वेदनांपासून मुक्त होण्यासाठी दुसऱ्या मनोरंजन करणाऱ्या पर्यायांचा अवलंब करून जग दु:खमुक्त होण्याचा प्रयत्न करते आणि नवीन धोका ओढवून घेते. ज्ञानी या प्रकाराने आत्मवीर्य खर्च करत नाहीत. ते तर 'समभावाने निकाल' करतात.

'ज्ञानी पुरुषां'ना कोणी कितीही शिव्या दिल्या तरी ज्ञानी त्यांना म्हणतात, 'काही हरकत नाही, तू येथे येत रहा. एक दिवस तुझे निराकरण होईल (आत्मकल्याण होईल).' किती अद्भुत ही करुणा आणि समता!

या जगात एक क्षणभरही अन्याय झालेला नाही. जगातील कोर्टात अन्याय होतो. फाशी देतात तो पण न्याय आणि निर्दोष सोडतात तो पण न्याय. म्हणून या जगात शंका करण्यासारखे काहीच नाही. या जगात असा कोणीही जन्माला आला नाही की जो तुमचे नावही घेईल. आणि जर कोणी असा असेल तर लाखो उपाय केले तरी पण काहीही निष्पन्न होणार नाही. म्हणून बाकी सर्व गोष्टी एका बाजूला ठेवून आत्म्याकडे वळा.

कोणत्या ज्ञानाच्या आधारावर कोणावर शंका घेणार? डोळ्यांनी पाहिलेले देखील खोटे ठरत नाही का? शंकेचे समाधान कधीच होऊ शकत नाही. खऱ्या गोष्टींचे समाधान असते. जिथे शंका वाटत नाही, तिथेच शंका (वाटण्यासारखी स्थिती) असते. जिथे विश्वास ठेवतो तिथेच शंका असते. परंतु जिथे शंका असते, तिथे काहीच नसते. खोलीत साप येताना पाहिला आणि ते ज्ञान झाले, तर जोपर्यंत साप बाहेर निघून गेल्याचे ज्ञान होत नाही तोपर्यंत शंका जाणार नाही. नाहीतर ज्ञानी पुरुषांच्या विज्ञानाच्या आधाराने तो नि:शंक होईल.

जे जे काही आठवते, याचा अर्थ त्याची तुमच्याबद्दल तक्रार आहे. म्हणून तिथे सतत प्रतिक्रमणे करून करून चोख (स्वच्छ) करावे लागेल.

तुम्ही दुसऱ्यांना दु:ख दिले, ते इथे दु:खात होरपळत राहतील आणि तुम्ही मोक्षाला जाल, हे कसे काय शक्य आहे? जो स्वत: दु:खी आहे, तोच दुसऱ्याला दु:ख देतो. आणि दु:खी मनुष्य मोक्षाला कसा जाईल? म्हणून उठा, जागे व्हा आणि निश्चय करा की 'आजपासून या जगातील कोणत्याही जीवाला किंचितमात्र दु:ख द्यायचे नाही.' मग तुम्हाला समोरून मोक्ष तुमच्याकडे येताना दिसेल. समोरचा दु:ख देतो ते तुम्ही पाहायचे नाही, त्याला पूर्ण मोकळीक आहे. त्याचे स्वातंत्र्य तुम्ही कसे हिरावून घेऊ शकता?

एका बाजूने तुम्हाला विश्वकोर्टातून निर्दोष सुटका हवी आहे आणि दुसऱ्या बाजूने तुम्ही 'याने मला असे का केले? असे का बोलला?' अशा तक्रारी करत राहिलात तर मग कसे सुटता येईल? आणि चुकून जर तक्रार केली गेली तर ती परत घ्या. प्रतिक्रमण करूनच तसे करा.

पत्नीबरोबरचा व्यवहार तिच्यात परमात्मा बघून पूर्ण करावा, साधु–

संन्यासी बनून नव्हे. व्यवहार, व्यवहारात असतो, त्यात शुद्ध स्वरूप पाहणे म्हणजेच शुद्ध उपयोग.

तुम्ही करत असलेल्या अनेक चुका ज्ञानींच्या दृष्टीत येत नसतील का? येतातच. पण ज्ञानींचा उपयोग तुमच्या शुद्धात्म्याकडे असतो, त्यामुळे त्यांना राग-द्वेष असे परिणाम उत्पन्नच होत नाहीत.

आपले परिणाम बदलतात, म्हणूनच समोरच्याचे परिणाम पण बिघडतात. ज्ञानींचे परिणाम कुठल्याही संयोगात बदलत नाहीत.

समोरच्याला सुधारायचे असेल, तर समोरचा कितीही दुःख देवो, तरी पण त्याच्याबद्दल एक पण उलट विचार आला नाही तर तो सुधारेलच. हाच एकमेव मार्ग आहे सुधारण्याचा, आणि त्याचा परिणाम म्हणून समोरची व्यक्ती सुधारेल.

समोरच्याला 'ही तुझी चूक आहे' असे सरळ तोंडावर सांगितले तर तो ती स्वीकारणार नाही. उलट ती चूक झाकण्याचा प्रयत्न करील. त्याला जर सांगितले 'तू असे कर' तर तो निश्चितच काही वेगळे करणार! याउलट जर त्याला असे सांगितले 'असे वागण्याने तुला काय फायदा होणार?' तर मग तो स्वतःच तसे करणे सोडील.

तिरडी निघताना सोबत कोण येतो? वाहत्या पाण्यातील कोणत्या बुडबुड्याला पकडून ठेवता येते? कोण कोणाची साथ देतो?

ज्याच्यासाठी संघर्षण होत आहे ती गोष्ट स्वतःची आहे की परकी याचे भानच नाही. हे सर्व मी करत आहे का कोणी माझ्याकडून करवून घेत आहे? देहाच्या किमतीवर देखील संघर्ष तर होताच कामा नये. आतमध्ये भाव बिघडले, अभाव झाला किंवा जरासे डोळे वटारले, तर तीच संघर्षाची सुरुवात आहे. तुमच्याशी कोणी संघर्ष (वाद-भांडण) करील पण स्वतः मात्र कोणाशी संघर्ष केला नाही तर अशा घर्षण होण्याच्या संयोगात घर्षण होणे थांबते, शिवाय आणि 'कॉमनसेन्स' ही प्रकट होतो, नाहीतर अजागृतीमुळे त्याच घर्षणातून आत्म्याच्या अनंत शक्तींवर आवरणे येतात. संसारात सुरक्षितताही हवी आहे आणि मोक्षाचा मार्ग पण पूर्ण करायचा आहे, मग घर्षणाला 'स्कोप' (वाव) का द्यावा?

ज्या ज्ञानामुळे ज्ञानी जगज्जेते झाले आहेत, ते ज्ञान जर कधी ऐकले असेल तर उपयोग होईल. शेवटी तर जगज्जेतेच बनायचे आहे ना!

जगात तुम्ही सर्वांना आवडलात तरच काम होईल. जगाला जर तुम्ही आवडत नसाल, तर ती कोणाची चूक? तुमच्याबरोबर समोरच्या व्यक्तीचे मतभेद झाले तर ती तुमची चूक आहे. ज्ञानी तर बुद्धीकला आणि ज्ञानकला वापरून मतभेद होण्यापूर्वीच ते टाळतात.

'माझे स्वरूप शुद्धात्मा आहे' असे भान आल्यावर 'अनुकूल-प्रतिकूल' अशी द्वंद्वे राहत नाहीत. जोपर्यंत 'स्वत:' विनाशी स्वरूपात राहत होता, तोपर्यंत 'अनुकूल-प्रतिकूल' असे वाटत असे, आणि तो निव्वळ संसारच आहे. जोपर्यंत 'गोड', 'गोड' लागते, तोपर्यंतच 'कडू', 'कडू' लागते. 'गोडा'चे वेदन केले नाही तर 'कडू'पणातही वेदन राहत नाही. 'गोडा'त जाणपण राहिले तर 'कडू'पणातही जाणपण सहजच राहील. पण इथे तर पूर्वीपासून 'गोड' उपभोगण्याच्या सवयी पडल्या आहेत, म्हणून तर 'कडू' काळजाला घरे पाडतो.

अनुकूल परिस्थितीत उत्पन्न होणारे कषाय गारवा देतात, गोड वाटतात. ते राग कषाय - लोभ आणि कपटवाले कषाय असतात, त्यांच्या गाठी तुटत नाहीत. ते कषाय रस गारवतेत बुडवितात आणि अनंत जन्म भटकवतात.

जो दान देतो, त्याला लोक कौतुकाचे जेवण भरवल्याशिवाय राहत नाहीत. कौतुकाची हाव असणारा तर लोकांनी फेकलेले कौतुकाचे तुकडे धुळीतून पण वेचून वेचून खातो. याउलट ज्ञानींना 32 पक्वान्नांचे जेवण वाढले तरी ते, ते जेवण स्वीकारत नाहीत. मग रोग घुसण्याचा प्रश्न येतोच कुठे?

कुठलेही काम केले, तर त्या कामाला किंमत (महत्त्व) नाही. पण त्यात जर राग-द्वेष झाले तर त्यातून पुढचा जन्म उत्पन्न होतो. आणि राग-द्वेष झाले नाहीत तर मग पुढच्या जन्माची जबाबदारी राहत नाही.

जेव्हा दुसऱ्यांचा एकही दोष दिसणार नाही आणि स्वत:चा एकेक दोष दिसेल, तेव्हाच मुक्त होता येईल. 'स्वत:च्याच दोषांमुळे मी बांधलो

गेलेलो आहे' अशी दृष्टी जेव्हा उत्पन्न होईल तेव्हा समोरच्याचे दोष दिसणे बंद होईल. म्हणून फक्त दृष्टीच बदलायची आहे. प्रत्येक जण आपापल्या कर्माधीन भटकत आहे, त्यात त्याचा काय दोष? व्यवहार काही समोरच्याचे दोष पाहा असे म्हणत नाही. 'ज्ञानी पुरुष' देखील व्यवहारात राहातातच ना? तरी पण ते सतत जगाला निर्दोष रूपातच न्याहाळत असतात ना!

चोर चोरी करतो, ते त्याच्या उदयकर्मामुळे. त्यात त्याला चोर म्हणण्याचा आपल्याला काय अधिकार आहे? चोरात जर परमात्मा पाहिला तर चोर गुन्हेगार दिसणार नाही. महावीर भगवंतांनी संपूर्ण जग निर्दोष पाहिले. तर ह्या दृष्टीमुळेच निर्दोष पाहिले असेल ना?

भयंकर अपमानाच्या कर्मोदयात अंत:करण जेव्हा तापून लालेलाल होते तेव्हा त्या तपाला शेवटपर्यंत तन्मयाकार न होता समतापूर्वक 'पाहत' राहिला तर ते तप त्याला मोक्षाला घेऊन जाईल!

ज्याचा कुणाला थांगपत्ता पण लागत नाही त्याला तप म्हणतात. आपले तप जर दुसऱ्यांना समजले, दुसऱ्यांनी आश्वासन दिले आणि आपण ते स्वीकारले तर, त्या तपातील 'कमिशन' दुसरे खाऊन जातील.

बाह्य संयोगाचा परिणाम अंत:करणात सर्वात प्रथम बुद्धीवर होतो. बुद्धीतून मग तो मनापर्यंत पोहोचतो. तो परिणाम जर बुद्धीनेच स्वीकारला नाही तर मग तो मनापर्यंत पोहोचणारच नाही. पण बुद्धी स्वीकारते, म्हणून मनापर्यंत पोहोचतो आणि मग मन खळबळ माजवते.

बुद्धीची ढवळाढवळ कशी बंद होईल? बुद्धीचे बखेडे ऐकणे बंद केले, तिचा अपमान केला, तर बुद्धी बंद होते. जर बुद्धीला मान दिलात, तिचे स्वीकारलेत, तिचा सल्ला मानलात तर मग बुद्धी फुल फॉर्मात चालेल!

ज्यामुळे आपल्या मनात वादळे उठली असतील, ती गोष्ट बंद करा. मनात वादळे उठली की प्रथम आतमधील स्वत:च्या सुखावर आवरण येते. मग असुख वाटते, नंतर दु:ख होते, आगआग होते, भीती वाटते आणि शेवटी काळजी उत्पन्न होते. परंतु जर तो अंकुरच उपटून फेकून दिला तर मग त्याचे झाड होणारच नाही.

स्वत:चे हित-अहित याचे भान राहिले नाही आणि त्यामुळे मनाचा हवा तसा उपयोग झाला आणि मनावरचा ताबा सुटला! अशा प्रकारे मनाची चंचलता वाढली तर त्यात कुणाचा दोष? जोपर्यंत अज्ञान आहे, तोपर्यंत मनावर अहंकाराचे नियंत्रण आहे आणि त्यामुळे मनावर ताबा राहत नाही. आत्मज्ञान झाल्यावर 'स्वत:'चे नियंत्रण येते, पुरुषार्थ प्रकट होतो आणि मन वश होते. (काबूत येते).

'पाहणे आणि जाणणे', या दोनही गोष्टी जर क्षणोक्षणी सोबतच असतील, तर परमानंदाखेरीज दुसरे काय असू शकते? स्वत:ला सगळेच समजते की मनात असे झाले, तसे झाले, आपल्याकडून असे बोलले गेले, असे आचरण झाले. पण आपण पद्धतशीर पाहत नाही की हे कोणाला झाले आणि आपण कोण आहोत? आणि म्हणूनच परमानंदाचा आस्वाद येत नाही.

स्वत:च्या बोलण्यामुळे 'कोणाकोणाचे, कशा प्रकारे प्रमाण दुखावले जात आहे' ते पाहणे, यालाच म्हणतात वाणीवरचा उपयोग.

आपली वाणी समोरच्याला का बोचते? वाणी तर शब्दरूपात असते ती काही बोचत नाही, पण त्याच्यामागे जो अहंकार आहे, त्याची धग लागते! 'माझे खरे आहे' हेच अहंकाराचे रक्षण. अहंकाराचे रक्षण करता कामा नये, अहंकार स्वत:च स्वत:चे रक्षण करणारा आहे!

एकाही शब्दाचा उपयोग थट्टा-मस्करी करण्यासाठी करता कामा नये. एकाही शब्दाचा उपयोग चुकीच्या स्वार्थासाठी किंवा लुटण्यासाठी करता कामा नये. जर शब्दांचा दुरुपयोग केला नसेल, मानाची चटणी खाण्यासाठी शब्दप्रयोग केला नसेल, तर वचनबळ उत्पन्न होते.

'याने माझे बिघडविले' असा थोडासा जरी भाव असेल तर त्याच्याबरोबर पूर्णपणे दु:ख देणाऱ्या वाणीचा व्यवहार उत्पन्न होतो. ज्याची वाणी सुधारली त्याचा संसार सुधारला. नाहीतर या जगात कोणाजवळही तुमचे काहीही बिघडवण्याची शक्ती नाहीच.

धमकावून समोरचा कधी पण वश होऊ शकत नाही. तो तर उघडउघड अहंकार आहे. जग निर्‌अहंकारीला नमस्कार करते!

आपले म्हणणे प्रत्येकाला 'फिट' होते (पटते), त्यालाच समजूतदारपणा म्हणतात. संघर्ष झाला म्हणजे गैरसमजेचे शेवाळ पसरले असे समजा. गैरसमज उत्पन्न होण्याचे मूळ कारण अहंकार आणि अहंकार भुतासारखा रात्रंदिवस छळत राहतो, बाह्य कुठलेही निमित्त नसेल तरी! याऐवजी 'मी काहीही जाणत नाही', असा भाव आला की मग झाले.

चांगले करवितो तो पण अहंकार, आणि वाईट करवितो तो पण अहंकार. चांगले करविणारा अहंकार, कधी वेडेपणा करील आणि वाईट करवून घेईल त्याचा काय भरवसा?

बुद्धी कमी असलेल्याला 'असे करू की नको करू?' या द्विधा अवस्थेत निर्णय घेता येत नाही, अशा संयोगात काय करायला हवे? आतून 'करायला हवे' असा जोर जास्त आहे की 'करू नको' असा जोर जास्त आहे ते पाहावे. जर 'करू नको' या बाजूने जोर जास्त असेल त्या पारड्यात बसावे. नंतर जर 'करायचे' असेल तर 'व्यवस्थित' त्याला तिकडे घेऊन जाईल?

घाई करणे हा सिंगल गुन्हा आहे आणि 'घाई न करणे' हा डबल गुन्हा आहे. म्हणून घाईने हळू चाला.

राग (मोह, आसक्ती) हा सिंगल गुन्हा आहे आणि निरागी बनणे हा डबल गुन्हा आहे. प्रापंचिक व्यवहारात 'मी आत्मा आहे, मला काय देणेघेणे?' असे म्हणून जर मुलाची फी भरली नाही, तर तो खूपच मोठा गुन्हा आहे. तिथे निःस्पृह व्हायचे नाही. वरकरणी राहून 'निकाल' करायचा आहे.

समोरच्याला खुश करावयाचे आहे, पण त्याच्याबद्दल राग (मोह-असक्ती) करायचा नाही. पोलिसवाल्याला राजी करताना तुम्हाला त्याच्याबद्दल राग होतो का?

घरात, व्यवसायात, किंवा इतर कुठेही कमीतकमी संघर्ष होईल अशा प्रकारे जो व्यवहार करतो, तो खरा बुद्धीशाली!

तुम्हाला कोणी घाबरतो त्यात तुमचा कसला मोठेपणा? तुमच्या

धमकावण्याने जर समोरच्या व्यक्तीत परिवर्तन होत असेल तर नुकसान पत्करून सुद्धा तुम्ही धमकावलेले उपयोगाचे.

जेव्हा तुमच्यात कपट शिल्लक राहणार नाही, तेव्हा तुमच्याबरोबर पण कोणी कपट करणार नाही. जग हे तुमचे स्वत:चेच प्रतिबिम्ब आहे, हा सर्व तुमचाच फोटो आहे. तुमच्या निष्कपट भावाचा प्रभावच समोरच्या व्यक्तीला कपटरहित करू शकतो.

'समोरच्याचे समाधान करणे ही आपलीच जबाबदारी आहे.' असे जेव्हा तुमच्यात एकदम 'फिट' होईल, तेव्हा मग इतर काही प्रयत्न न करता, स्वत:च्या सुझमुळे (समजुतीमुळे) एक ना एक दिवस समोरच्याचे समाधान होईलच होईल. स्वत:च बदलायचे आहे, समोरचा बदलेल अशी वाट पाहत 'क्यू'मध्ये (रांगेत) बसून राहायचे नाही.

स्वत: आज शुद्ध झाला आहे, अहंकाररहित झाला आहे, परंतु आजपर्यंतची मागील अहंकाराची प्रतिस्पंदने लोक एकाएकी कशी विसरतील? ती प्रतिस्पंदने तर राहणारच. जोपर्यंत प्रतिस्पंदने आपोआप थांबत नाहीत, तोपर्यंत वाट पाहत राहण्याखेरीज दुसरा कोणताच मार्ग नाही.

आरसा तर जो समोर येईल त्याचे प्रतिबिंब दाखवतो. असे, आरशासारखे 'क्लियर' (स्वच्छ) व्हायचे आहे. *'अटकण'* असल्यामुळे आरशासारखे क्लियरन्स होत नाही. म्हणून लोक तुमच्याप्रती आकर्षित होत नाहीत. एकदा आकर्षण होऊ लागले की मग त्याचे एक एक वाक्य ब्रह्मवाक्य होईल.

अरे, या *अटकणमुळे* आपली खरी गोष्ट पण लोकांना आवडत नाही. त्यामुळे मुक्त हास्य पण निघत नाही. आणि बोलण्यात पण तणाव असतो.

अनंत जन्म भटकावे का लागले? *अटकणमुळे*! आत्मसुख चाखलेच नाही, म्हणून विषयसुखाची *अटकण* पडली! 'ज्ञानी पुरुषां'ची कृपा आणि स्वत:चा जबरदस्त पराक्रम भाव, यामुळे *अटकण* तुटते. *अटकण* तुटली

की मग अनंत समाधिसुखे प्रकट होतात. आणि *अटकण* उपटून काढली नाही तर ती या ज्ञानालाही आणि ज्ञानींपासून तुम्हालाही उपटून वेगळे करील.

तुमच्यावर ज्याची छाया (प्रभाव) पडेल त्याचा रोग तुमच्यात आल्याशिवाय राहत नाही. समोरच्याचे जरी कितीही चांगले गुण दिसले तरी पण शेवटी ते प्राकृत गुणच आहेत ना? प्राकृत गुण विकृत झाल्याशिवाय राहतच नाहीत. सुंदर हापूस आंबा असेल, पण तो सडला की त्याचा दुर्गंध येतोच ना?

जिथे जिथे विषयसंबंधी आकर्षण उत्पन्न होते, तेव्हा तेव्हा त्याचे ताबडतोब प्रतिक्रमण व्हायला हवे. आणि त्या व्यक्तीच्या शुद्धात्म्याजवळ, मला या अब्रह्मचर्याच्या विषयातून मुक्त करा, अशी मागणी करा. स्त्री-पुरुषाच्या विषयातून वैर उत्पन्न होते आणि ते वैरच अनंत जन्म बिघडवून टाकते.

प्रतिक्रमणामुळे सर्व प्रथम स्वत:चे अतिक्रमण थांबते आणि चुकीचे भाव संपतात. समोरच्याला तर ते नंतर पोहोचते आणि पोहोचोत किंवा न पोहोचोत, ते तुम्ही पाहायचे नाही. हे सर्व तर आपल्या स्वत:साठीच आहे.

वाघाचे प्रतिक्रमण केले तर तो वाघ पण आपल्या सांगण्यानुसार वागेल. वाघात आणि माणसात काहीच फरक नाही. आपल्या स्पंदनातील फरकामुळे वाघावर त्यांचा परिणाम होतो. जोपर्यंत तुमच्या ध्यानात, मान्यतेत वाघ हिंसक आहे असे असेल, तोपर्यंत वाघ हिंसकच राहील, आणि वाघ 'शुद्धात्मा' आहे असे ध्यानात राहिले तर तो 'शुद्धात्मा'च आहे!

स्वत:च्या बाजूने छेडखानी बंद झाली, स्वत:ची स्पंदने थांबली तर समोरून कोणीच स्पंदन करणारा मिळणार नाही, आणि पूर्वीच्या सवयीमुळे जर स्पंदने फेकली गेली तर ती प्रतिक्रमणाने धुऊन टाका. तोच पुरुषार्थ आहे!

कर्मरूपी पाचर कशी मोडून काढावी? तर 'फाइलींचा समभावाने निकाल करून.' फाइल्स दिसताच आपण मनात ठरवले पाहिजे की 'मला

समभावाने निकाल करायचाच आहे.' असे ठरविलेत तर त्याप्रमाणे आपोआप सर्व प्रबंध होईल आणि कदाचित एखादी चिकट फाइल असेल, आणि तिथे जर असे करूनही निकाल करता आला नाही, तर मग तुम्ही गुन्हेगार नाही, 'व्यवस्थित' गुन्हेगार आहे.

चिकट फाइल, चिकट का आहे? तुम्ही स्वत:च ती चिकट केली आहे म्हणून. चिकट फाइलचा चिकटपणा पाहण्याऐवजी स्वत:च्या प्रकृतीचा चिकटपणा जेव्हा दिसेल तेव्हा त्या फाइलकडे पाहण्याची दृष्टीच बदलून जाईल!

स्वत:च्या प्रकृतीचा फोटो पुरुष झाल्यानंतरच निघू शकतो. अहंकाररूपी कॅमेरा कधी फोटो काढू शकतो का? त्यासाठी तर मौलिक कॅमेरा हवा.

जे गोंधळून जाते ते आपले मूळ स्वरूप नाही. 'हे माझे आहे' असे मानले जाते ती मान्यताच चुका करवते. प्रकृतीला फक्त पाहायचेच आहे. तिला 'चांगली-वाईट' म्हणायचे नाही. प्रकृती लाखो वेळा लेप चढवायचा प्रयत्न करील, तरीही स्वत:चे परमात्मस्वरूप लेपायमान होऊ शकत नाही. जगाचा कोणताही प्रयोग आत्म्याच्या शुद्धतेचे अशुद्धतेत रूपांतर करू शकत नाही, आणि तेच आपले मूळ स्वरूप आहे!

प्रकृतीचा हिशोब पूर्ण करण्यासाठी 'आपल्याला' काहीही करायची गरज नाही. ते हिशोब तर आपोआपच पूर्ण होत राहतात. 'आपण' फक्त 'पाहत' राहायचे की किती हिशोब अजून शिल्लक आहे!

प्रकृतीच्या सर्व त्रुटी आपोआप पूर्ण होतील, जर 'तुम्ही' त्यात ढवळाढवळ केली नाहीत तर! प्रकृती स्वत:च्या त्रुटी स्वत:च भरून काढते. त्यावेळी 'मी करतो' असे म्हटले जाते, त्यामुळे ढवळाढवळ होते.

हे 'अक्रम विज्ञान' सर्व जगाचे सायक्लॉन (चक्रीवादळ) संपवू शकेल असे आहे, मात्र आपण त्यात स्थिर राहिलो तर!

**- डॉ. नीरूबहन अमीन**

# अनुक्रमणिका

# आप्तवाणी

## श्रेणी - 6

## [ 1 ]

### प्रतिष्ठेचा पुतळा

'मी चंदुभाई आहे', 'हे मी केले, ते मी केले' अशी प्रतिष्ठा केली की ताबडतोब पुन्हा एक नवीन मूर्ती तयार होते आणि ती मूर्ती मग फळही देते. ज्याप्रकारे आपण दगडाच्या मूर्तीत प्रतिष्ठा करतो आणि मग ती फळ देऊ लागते, त्याचप्रमाणे आपण ही प्रतिष्ठा उत्पन्न करीत आहोत. ज्या रूपाची प्रतिष्ठा करतो त्याच रूपाचा 'प्रतिष्ठित आत्मा' बनतो. हा जुना 'प्रतिष्ठित आत्मा' नवीन प्रतिष्ठा निर्माण करतो. आज जो 'चंदुभाई' (चंदुभाईच्या जागी वाचकाने स्वतःचे नाव समजावे) आहे तो संपूर्णपणे जुना 'प्रतिष्ठित आत्मा' आहे. आणि तो परत (नवीन) प्रतिष्ठा करत राहतो की 'मी चंदुभाई आहे, मी ह्याचा मामा आहे, ह्याचा काका आहे' अशी सगळी प्रतिष्ठा करतो, म्हणजे असे चालतच राहते. आणि 'मी शुद्धात्मा आहे' असे म्हटल्यावर आता प्रतिष्ठा बंद झाली. म्हणून आम्ही म्हणतो की शुद्धात्मापद प्राप्त झाल्यानंतर कर्मबंधने उत्पन्न होणे बंद होते.

**प्रश्नकर्ता :** असे स्पष्ट विवरण कोणीही केलेले नाही.

**दादाश्री :** विवरण होईल तरच प्रश्न सुटेल. आत्मज्ञान असायला हवे. पण आत्मज्ञान नाही, ते असेल तर ते आरपार दाखवू शकतील. म्हणून आम्ही 'प्रतिष्ठित आत्मा' (हा शब्द) दिला. आजपर्यंत तो कोणीही दिलेला नाही!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे तो प्रतिष्ठेनुसार सर्व क्रिया करत राहतो, कामे करत राहतो?

**दादाश्री :** हो, आणि तेही जशी प्रतिष्ठा केली असेल तशी. जशी मूर्तीत प्रतिष्ठा करतात आणि मग ती मूर्ती फळ देत राहते, तसेच हा प्रतिष्ठा करतो आणि तिच्या फळस्वरूप मुले अभ्यास वगैरे सर्व करतात, पहिल्या नंबराने पासही होतात.

## बुद्धीचा आशय

**प्रश्नकर्ता :** मग यात स्वतःचा काहीच पुरुषार्थ नाही?

**दादाश्री :** नाही, तो स्वतः प्रतिष्ठा करत जातो आणि मूर्ती बनत जाते आणि मग त्याच्या बुद्धीच्या आशयानुसार त्याचे 'फिटिंग' होत जाते, बुद्धीच्या आशयात काय आहे? तर त्याला वाटते की मला तर फक्त शिक्षणातच पुढे जायचे आहे, असा जर बुद्धीचा आशय असेल तर तसेच फळ मिळेल. जर कोणाला असे वाटत असेल की मला भक्तीत पुढे जायचे आहे, तर तसे फळ मिळेल.

जर बुद्धीच्या आशयात असे असेल की 'मला झोपडीत राहणेच आवडेल' तर मग करोडपती असेल तरी त्याला झोपडीशिवाय करमणारच नाही आणि जर कोणाला 'बंगल्याशिवाय मला जमणारच नाही', असे असेल तर त्याला पाच कोटीची उधारी जरी असेल तरी पण बंगल्यातच राहणे आवडेल. आणि या बिचाऱ्या भक्तांना वाटते की मला तर जसे असेल तसे चालेल, तर मग त्यांना जसे असेल तसे, पण सर्वकाही मिळते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे तिथे 'भाव' काम करतात?

**दादाश्री :** नाही. तो बुद्धीचा आशय आहे. भाव करावे लागत नाहीत. बुद्धीच्या आशयानुसारच आत सर्व 'सेटलमेंट' (मांडणी) झालेली असते. स्वतः प्रतिष्ठा करून पुतळा तयार करतो आणि मग बुद्धीच्या आशयानुसार 'सेटलमेंट' होते.

**प्रश्नकर्ता :** बंगल्याशिवाय जमणारच नाही, याला तुम्ही बुद्धीचा आशय म्हणता, तर मग त्यात प्रतिष्ठा कोणती?

**दादाश्री :** प्रतिष्ठा तर तुम्ही स्वतःहून करता की 'मी चंदुभाई आहे, हे मी केले, मी याचा सासरा आहे, याचा मामा आहे', असे म्हणत म्हणत पुतळा तयार करता. मग कोणकोणते भाव होतात? तर 'बुद्धीच्या आशयाप्रमाणे सर्व चित्रीकरण होते. बुद्धीच्या आशयानंतर आतमध्ये बदल होत राहतो.'

**प्रश्नकर्ता :** प्रतिष्ठा कोण करतो?

**दादाश्री :** तो अहंकार करतो की, 'हा मी आहे, मी चंदुभाई आहे, हा माझा काका आहे, मामा आहे.'

**प्रश्नकर्ता :** कोणी दारू पितो, पूजा करतो, ते काय असते?

**दादाश्री :** दारू पितो. ते तर त्याने आतमध्ये असे भाव केलेले असतात की 'दारूशिवाय मला चालणारच नाही.' त्यामुळे तो दारू पितो आणि मग ती सुटत नाही. म्हणजेच तो प्रतिष्ठा करत नाही, पण बोलते वेळी बुद्धीचा आशय तसा असतो, म्हणून आतमध्ये 'प्रिन्ट' होते. 'बुद्धीचा आशय' नीट समजून घेणे खूप जरूरी आहे. इथे आपल्यासाठी तर हे दोन्हीही संपतात. इथे तर प्रतिष्ठा होणेच बंद होते.

**प्रश्नकर्ता :** बुद्धीचा आशय म्हणजे नेमके काय हे जरा नीट समजावून सांगा ना, दादाजी!

**दादाश्री :** बुद्धीचा आशय म्हणजे बस, 'मला चोरी करूनच चालवायचे आहे, काळाबाजार करूनच चालवायचे आहे.' तर कोणी म्हणेल, 'मी कधीच चोरी करणार नाही.' कोणी म्हणेल 'मला या प्रकारे उपभोग घ्यायचा आहे', की मग उपभोगण्यासाठी (निसर्ग) त्याला एकांताची जागा पण तयार करून देतो. आणि त्यात पाप-पुण्यही काम करतात. जे जे काही भोगायची इच्छा केली असेल ते सर्वच त्याला मिळत जाते. विश्वासही बसणार नाही असे सर्वही त्याला मिळते. कारण

ते सर्व त्याच्या बुद्धीच्या आशयात होते. आणि जर पुण्य असेल तर त्याला कोणी पकडू पण शकणार नाही. अगदी कितीही पहारे लावलेले असोत तरीही! आणि पुण्य जेव्हा संपते तेव्हा मग तो असा सहजच पकडला जातो. अगदी छोटा मुलगा पण त्याला शोधून काढतो की 'इथे काहीतरी घोटाळा आहे.'

## बुद्धीचा आशय आणि भाव

**प्रश्नकर्ता :** म्हणजे हे जे उपभोगण्याचे ठरवतो, त्यात बुद्धीचा आशय काम करतो का?

**दादाश्री :** हो, बुद्धीच्या आशयाप्रमाणे काम करतो! जगात जे नसेल असे देखील भोगावे लागते, जर भोगण्याचा भाव केला असेल तर! आणि तेव्हा तसे मंजूर पण होते, कारण बुद्धीच्या आशयाला पुण्याचा आधारही आहे.

म्हणून 'मी हा असा आहे, हे माझे आहे' अशा प्रतिष्ठेने पूर्ण जन्माचे हे शरीर, ही मूर्ती उत्पन्न होते आणि भाव करत असताना बुद्धीचा आशय कसा होता, कशा कशात होता. ते सगळे छापले जाते. प्रत्येकाकडे बुद्धीचा आशय असतो.

**प्रश्नकर्ता :** बुद्धीचा आशय तर सतत बदलत असतो ना?

**दादाश्री :** हो, बुद्धीचा आशय सतत बदलत जातो आणि त्यानुसार तिथे सर्व छापले जाते.

**प्रश्नकर्ता :** भाव आणि बुद्धीचा आशय यात काय फरक आहे?

**दादाश्री :** भाव तर लोकांना अशी काचा बसवतो. त्यामुळे मग त्याचे डोळे खूप चांगले असले तरी पण त्याला जे दिसते त्याला भाव म्हणतात आणि तो त्या भावानुसार वागतो. म्हणून मग त्यातून हा सारा संसार उत्पन्न होतो!

**प्रश्नकर्ता :** काचेतून जे दिसते ते भाव आहेत, तर काच म्हणजेच द्रव्यकर्म का?

**दादाश्री :** हो, जी काच आहे, ते द्रव्यकर्म आहे. तुम्हाला ज्या काचा बसवलेल्या आहेत, त्या प्रत्येकाच्या वेगवेगळ्या असतात. प्रत्येकाचे द्रव्यकर्म वेगवेगळे असते. लोक समजतात की जे दिसले, जसे दिसले, ते भावकर्म आहे. आणि त्या भावकर्माचे जे फळ आले त्याला लोक द्रव्यकर्म म्हणतात. भावकर्मामुळे हा क्रोधी झाला पण त्याला ते द्रव्यकर्म म्हणतात. 'द्रव्यकर्म म्हणजे काय?' ते नीट समजून घेतले पाहिजे. आणि बुद्धीचा आशय, ही तर वेगळी गोष्ट आहे.

**प्रश्नकर्ता :** पण बुद्धीचा आशय आणि भावकर्म, यात काय फरक आहे?

**दादाश्री:** भावकर्म सर्वांनाच होतात, पण बुद्धीचे आशय प्रत्येकाचे वेगवेगळे असतात. ते क्षेत्राच्या आधीन असतात. आणि ही काच, मग या काचेतून जे दिसते तो भाव, मग क्षेत्र आणि काळ याच्या आधारावर बुद्धीचा आशय असतो. प्रत्यक्षात काचेला इतके जास्त महत्त्व नाही. ही काच कशी निर्माण होते? तर या आयुष्यात जे काही केले, लोकांना सुख वाटेल अशी कामे केली असेल तर काचा पण तशाच निर्मळ असतात, आणि त्यामुळे त्याला सगळे चांगल्या प्रकारे दिसते. त्याला जास्त ठोकरा लागत नाहीत. आणि जर लोकांना दु:ख होईल अशी कामे केली असतील तर त्यांच्या काचा पण तितक्याच जास्त मळलेल्या असतात आणि त्यामुळे त्यांना दिवसाढवळ्या खरी वस्तू (जसे आहे तसे) दिसत नाही आणि त्यामुळे त्यांना खूप दु:ख सोसावे लागते. म्हणजेच काचेचा आधार तुम्ही कोणत्या क्रिया करता त्यावर आहे. संपूर्ण आयुष्य एकाच काचेवर काढायचे असते. मुळात काय आहे? तर ज्ञान स्वत:चेच आहे, पण त्या ज्ञानावर काच आहे. त्या काचेतून बघून सर्व काही चालवायचे असते. या बैलांच्या डोळ्यावर पट्टी बांधतात त्याप्रकारे हे बांधतात. आता त्यातून जर थोडेसे उघडले तर तेवढे त्याला दिसू लागते, आणि मग त्याप्रमाणे तो चिंता, उपाधी करत राहतो. स्वत:च्या आशयानुसार त्याला सर्व काही मिळत राहते. त्याला जर स्वत:चा आशय समजला तरी खूप झाले. बुद्धीचा आशय म्हणजे काय ते तुला समजले ना?

**प्रश्नकर्ता :** व्यवहार कसा असावा, हे जे ठरवले जाते, तो बुद्धीचा आशय आहे का?

**दादाश्री :** मला सुख कशात वाटेल? असे सतत शोधत राहतो. म्हणून मग तो विषयात सुख मानू लागतो. नंतर मग बंगला नसला तरी चालेल, मला तर एखादी झोपडी असेल तरी चालेल असा भाव करतो. म्हणून त्याला पुढच्या जन्मी झोपडी मिळते! प्रत्येकाला वेगवेगळ्या घरात राहायला आवडत असेल ना? रात्री त्यांना झोप लागत असेल ना?

**प्रश्नकर्ता :** हो, आवडते, चांगली झोप लागते.

**दादाश्री :** मला असे का? आणि त्याला तसे का? असे रात्रभर वाटत राहते का? नाही. त्याला संतोष का वाटतो? कारण 'मला तर माझ्या घरीच झोप लागते' असा बुद्धीचा आशय आहे. स्वतःचे घर, मग जरी झोपडी का असेना! आपण जर त्याला म्हटले, 'अरे, तुझी खाट तर इतकी सैल झाली आहे' तरी पण तो म्हणेल 'नाही, मला तर त्या खाटेवरच झोप येईल. ह्या बंगल्यात मला झोप लागणार नाही.' एखाद्या आदिवासीला जर रोजच खीर-पुरी खाऊ घातली तर ते त्याला जमणारच नाही. तो दोन-तीन दिवसातच कोणाला काही न सांगता तिथून गुपचूप निघून जाईल. त्याला वाटेल 'इथे कुठे मी अडकलो?'

काही लोक पैसा नसला तरी किंमती कपडे घालतात, याउलट काही लोक खूप पैसेवाले असतील तरी पण... हाच बुद्धीचा आशय.

वडील शिव्या देत असतील तरी पण त्याला तेच वडील आवडतात, आई शिव्या देत असेल तरी पण तीच आई आवडते. वडिलांना पण तोच मुलगा आवडतो. आयुष्यभर वडील मुलाशी बोलत नाहीत, पण मरताना मात्र सारे काही मुलालाच देतात. बघा, आयुष्यभर पुतण्याकडून सेवा करून घेतली, पण शेवटी दिले मात्र सगळे मुलाला, याला बुद्धीचा आशय म्हणतात.

दादांचे पण मुलगा आणि मुलगी गेले. तर त्यांच्या बुद्धीच्या आशयात होते की 'काय ही कटकट, किती हा त्रास!' बुद्धीच्या आशयात

नोकरी करायची नाही असे होते, 'बस, मी नोकरी करणार नाही.' त्यामुळे मग नोकरी करावी लागली नाही. म्हणजेच बुद्धीच्या आशयानुसार सर्व होत राहते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे जो व्यवहार, जी निमित्ते, जे संयोग मिळतात त्याच्यामागे आशय हे मुख्य कारण असते?

**दादाश्री :** आशय असल्याशिवाय तर काहीच मिळत नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे जो बुद्धीचा आशय आहे, तो मागील जन्माच्या चिंतनाचा परिणाम आहे का?

**दादाश्री :** चिंतन नाही, आशय, बुद्धीचा आशयच आहे. मागील जन्माचे जे बुद्धीचे आशय होते, त्याचे हे आता फळ आले. बुद्धीचा आशय असेल तर त्याला सट्टेबाज भेटतो. बाहेर पडला तर त्याला रेसवाला भेटतो. घरून निघताना ठाम ठरवून निघाला असेल की रेसला जाणारच नाही, तरी पण तो जातो, तो बुद्धीचा आशय आहे.

आपण मागील जन्मात बुद्धीचा असा काही आशय केला असेल की त्यामुळे आता आपल्याला समजते की सट्टा बाजार मला स्पर्शही करू शकणार नाही. नालायक माणूस मला भेटणारच नाही.

## बुद्धीच्या आशयाचा आधार

हे सर्व बुद्धीच्या आशयाच्या आधारावर आहे आणि बुद्धीचा आशय द्रव्य-क्षेत्र-काळ आणि भाव, यांच्या आधीन आहे. त्यात स्वतःचे कर्तेपण नाही. कर्तेपणा मानला जातो, ती भ्रांती आहे आणि त्या भ्रांतीतून पुन्हा पुन्हा नवीन उत्पन्न होते. मग ते कधी सुटतच नाही! 'बी' मधून वृक्ष आणि वृक्षातून 'बी', असे चालतच राहते! एकदा फळ खाऊन 'बी' नष्ट केले तर परत वृक्ष उगवणार नाही. अहंकार हे 'बी' आहे. अहंकाराचा नाश करा. जी फळे आली आहेत ती खा, पण 'बी' मात्र नष्ट करून टाका. म्हणून आम्ही सांगतो की ज्या फाइल्स येतील त्यांना भोगा, त्यांचा समभावाने निकाल (निपटारा) करा. आंब्याचा गर खा

आणि बी नष्ट करा. आंब्याचा गर हा तुमच्या बुद्धीचा आशय आहे, त्यात तर काही चालणारच नाही. तो तर खावाच लागेल. पण 'हे चांगले आहे, किंवा हे वाईट आहे', असे बोलू नका. 'समभावाने निकाल' करा.

असे म्हणतात की आत्म्याने विभाव केला, कल्पना केली. अरे, जर अशी कल्पना केली असेल तर ही त्याची कायमची सवय असली पाहिजे. म्हणून आम्ही म्हणतो की 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्सेस्' एकत्र आले, म्हणून हा विभाव उत्पन्न झाला. 'सायंटिफिक' म्हणजे गुह्य. गुह्य म्हणजे काय? तर द्रव्य-क्षेत्र-काळ-भाव हे सर्व एकत्र होऊन हे उत्पन्न होते, डोळ्यावर पट्टी बांधल्यानंतर जे भाव निर्माण होतात तो विभाव आहे आणि त्याला भावकर्म म्हणतात. याला आम्ही विशेष परिणाम उत्पन्न झाले आहेत असे म्हणतो.

दोन वस्तूंच्या सामीप्यभावामुळे विशेष परिणाम, स्वत:चे गुणधर्म स्वत:कडे राखून विशेष परिणाम उत्पन्न होतात. जोपर्यंत एवढ्या मोठ्या काकड्या दिसत नाहीत तोपर्यंत आत काही भाव उत्पन्न होतात का? पण दिसल्यावर लगेच विशेष परिणाम उत्पन्न होतात की 'खूप चांगली काकडी आहे!' परंतु जर दिसल्या नाहीत आणि मिळाल्या नाहीत तर मग काहीच होत नाही! तेव्हा कोणी म्हणेल या लोकांसाठी अशी एखादी एकांत जागा शोधून काढावी की जिथे त्यांना कोणीच भेटू शकणार नाही, अशा ठिकाणी त्यांना ठेवले तर?' पण तसे चालणार नाही! त्यांची जी स्थापना झालेली आहे, प्रतिष्ठा झालेली आहे ती उलगडेल (त्यानुसार घडेल) आणि मग पुन्हा नवीन दुसरी एखादी प्रतिष्ठा केल्याशिवाय तो राहणारच नाही. त्याच प्रकारची किंवा दुसऱ्या कुठल्या प्रकारची, पण त्याचे विशेष परिणाम थांबणार नाहीत. जेव्हा स्वत:च्या स्वरूपाचे भान होईल, त्याचा जो आनंद होईल, जे सुख शोधत होता ते सुख मिळेल तेव्हा दृष्टीफेर होईल (दृष्टी बदलेल). दृष्टी शुद्ध झाल्यानंतर मग विशेष परिणाम उत्पन्न होणार नाहीत.

वास्तवात काय आहे? तर 'शुद्ध ज्ञान म्हणजेच आत्मा, आणि

शुभाशुभ ज्ञान, अशुद्ध ज्ञान, ते सर्व जीव आहे.' शुभाशुभात आहे तोपर्यंत जीवात्मा आहे, मूढात्मा आहे. जेव्हा समकित होते, तेव्हाच प्रथम 'मी शुद्धात्मा आहे' अशी प्रतीती होते. कोणीही व्यक्ती अशीच शुद्धात्मा होत नाही, प्रथम प्रतीती होते. नंतर त्या प्रमाणे ज्ञान होते आणि त्या प्रमाणे वर्तन होते. पूर्वी मिथ्यात्व प्रतीती होती त्यामुळे मिथ्यात्व ज्ञान उत्पन्न झाले आणि मिथ्यात्व वर्तन उत्पन्न झाले. ज्ञान झाले की ते वर्तनात आपोआपच येते, त्यासाठी काही करावे लागत नाही. मिथ्यात्वश्रद्धा आणि मिथ्यात्वज्ञान एकत्र असतील तर आपोआपच तसे वर्तन होईल, करावे लागत नाही, तरी पण तो म्हणतो, करायचे आहे तो त्याचा अहंकार आहे. मिस्त्री कामातच मजा आहे, त्याच्यातच सुख आहे, असे तो मानत होता, म्हणून मग तो मिस्त्री बनतो. मग अशी प्रतीती बसल्यानंतर त्याला मिस्त्री कामाचे ज्ञान उत्पन्न होते. आणि ज्ञान व श्रद्धा एकत्र आले की ते ताबडतोब आचरणात येते. असा हात लावला की वीट चिकटते, हात लावला की वीट चिकटते! प्रत्येक वीट निरखून ठेवावी लागत नाही.

म्हणजेच बुद्धीच्या आशयानुसार सर्व मिळत जाते. त्यासाठी कोणाला काही करावे लागत नाही. बुद्धीच्या आशयात चोरी करावी असे असेल आणि त्याच्यामागे पुण्य असेल तर तो (निसर्ग) त्याला सर्व संयोग जुळवून देतो. तो कितीही गुप्त कामे (वाईट कामे) करत असेल, त्याच्या मागे लाख सी.आय.डी. लागलेली असेल तरी त्याचा पत्ता लागत नाही आणि जर पापाचा उदय असेल तर तो अगदी सहज पकडला जातो. निसर्गाची ही कशी व्यवस्था आहे ना! खरे तर यात पुण्य असते, तेव्हा तो मनात खुश होतो की 'मला कोण पकडू शकतो?' असा अहंकार करतो. आणि मग जेव्हा पापाचा उदय होतो, तेव्हा सौदा बंद होतो.

हे सर्व पुण्य चालवीत असते. तुला हजार रूपये पगार कोण देतो? पगार देणारा तुझा शेठ देखील पुण्याच्या आधीनच आहे. आणि जर पापाने घेरले तर कर्मचारी त्या शेठला मारतात सुद्धा.

**प्रश्नकर्ता :** शेठनी भाव केला असेल की 'याला नोकरीवर ठेवू

या' आणि मी भाव केला असेल की 'मला इथे नोकरी करायची आहे', म्हणून हे झाले?

**दादाश्री :** नाही, असा भाव नसतो.

**प्रश्नकर्ता :** मग काही तरी देणेघेणे असेल का?

**दादाश्री :** नाही, असे काहीच नाही.

**प्रश्नकर्ता :** मग त्यांच्याकडेच नोकरीसाठी का गेला?

**दादाश्री :** नाही. तो सर्व त्याचा हिशोब आहे. शेठची आणि त्याची ओळख-पाळख वगैरे काहीच नाही. शेठच्या बुद्धीच्या आशयात असते की 'मला असे असे नोकर हवे आहेत.' आणि नोकराच्या बुद्धीच्या आशयात असते की 'मला असे असे शेठ हवे आहेत.' बुद्धीच्या आशयात जसे छापले गेले असेल त्याप्रमाणे मिळूनच जाते.

मुले जन्माला येतात, ती पण बुद्धीच्या आशयानुसार असतात. एकुलता एक मुलगा असेल तरी खूप झाले, तो माझे नाव उज्ज्वल करील. मग त्याच्या बुद्धीच्या आशयानुसार तो मुलगा त्याचे नाव उज्ज्वल करतो. जैन लोक म्हणतात, 'माझा मुलगा आहे, त्याने दीक्षा घेतली तर फार उत्तम, त्याचे कल्याण तर होईल'! आणि जैन आई-वडील त्या मुलाला खुशाल दीक्षा घेऊ देतात. याउलट इतरांना असे विचारून पाहा बरे? ते सरळ नाही म्हणतील, कारण त्यांनी तसे भावच केलेले नव्हते.

## निसर्ग आणि बुद्धीचा आशय

एखाद्याला पत्नी मिळते, त्याने 'ही माझी पत्नी होवो' असे भाव केलेले नसतात. काहीही भाव नाही, ओळख-पाळख काहीच नाही, पण ती बुद्धीच्या आशयानुसार भेटते. कधी द्रव्य-क्षेत्र-काळ-भाव असे असतात की जेव्हा मुलींची संख्या फार कमी झालेली असते, तेव्हा त्याच्या बुद्धीचा आशय असा होतो की 'जशी मिळेल तशी', त्या मुलीबरोबर मी लग्न करीन, मुलगी मात्र मिळायला हवी. मग त्याला तशी पत्नी मिळते. पण मागाहून तो बोंबलत राहतो की 'ही बायको

तर अशी आहे, तशी आहे' वगैरे! अरे, तूच तर तिला पसंत केली होतीस ना, मग आता का बोंबलतोस? मग जर त्याला दुसऱ्यांची सुंदर पत्नी दिसली की त्याला आपल्या घरी अपुरेपणा वाटू लागतो. तरीही संतोष तर शेवटी स्वतःच्या घरीच वाटतो. आणि म्हणतो सुद्धा की मी माझ्या घरीच राहीन.

निसर्ग काय म्हणतो? अरे, तुला तुझ्या बुद्धीच्या आशयानुसार मिळाले आहे, मग आता तू कटकट का करतोस? दुसऱ्याचा बंगला पाहून तो आत कुरकुरत राहतो. पण तरी शेवटी त्याला स्वतःची झोपडीच चांगली वाटते!

## अंतिम प्रकारचा बुद्धीचा आशय

बुद्धीच्या आशयात असे असते की 'मला ज्ञानी मिळोत आणि माझी सुटका होवो, मी थकलो आहे आता या भटकंतीपासून.' तेव्हा त्याला ज्ञानी भेटतात! पण असा बुद्धीचा आशय तर कोणी करतच नाहीत ना? लोकांचा हा मोह कसा सुटणार?

## प्रतिष्ठेचा कर्ता, परसत्तेत!

द्रव्य, क्षेत्र, काळ, भाव आणि भव सतत बदलत असतात. तोंडाने जेवढे बोलतात, तितका अहंकार आहे आणि त्याने प्रतिष्ठा होत राहते. हा जो अहंकार करतो तो सुद्धा स्वतः करत नाही, तर तेही द्रव्य, क्षेत्र, काळ आणि भाव करवीत असतात. ज्ञानींकडून ज्ञान मिळाले की अहंकार जातो आणि अहंकार गेला की प्रतिष्ठा बंद झाली! मग तो कुठे जाईल? मोक्षाला!

**प्रश्नकर्ता :** अहंकार, तो पण द्रव्य-क्षेत्र-काळ आणि भाव यांच्या आधीन आहे का?

**दादाश्री :** हो, म्हणून तो प्रतिष्ठा करतो. दिसायला असे दिसते की अहंकार स्वतःच ही प्रतिष्ठा करत आहे, पण संयोग हे करवितात. त्यामुळे प्रतिष्ठा उत्पन्न होते. आता या प्रतिष्ठेतून पुन्हा संयोग उत्पन्न

होतात, आणि ते परत प्रतिष्ठा करवितात. अर्थात यात स्वत: काहीच करत नाही. म्हणून आम्ही त्याला 'सांयटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सेस्' म्हणतो. सर्व काही संयोग करवितात आणि स्वत: मात्र मानतो की, 'मी केले'. आता 'मी केले' ही मान्यता देखील संयोगच करवितात. जर कोणी विचारेल की याला अहंकार म्हणायचे की नाही?' तर 'हो, हा अहंकारच आहे. कारण करतो कोणी दुसरा आणि मानतो मात्र मी केले.'

**प्रश्नकर्ता :** अहंकार पण संयोगांच्या आधीनच होत असतो ना?

**दादाश्री :** हो, खरी गोष्ट आहे. हे सारे संयोग करवितात. अहंकार पण संयोगच करवितात. तरी पण तो 'मी केले' असेच मानतो. त्यामुळे नवी प्रतिष्ठा उत्पन्न होते. आणि आपल्या बिलीफमध्ये (मान्यतेत) तर 'मी केले' असे नसतेच. आपण जाणतो की हे 'व्यवस्थित शक्ती' करवून घेत आहे. त्यामुळे प्रतिष्ठा होणे बंद झाले. ज्याचे चित्रण झालेलेच आहे तो जन्म तर होणारच. पण आता नवीन चित्रण बंद झाले. आपण यात्रेला गेलो, ते सर्व पूर्वी चित्रित केलेले भाव होते. ज्या ज्या जागेचे भाव केले होते, त्या सर्व जागी आपण जाऊन आलो.

**प्रश्नकर्ता :** बुद्धीचा आशय बदलू शकतो का?

**दादाश्री :** आसपास पहारा असेल, त्या आधारावर बुद्धीचा आशय होत असतो. चारीबाजूंनी पोलिस गोळा झाले की मग आतमध्ये भीती उत्पन्न होते, तेव्हा मग बुद्धीचा आशय म्हणेल की नाही, आता चोरी करायची नाही. त्याप्रमाणे सर्व बदल होतो.

द्रव्य, क्षेत्र, काळ, भाव सर्व एकत्र आले की त्यानुसार बुद्धीचा आशय उत्पन्न होतो. पण आतमध्ये मूळ भावना मात्र निश्चितच असते. आपली दानत 'चोर' असेल तरच तसे सर्व संयोग जुळून येतात.

## 'अहंकार' पण नैसर्गिक रचना

**प्रश्नकर्ता :** 'नेसेसिटी इज धी मदर ऑफ इन्वेन्शन' (गरज ही शोधाची जननी असते) असे म्हणतात, ते चुकीचे आहे का?

**दादाश्री :** हो, तो केवळ शब्दप्रयोगच आहे. नाहीतर सगळे काही निसर्गच करवितो.

**प्रश्नकर्ता :** तर मग या 'रिलेटिव्ह' प्रगतीचा आधार काय आहे?

**दादाश्री :** सगळे काही प्रकृतीच करविते. जसजसा काळ बदलतो, तसतसे द्रव्य बदलते, द्रव्य बदलते तसे भाव बदलतात आणि स्वत: अहंकार करतो की 'मी केले'! हा अहंकार पण निसर्गच करवितो. आणि जो ह्या अहंकारातून मुक्त झाला तो ह्यातून मुक्त झाला. ही प्रगती निसर्ग करवितो. नाहीतर जेवढे शब्दप्रयोग आहेत, तेवढा सर्व अहंकारच आहे.

पूर्वीच्या लोकांनी प्रारब्ध म्हटले, म्हणून तर ही स्थिती आली आहे! म्हणून आपण आपल्या सायन्समध्ये कशालाच 'प्रारब्ध' असे म्हटले नाही.

**प्रश्नकर्ता :** 'व्यवस्थित'मध्ये असेल तर होईल, असे नाही का?

**दादाश्री :** ते तर आम्ही तुमच्या समाधानासाठी म्हणतो. पण खरे तर आम्ही असे म्हणतो की काम करत राहा. परिणाम 'व्यवस्थित'च्या हातात आहे. म्हणून घाबरू नका आणि विचार करू नका. जर हुकूम आला की लढाई करा, तर लढाई करत राहा. मग परिणामाला घाबरू नका.

**प्रश्नकर्ता :** तर मग आम्ही कुठल्याही योजना बनवायच्या नाही का?

**दादाश्री :** योजना तर प्रथमच तयार झालेली आहे. नंतर मग जेव्हा काम करण्याचे येईल, तेव्हा ते करत जा. सुरुवात करण्याअगोदरच योजना तयार झालेली असते!

**प्रश्नकर्ता :** विचार करायचे नाहीत का?

**दादाश्री :** विचार करायचे नाहीत. जे विचार येतात त्यांना पाहत राहा, आणि मग काम करत राहा. विचार तर येतीलच. विचार करायची

गरज नाही. माणसाकडे जर विचार बंद करण्याची शक्ती असती तर सर्वांनी विचार बंद पण केले असते. तुमचे वाईट विचार तुम्ही बंद करू शकता का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** मग तुम्हीच विचार करा, काय करू शकता?

**प्रश्नकर्ता :** तर मग विचारांचे मूळ काय आहे?

**दादाश्री :** मनाच्या गाठी आहेत.

**प्रश्नकर्ता :** गाठींचे मूळ काय आहे?

**दादाश्री :** पूर्वी जे विचार आले होते त्यात तुम्ही तन्मयाकार झाला होतात, त्यामुळे गाठ बनली. ज्या विचारात तन्मयाकार झाला होतात, त्याची गाठ पडली.

## आशयाला अनुसरून भूमिका

**प्रश्नकर्ता :** आशय आणि विचार यात काय फरक आहे? आशयातून विचार उत्पन्न होतात का?

**दादाश्री :** विचार आणि आशय अलग आहेत. आशय हा सारांश आहे. प्रत्येक जीवाचा जसा आशय असतो, तशी भूमिका त्याला मिळते.

**प्रश्नकर्ता :** गाठी आशयानुसार बनतात का?

**दादाश्री :** गाठी ह्या वेगळ्या गोष्टी आहेत. गाठी आणि आशय यांचा काहीही संबंध नाही. मुळात प्रथम विचार आहेत. त्यातून इच्छा निर्माण होतात आणि इच्छांमधून आशय निर्माण होतो, आणि त्या आशयानुसार त्याला त्याची भूमिका मिळते. तुमच्या आशयानुसार तुम्हाला हे शरीर मिळाले आहे. इतर सर्व ॲडजस्टमेंट्सही मिळतात. कदाचित आज ते तुम्हाला आवडणारही नाही, तरी पण हे सर्व तुमच्या आशयानुसारच आहे.

जर तुमच्या आशयानुसार नसते तर तुम्हाला रात्री झोपच आली नसती. दरोडेखोरांच्या मनात पुरुषांना लुटायचा आशय असेल तर त्याला स्त्री भेटतच नाही. आशयानुसार बुद्धी असते, विचार असतात आणि संपूर्ण जीवन आशयानुसार जाते. आता यात ॲडजस्टमेंट का होत नाही? (कारण) पूर्वीच्या आशयानुसार सर्व मिळते, आणि आत्ताच्या ज्ञानानुसार ते ॲडजस्ट होत नाही. पण तरीही आशयात जे असते तेच पसंत पडते. आशयात बदल होऊ शकत नाही. फक्त नवीन गाठ पडत नाही आणि जुन्या गाठी विरघळतात. मग निर्ग्रंथ होतो. ज्ञान मिळाल्यानंतर आता नवीन आशय बांधला जात नाही आणि पूर्वीचे सर्व विरघळत राहते.

**प्रश्नकर्ता :** निर्ग्रंथ होण्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** आपल्या इथे करून घेतात तशी सामायिक करावी, सामायिकमुळे जी खूप मोठी गाठ असेल, जी खूप त्रास देत असेल, ती विरघळते.

**प्रश्नकर्ता :** स्वतःच्या चुका सामायिकमध्ये प्रयत्न करून पाहायला हव्यात ना? सामायिकमध्ये तर प्रयत्न करावा लागतो ना?

**दादाश्री :** नाही, प्रयत्न म्हणजे तर मनाला क्रियेत घेऊन जाणे. मन क्रियाशील करणे, म्हणजे प्रयत्न. याउलट 'पाहणे' हे क्रियेत येत नाही.

पूर्वी ज्या चुका दिसत नव्हत्या, त्याच चुका आता दिसतात. क्रियेत फरक नाही. जे दिसते ते ज्ञानाच्या प्रतापामुळे.

## प्रतिष्ठेमुळे पुतळा

**प्रश्नकर्ता :** 'प्रतिष्ठित आत्मा' म्हणजे काय?

**दादाश्री :** जोपर्यंत 'मी स्वतः कोण आहे' हे जाणत नाही, तोपर्यंत 'हा चंदुभाई तो मीच आहे', त्यालाच आपण आत्मा मानतो, आणि तोच प्रतिष्ठित आत्मा. आत्मा म्हणजे काय? तर स्वतःचा 'सेल्फ'.

आपण जशी एका मूर्तीत प्रतिष्ठा करतो, तशी ही प्रतिष्ठा केली गेली आहे, म्हणून ती आपल्याला हे फळ देत राहते. दरअसल (मूळ, अस्सल) आत्म्याचे भान झाले तर काम होईल. 'स्वत: कोण आहे?' याचे 'सेल्फ रियलाइजेशन' (आत्म साक्षात्कार) व्हायला हवे.

**प्रश्नकर्ता :** या प्रतिष्ठित आत्म्याला शुद्धात्म्याचे भानच नाही ना?

**दादाश्री :** त्याला भान होईलच कसे? स्वत:चे भान तर जेव्हा ज्ञानी पुरुष करून देतील तेव्हाच होईल.

**प्रश्नकर्ता :** नाही, पण आपण 'ज्ञान' दिले, त्यानंतर 'प्रतिष्ठित आत्म्याला' भान होईल ना?

**दादाश्री :** हो, म्हणूनच तर स्वत:ला भान झाले ना! ते भान झाले म्हणूनच तो आता 'मी शुद्धात्मा आहे' असे बोलू लागला. पूर्वी जे भान होते त्यात आता त्याला फरक वाटतो. म्हणून त्याला वाटते की 'हा तर मी नाही, मी तर शुद्धात्मा आहे!'

## आत्मचिंतन कोणाचे?

**प्रश्नकर्ता :** आत्मा जसे चिंतन करतो, तसा होतो, तर मग ते 'चिंतन' कोण करतो?

**दादाश्री :** प्रतिष्ठित आत्माच चिंतन करतो. मूळ आत्मा तर कसलेच चिंतन करत नाही चिंतन करण्याचा जो भाव करतो तोच प्रतिष्ठित आत्मा आहे. दरअसल म्हणजे मूळ आत्मा तर असा नसतोच. मूळ आत्मा म्हणजे तर प्युअर गोल्डच ('शुद्ध सोने'च) समजा.

म्हणून आम्ही काय म्हणतो की शुद्धचे चिंतन केलेत तर तद्रूप व्हाल आणि दुसरे कसले चिंतन केले तर तसे व्हाल.

**प्रश्नकर्ता :** पण ते चिंतन तर 'प्रतिष्ठित आत्म्याचेच' आहे ना?

**दादाश्री :** हो, त्याचेच. तो (मूळ आत्मा) तर काहीच करत नाही. प्रतिष्ठित आत्मा जर त्या बाजूचा झाला तर 'शुद्धात्मा' होईल

आणि उलट बाजूला गेला तर उलट होईल, असे आम्ही म्हणतो. स्वरूप ज्ञान मिळाले तेव्हापासून तुमचे शुद्धात्म्याचे चिंतन होत राहील. तरी पण हे जे वाटते की 'मी असा आहे', 'मला असे झाले' हा सर्व मोह आहे. सत्संग करतो हा पण सारा मोह आहे, पण हा चारित्र्यमोह आहे. चारित्र्यमोह कशाला म्हणतात? तर समभावाने निकाल केला की संपून जातो, तो चारित्र्यमोह. मग परत तो आपल्याला स्पर्श करणार नाही आणि तो खराखुरा मोह तर स्वत:ला चिकटल्याशिवाय राहणारच नाही. दर्शनमोह संपला आहे म्हणून आत्ता फक्त चारित्र्य मोह शिल्लक आहे. त्याला डिस्चार्ज मोह म्हणतात.

ज्याला ज्ञान नसते त्याला तर 'डिस्चार्ज मोहात' 'मी असा आहे, तसा आहे' अशा सर्व कल्पना होत राहतात. म्हणून तो मग तसा होतो. आणि स्वरूपज्ञान झाल्यावर 'मी शुद्धात्मा आहे, मी शुद्धात्मा आहे' असे वाटत राहते, म्हणून शुद्ध होत जातो आणि 'चंदुभाई'ला तर जे व्हायचे असेल ते होईल, त्याचा जो प्रकृती स्वभाव आहे तो तर बाहेर पडेलच. 'त्याचे' आणि 'तुमचे' काहीच देणेघेणे नाही. फक्त त्याचा निकाल करायचा आहे.



## [ 2 ]

## 'वाणी'चे टेपिंग, 'कोडवर्ड' ने

**प्रश्नकर्ता :** 'वाणी' सुधारण्याचा उपाय काय?

**दादाश्री :** वाणी सुधारण्याचा मार्गच इथे आहे. इथे सर्व विचारून-विचारून समाधान करून घ्यायला हवे. उपाय समजून घ्यायला हवेत.

'स्थूल संयोग, सूक्ष्म संयोग आणि वाणीचे संयोग हे सर्व पर आहेत आणि पराधीन आहेत.' एवढे जरी वाक्य स्वत:च्या समजुतीत, स्वत:च्या जागृतीत राहिले, तर समोरची व्यक्ती काही का बोलेना, तरी त्याचा आपल्यावर काहीही परिणाम होणार नाही, आणि हे वाक्य काल्पनिक नाही. जे एक्झॅक्ट आहे तेच मी बोलत आहे. मी बोलतो म्हणून माझ्या शब्दांचा मान ठेवा असे मी म्हणत नाही. हे एक्झॅक्ट असेच आहे पण खरी हकीकत समजत नसल्यामुळे तुम्हाला मार पडतो (त्रास होत असतो).

**प्रश्नकर्ता :** समोरचा उलट बोलतो, तेव्हा आपल्या ज्ञानाने समाधान राहते, पण मुख्य प्रश्न हा आहे की आमच्याकडून कटू शब्द बाहेर पडले, तेव्हा जर आम्ही ह्या वाक्याचा आधार घेतला तर मग आम्हाला उलट बोलण्याचे लायसेन्सच मिळते, नाही का?

**दादाश्री :** पण त्या वाक्याचा आधार घ्यायचाच नसतो ना? तेव्हा तर तुम्हाला प्रतिक्रमणाचा आधार दिला आहे. समोरच्याला दु:ख होईल

असे बोलले गेले असेल तर प्रतिक्रमण करायला हवे. आणि समोरचा जर उलट बोलला, तेव्हा जर 'वाणी पर आहे आणि पराधीन आहे' हे स्वीकारले, की मग तुम्हाला समोरच्या व्यक्तीकडून दु:ख होणारच नाही ना?

तुम्ही उलट बोलल्यानंतर त्याचे प्रतिक्रमण करता, त्यामुळे मग तुम्ही बोललेल्याचे दु:ख तुम्हाला राहत नाही. म्हणजेच याप्रकारे सर्व गोष्टींचे समाधान होते.

**प्रश्नकर्ता :** वाणी जड आहे तरी पण इफेक्टिव (परिणामकारक) का आहे?

**दादाश्री :** हो, वाणी जड आहे. तरी पण सगळ्यात जास्त इफेक्टिव वाणीच आहे. या जगाच्या अस्तित्वालाच ती कारणीभूत आहे. वाणीचा स्वभावच इफेक्टिव आहे.

**प्रश्नकर्ता :** वाणीवर कंट्रोल (नियंत्रण) कसे करावे?

**दादाश्री :** वाणीवर कंट्रोल तर... त्यासाठी एक तर ज्ञानींकडून आज्ञा घेऊन मौन धारण केले तर होईल, नाहीतर स्वत: मौन धारण करावे, पण ते तर स्वत:च्या आधीन नाही. आपोआप मौन उदयास येणार नाही. कारण उदय तर व्यवस्थित शक्तीच्या आधीन आहे. म्हणूनच ज्ञानींची आज्ञा घेऊन मौन धारण करणे हितकारी आहे. आणि वाणीवर कंट्रोल करण्यासाठी प्रतिक्रमण करणे, हा दुसरा उपाय. वाणी म्हणजे टेपरेकॉर्ड आहे. त्यामुळे छापलेल्यापेक्षा कमी किंवा जास्त काहीच बोलले जाणार नाही. म्हणजेच कंट्रोल करण्याचे हे दोनच उपाय आहेत.

**प्रश्नकर्ता :** पूर्वजन्मात किंवा दुसऱ्या जन्मात तेच संयोग आणि त्याच व्यक्ती भेटतील आणि तीच वाणी निघेल, असे आहे का? टेप झाले आहे याचा अर्थ काय?

**दादाश्री :** आपल्या इथे साहेब जलद बोलतात आणि स्टेनो लिहून घेतो. तर तो कसे लिहून घेत असेल? ती कोणती भाषा असते?

**प्रश्नकर्ता :** शॉर्टहॅन्ड.

**दादाश्री :** आणि त्याच्यापुढेही काही तरी नवीन निघाले आहे ना? त्याला कोड लँग्वेज की असे काही तरी म्हणतात ना?

**प्रश्नकर्ता :** हो, कोड लँग्वेज.

**दादाश्री :** कोड लँग्वेज आणि शोर्ट लँग्वेजमध्ये सगळे आत टाइप होते. आपल्या आत जर असा भाव झाला की 'भल्या भल्यांना (गप्प) बसायला लावीन, अशी वाणी बोलणारा मी आहे' असा भाव झाला तर या एवढ्या कोडवर्डमुळे तो सर्व प्रकाशमान होऊन जातो. त्याला मी टेपरेकॉर्ड म्हणतो. तुम्ही आतमध्ये जे कोडवर्ड केलेले आहेत त्यानेच हे सर्व टेप झाले आहे.

आणि कितीही कठोर वाणी बोलणारा पण संत पुरुषासमोर गोडच बोलतो. तर तेव्हा आपल्याला समजतेच ना की हा कठोर बोलणारा आहे की गोड बोलणारा आहे?

**प्रश्नकर्ता :** वाणी बोलताना कशी आणि कशाप्रकारे जागृती राखायला हवी?

**दादाश्री :** समोरच्याला अगदी जिव्हारी लागेल असा मोठा दगड मारला तर त्यावेळी आपली जागृती उडून जाणारच! लहान दगड मारला तर जागृती जाणार नाही. म्हणजेच दगड जेव्हा छोटा होईल तेव्हा ती जागृती येईल.

**प्रश्नकर्ता :** तर मग आम्ही दगड छोटा कसा करायचा?

**दादाश्री :** प्रतिक्रमणाने!

**प्रश्नकर्ता :** टेप झालेली वाणी कशाप्रकारे बदलता येईल?

**दादाश्री :** तुम्ही फक्त ज्ञानींकडून आज्ञा घेऊन मौनव्रत धारण केले तरच त्यावर उपाय होईल. अन्यथा ही तर निसर्गाला बदलण्यासारखी गोष्ट आहे. म्हणून 'ज्ञानी पुरुषां'कडून आज्ञा घेऊन केलेत, तर मग

'ज्ञानी पुरुष' जोखीमदार बनत नाहीत आणि 'जोखीम' अधांतरीच संपून जाते. अर्थात हा एकमेव उपाय आहे.

**प्रश्नकर्ता :** वाणी बोलतेवेळी जे भाव आणि जागृती असेल त्यानुसार टेपिंग होत असते का?

**दादाश्री :** नाही, हे टेपिंग बोलतेवेळी होत नाही. मुळात तर हे पूर्वीच झालेले आहे. मग आता काय होणार? जसे छापले गेले आहे तसेच वाजणार.

**प्रश्नकर्ता :** आणि जर आता बोलताना जागृती ठेवली तर?

**दादाश्री :** आता तुम्ही जर कोणाला रागावलात आणि मग तुमच्या मनात असे आले की याला रागावलो 'तेच बरोबर आहे.' तर मग परत त्याचप्रकारचे, त्याच हिशोबाचे कोडवर्ड बनते आणि जर त्याला रागावलो, 'ते चुकीचे झाले' असा भाव आला, तर मग तुमचा कोडवर्ड नवीन प्रकारचा बनतो. रागावलो ते बरोबर केले असे मानले की परत त्याच प्रकारचा कोडवर्ड तयार होतो, आणि त्यामुळे तो अधिक वजनदार (मजबूत) बनतो. त्याऐवजी 'हे फार वाईट झाले, असे बोलता कामा नये, असे का बोलले जाते?' असा भाव झाला तर तो कोड छोटा होतो.

**प्रश्नकर्ता :** परंतु जर मी बरोबर केले असेही वाटत नसेल आणि चुकीचे केले असेही वाटत नसेल तर मग कोड उत्पन्न होईल का?

**दादाश्री :** जर 'मौन' राहण्याचा निश्चय केला तर तो कोड मौन होईल.

**प्रश्नकर्ता :** कित्येकवेळा तोंडाने बोलले जात नाही. पण मनात बोलणे तर असतेच ना? आतील भाव तर बिघडतच असतात ना? त्याचे काय?

**दादाश्री :** तुम्ही स्वत:लाच बजावून सांगितले पाहिजे की असे चुकीचे होता कामा नये. तर असे सुंदर असायला हवे.

**प्रश्नकर्ता :** मग तसा सुंदर वाणीचा कोड येईल ना?

**दादाश्री :** सुंदर वाणीचा कोड तर येईलच ना!

**प्रश्नकर्ता :** जर पुन्हा नवीन कोड बनले तर त्यासाठी परत नवीन शरीर धारण करावे लागेल ना? त्याऐवजी कोड बनणारच नाही, असे काहीतरी आम्हाला हवे आहे.

**दादाश्री :** हे सर्व तर एक जन्मापुरतेच आहे. यापुढे मात्र तुमचे कोड असे असणारच नाहीत. आज ज्यांची वाणी वाईट नाही त्यांनी कोड बदललेले नाही आणि ज्यांची वाणी वाईट आहे, त्यांनी कोड बदललेले आहेत. म्हणजेच ते कच्चे झाले आहेत आणि हे पक्के झाले आहेत. जो मला विचारतो की, 'दादा, माझी ही अशी वाणी कधी सुधारेल?' तेव्हा आम्हाला समजतेच ना की 'हा आता कोड बदलू लागला आहे.' नाही का?

**प्रश्नकर्ता :** ज्याला मोक्षात जायचे आहे त्याने तर कुठलाही कोड बनवता कामा नये ना? तर त्यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** मोक्षाला पोहोचेपर्यंत काहीही त्रास होणार नाही. मोक्षाला जाण्यासाठी जसे कोड हवेत तसे कोड पुढील जन्मी उत्पन्न होतील. आता मला विचारून जेवढा माल भराल, त्यामुळे मग पुढील जन्मी त्याचा तसाच कोड उत्पन्न होईल. अजून एक जन्म बाकी आहे ना?

**प्रश्नकर्ता :** तीर्थंकरांच्या वाणीचे कोड कसे असतात?

**दादाश्री :** त्यांनी असे कोड निश्चित केलेले असते की 'माझ्या वाणीने कोणत्याही जीवाला किंचितमात्रही दु:ख न होवो, दु:ख तर न होवो, पण कोणत्याही जीवाचे किंचितमात्रही प्रमाण दुखावले न जावो, अगदी झाडाचेही प्रमाण दुखावले न जावो.' असे कोड फक्त तीर्थंकरांचेच झालेले असतात.

**प्रश्नकर्ता :** वाणी बोलताना कोणत्या प्रकारची जागृती बाळगायला हवी?

**दादाश्री :** 'हे बोल बोलताना कोणाकोणाचे कशा प्रकारे प्रमाण दुखावले जात आहे' हे पाहायचे आहे. अशी जागृती बाळगावी.

**प्रश्नकर्ता :** पाच जणांना एकच शब्द बोललो तरी पण सगळ्यांचे मन वेगवेगळ्या प्रमाणात दुखावले जाते. तर अशा वेळी काय करावे?

**दादाश्री :** तुम्ही जागृती ठेवून बोलले पाहिजे. तुम्हाला जेवढे समजेल तेवढे करावे. त्याला उपाय नाही. 'हे चंदुभाई' न्यायपूर्ण बोलत असतील, तरी पण समोरचा दु:खी होतो, असेही पुष्कळदा होते. आता त्याला उपाय काय? पण असे फक्त काही लोकांबरोबरच घडते. सर्वांबरोबर असे घडत नाही. म्हणून अशा वेळी जर इतरांनी फटाके फोडले नाहीत तरच तुमचे फटाके फोडणे बंद होईल. नाहीतर जर एकाने फोडले तर तुम्हाला फोडायचा नसेल तरी फुटेल! म्हणून जर सर्वांनीच ठरविले की आपण फटाके फोडणे बंद करूया, तरच ते बंद होईल, नाहीतर होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** नवीन कोड असेल तर त्याचा 'इफेक्ट' (परिणाम) पुढील जन्मी होईल की या जन्मी पण होईल?

**दादाश्री :** हे कुंभार मडकी बनवतात, त्या मडक्यांना भट्टीत तापवून तासाभरातच बाहेर काढले तर काय होईल?

पुढच्या जन्मी सगळे काही चांगले होईल असे तुम्ही मानले, म्हणून तर तुमची माझ्यावर श्रद्धा बसली, नाहीतर मग तुम्ही इथे बसाल तरी कशाला? आणि या जन्मात काय होईल की तुमची जी कोडवाली भाषा आहे ती संपून जाईल आणि त्यानंतर मग तुमच्याकडून तशी भाषा निघणारच नाही.

**प्रश्नकर्ता :** तर मग काय मौन व्हावे?

**दादाश्री :** मौनच व्हायचे आहे. पण मौन म्हणजे असे मौन नाही की एक अक्षरही बोलायचे नाही. मौन म्हणजे सामान्य व्यवहारासाठी

आवश्यक आहे तेवढेच बोलले जाईल. कारण टाकीत भरलेला माल आहे, तो रिकामा तर होणारच.

## अहंकाराचे रक्षण

**प्रश्नकर्ता :** दादा, आपण म्हटले होते की वाणी अहंकारामुळे निघत असते.

**दादाश्री :** त्याचे काय आहे आपण वाणी बोलतो त्याला हरकत नाही, ते तर कोडवर्ड आहे ते उलगडत जाते आणि बोलले जाते, पण त्याचे आपण रक्षण (समर्थन) करता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** रक्षण करता कामा नये, याचा अर्थ मी बरोबर आहे अशी भावना असता कामा नये, असे का?

**दादाश्री :** मी बरोबर आहे (असे मानणे), यालाच रक्षण म्हणतात. आणि रक्षण केले नाही तर मग काहीच हरकत नाही. सगळे गोळे फुटतील पण कोणालाही जास्त दु:ख होणार नाही. अहंकाराचे रक्षण केले जाते, त्यामुळे खूप दु:ख होते.

मी एखाद्या लहान मुलाला खूप मारले तरी पण त्याला काही वाटत नाही आणि तुम्ही नाराज होऊन त्याला जराशी टपली मारलीत, तरी तो भोकांड पसरवील! म्हणजेच त्याला मार लागल्याचे दु:ख नाही, तर 'अहंकार' दुखावला गेला याचे दु:ख आहे!

शास्त्रकारांनी म्हटले आहे की अहंकार हा एक असा गुण आहे की जो सगळ्यांना आंधळे बनवतो. भावाभावात पण शत्रुत्व निर्माण होते. सख्खा भाऊ लवकर बरबाद व्हावा असा विचार करतो! अरे, वडीलदेखील मुलाला तुझे वाटोळे होवो असा आशीर्वाद देतात. म्हणजेच अहंकार कसे आणि किती नुकसान करतो? म्हणून आपण अहंकाराला ओळखायला हवे की 'हा आपला कोण आहे?'

**प्रश्नकर्ता :** पण आपले काम करण्यासाठी आपल्याला अहंकार तर असायला हवा ना?

**दादाश्री :** काम करण्याचा अहंकार तर असतोच. त्याला कोण मनाई करणार? पण त्या अहंकारात असे असे गुण आहेत हे समजले पाहिजे. असे समजले की मग अहंकारावर आपले प्रेम राहणार नाही, आसक्ती राहणार नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण कितीही प्रयत्न केले तरी पण समोरचा सुधारत नसेल तर काय करावे?

**दादाश्री :** ते स्वत: सुधारलेले नाहीत आणि लोकांना सुधारवयास गेले, त्यामुळेच तर लोक उलट जास्त बिघडले. सुधारायला गेलो की बिघडतात. स्वत:च बिघडलेला असेल तर काय होणार? स्वत:ला सुधारणे सर्वात सोपे आहे! आपण सुधारलेले नसताना दुसऱ्यांना सुधारावयास जाणे हे 'मिनिंगलेस' आहे. (याला काही अर्थ नाही.) कारण तोपर्यंत आपले शब्द पण परत येतील. तुम्ही म्हणालात की 'असे करू नकोस, तर समोरचा म्हणेल, की 'जा, आम्ही तर असेच करणार!' म्हणजे यामुळे तर समोरचा आणखीनच उलट गेला!

यात अहंकाराची गरजच नाही. अहंकारपूर्वक समोरच्या माणसाला धाक-धमकी देऊन काम करवून घेण्याचा प्रयत्न केला तर उलट समोरचा जास्त बिघडेल. ज्या व्यक्तीत अहंकार नसतो, त्या व्यक्तीशी सगळे 'सिन्सिअर' (निष्ठावान) राहतात, आणि तिथे 'मोरालिटी' (नैतिकता) पण असते.

आपल्याला अहंकार असता कामा नये. अहंकार सर्वांना टोचतो. लहान मुलाला देखील 'मूर्ख, गाढव, बेअक्कल' असे जर म्हटले तर तो पण तिरका वागू लागतो. आणि 'बाळा, तू खूप शहाणा आहेस' असे म्हटले की तो ताबडतोब ऐकतो.

**प्रश्नकर्ता :** आणि त्याला खूप शहाणा आहेस असे म्हटले तरी पण तो बिघडेल का?

**दादाश्री :** मूर्ख म्हटले तरी बिघडेल आणि खूप शहाणा असे म्हटले तरी पण बिघडेल. कारण शहाणा म्हटले तर त्याच्या अहंकाराला

'ऐन्करेजमेंट' (प्रोत्साहन) मिळेल आणि मूर्ख म्हटलेत तर 'सायकोलॉजिकल इफेक्ट' (मानसिक परिणाम) उलट होईल. शहाण्या माणसाला जर 25-50 वेळा वेडा म्हटले तर त्याच्या मनात अशी शंका उत्पन्न होईल की 'खरेच मी वेडा आहे का?' असे करत करत तो खरोखरच वेडा होईल. म्हणून मी वेड्यालासुद्धा 'तुझ्यासारखा शहाणा या जगात कोणीच नाही' असे म्हणून म्हणून 'ऐन्करेजमेंट' देतो. या जगात सतत पॉझिटिव्ह राहा. नेगेटिव्हच्या दिशेने अजिबात जाऊ नका. पॉझिटिव्हवर उपाय सापडेल. मी तुम्हाला समंजस म्हटले आणि त्यामुळे जर तुमचा अहंकार गरजेपेक्षा जास्त झाला तर मला तुम्हाला चापट पण मारता येते, नाहीतर सर्व चुकीच्या मार्गाने चालू लागेल. आणि जर 'ऐन्करेज' केले नाही तर मग तो पुढे जाणारच नाही.

'अहंकार नुकसानकारक आहे' हे समजून घेतले की मग सर्व काम सुरळीत होईल. अहंकाराचे रक्षण करणे योग्य नाही. अहंकार स्वत:च स्वत:चे रक्षण करून घेतो.

व्यवहार म्हणजे काय? (आधी) द्या, नंतर परत घ्या, किंवा (आधी) घ्या, नंतर परत द्या. हा व्यवहार आहे. 'मी' कोणाला देतही नाही आणि 'मी' कोणाकडून घेतही नाही. मला कोणी देतही नाही. 'मी' माझ्या स्वरूपातच राहत असतो.

व्यवहार या प्रकारे बदला की आपण दिल्यानंतर परत घ्यायचे आहे. म्हणजे तो जेव्हा परत करायला येईल तेव्हा तुम्हाला चांगले वाटेल, असे असेल तर द्या.

आपण जर विहिरीत डोकावून म्हटले 'तू बदमाश आहेस.' तर विहीर पण म्हणेल, 'तू बदमाश आहेस' आणि आपण जर म्हटले 'तू चौदालोकांचा नाथ आहेस.' तर विहीर पण आपल्याला म्हणेल की 'तू चौदालोकांचा नाथ आहेस.' म्हणून आपल्याला जसे आवडते तसे बोलायला हवे. तुम्ही प्रोजेक्ट असे करा की ते तुम्हाला आवडेल. हे सगळे तुमचेच प्रोजेक्शन आहे. यात परमेश्वराने अजिबात हस्तक्षेप केलेला नाही.

जगात कोणालाही बेअक्कल म्हणू नका. अक्कलवंतच म्हणा, तू समंजस आहेस असे म्हणालात तरच तुमचे काम होईल. एक माणूस आपल्या म्हशीला म्हणत होता की 'तू खूप शहाणी आहेस, समंजस आहेस, हुशार आहेस.' मी त्याला विचारले, 'तू म्हशीला असे का सांगत आहेस?' तर तो म्हणाला, 'मी असे म्हटले नाही तर ती दूध द्यायचेच बंद करील.' म्हशीलाही जर एवढे समजते तर काय माणसाला समजणार नाही?

## बुद्धीच्या हस्तक्षेपामुळे माजला गोंधळ

हे जग 'रिलेटिव्ह' आहे. व्यावहारिक आहे. आपण समोरच्याला एक अक्षरही बोलू शकत नाही. आणि जर 'परम विनयात' असू तर कोणाची चूक पण काढू शकत नाही. या जगात कोणाच्याच चुका काढायच्या नसतात. 'चुका काढण्यामुळे कोणता दोष लागेल', याची कल्पना चुका काढणाऱ्याला नसते.

**प्रश्नकर्ता :** आम्ही चुका काढत नाही पण त्याची प्रगती व्हावी यासाठी बोलतो.

**दादाश्री :** त्याच्या प्रगतीची काळजी तुम्ही करू नका. त्याची प्रगती करण्याचे काम निसर्ग आपोआप करत असतो. समोरच्याची प्रगती घडवून आणण्याची इच्छा तुम्ही करायची नाही. निसर्ग निसर्गाचे काम करतच असतो. आपण आपल्या परीने सर्व कर्तव्ये करत राहावीत.

बुद्धी तुम्हाला त्रास देते, की असे केले की असे होईल, तसे केले की तसे होईल. काहीही होत नाही. कोणी काही करू शकेल असे नसतेच. निसर्ग निसर्गाचे काम करतच असतो. कोणीही कोणाकडे सल्ला मागायला जात नाही. तरी पण लोक न मागताच सल्ला देत राहतात.

या बुद्धीचे जर ऐकू लागलो तर सर्व प्रथम या सत्संगात 'असेच बसा, तसे बसू नका' असे सर्व नियम असले पाहिजेत. परंतु जिथे खरा धर्म आहे, तिथे तर 'नो लॉ, लॉ' (कुठलेच नियम नाही, तोच नियम) हीच मुख्य गोष्ट आहे.

आपल्या येथे 'बुद्धी' या शब्दाची गरजच नाही. जी गोंधळ निर्माण करते त्या बुद्धीला दूर करण्याचा प्रयत्न करा. गोंधळात टाकत नसेल, तर मग हरकत नाही. हे सर्व समजायला हवे ना? असे कधीपर्यंत चालेल? बुद्धी तुम्हाला 'इमोशनल' (भावनिक) करील. यात तुमचे काहीही चालणार नाही. सगळे 'व्यवस्थित शक्ती'च्या आधीन आहे. 'व्यवस्थित शक्ती'वर थोडाफार विश्वास बसला असेल तर मग काही प्रश्नच राहत नाही. इथे तर प्रश्नांशिवाय उत्तरे आहेत.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हणता की प्रयत्न तर अगदी शेवटपर्यंत करावेत?

**दादाश्री :** प्रयत्न कशासाठी करायचे असतात? तर आपल्या संसारव्यवहारासाठी प्रयत्न करायचे असतात. इथे सत्संगात संसारव्यवहार नाही. इथे तर 'रियल'चा शुद्ध व्यवहार आहे. शुद्ध व्यवहारात बुद्धीची अजिबात गरज नाही.

**प्रश्नकर्ता :** बुद्धीकडून 'सर्वन्ट' (नोकर) प्रमाणे काम करून घ्यायचे की नाही?

**दादाश्री :** नाही. जिथे संपूर्ण शुद्ध व्यवहार आहे, अशा ह्या 'खोलीत' प्रवेश केला की मग बुद्धीचे काम नाही. इथे शुद्ध व्यवहार आहे आणि बाहेर संसारव्यवहार आहे. संसारात पण जिथे बुद्धी त्रास देते तिथे तिला सोडून द्यायला हवी. 'व्यवस्थित' म्हटल्यानंतर विकल्प करायचे नसतात. 'ज्ञानी पुरुषां'च्या आज्ञेत राहील त्याला 'शुद्ध व्यवहार' म्हणजे नक्की काय? ते समजेल.



# [ 3 ]

## आमंत्रित कर्मबंधन

आमचे कर्म आमच्या मर्जीनुसारचे असते आणि तुमचे कर्म तुम्हाला नाचवते. आम्हाला स्वातंत्र्य असते, म्हणून आम्ही अगदी निवांत बसतो. तुमची कर्मे पण हळूहळू संपतील, नंतर आपण बोलावलेत तरी ती येणार नाहीत. ती काय अशी रिकामी नाहीत. आपण सही केली होती म्हणून आली आहेत, नाहीतर ती आलीच नसती ना? करारावर जशा सह्या केल्या असतील, गुंतागुंतीच्या असतील तर गुंतागुंतीचे येईल आणि चोख असेल तर चोख येईल. अरे, सत्संगात बसलेल्यालासुद्धा उठवून घेऊन जातात, गत्यंतरच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** संबंध ठेवल्यामुळे राग (मोह, आसक्ती) उत्पन्न झाला आणि म्हणून बोलावतात का?

**दादाश्री :** ते सर्व राग आणि द्वेषच आहेत. पण पूर्वी आपण सह्या केलेल्या आहेत, तेव्हाच त्यांना राग उत्पन्न होतो, नाहीतर कोणी नावही घेणार नाही.

या जन्मात काही ठराविक सह्याच मान्य होतात. तुम्ही जेवढ्या मानता तेवढ्या सह्या नसतात. सही तर, टाइप झाल्यावर पुन्हा टाइप केले तरच तिला सही मानली जाते, म्हणजेच फारशा सह्या नसतातच.

## तपाच्या तापामुळे उत्पन्न झाली शुद्धता

व्यवहारचारित्र्यापासून ते थेट आत्मचारित्र्यापर्यंतचे चारित्र्य आहे.

ज्ञान-दर्शन-चारित्र्य आणि तप. त्यातील जे आत्मचारित्र्य आहे ते अंतिम प्रकारचे चारित्र्य आहे. व्यवहारचारित्र्याचा फोटो काढला जाऊ शकतो पण ह्या आत्मचारित्र्याचा फोटो काढता येत नाही. अंतिम प्रकारचे जे ज्ञान-दर्शन-चारित्र्य आणि तप आहेत, त्या चौघांचाही फोटो काढता येत नाही.

**प्रश्नकर्ता :** अंतिम तप कोणते?

**दादाश्री :** आता समजा तुम्हाला एखादी व्यक्ती शिवी देत असेल, त्यावेळी जर तुम्हाला माझे शब्द आठवले आणि त्या प्रमाणे तुम्ही ठरवले की मला 'समभावाने निकाल करायचा आहे', तर त्याला तप म्हणतात. त्यावेळी तपच असते.

सर्व बाह्य तपांना स्थूल तप म्हणतात, त्यांचे फळ म्हणजे भौतिक सुख मिळते. आणि आंतरिक तप हे सूक्ष्म तप आहे, त्याचे फळ मोक्ष आहे.

जेव्हा कोणी तुम्हाला शिव्या देतो, त्यावेळी आतमध्ये मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार सर्व तापतात, त्या तपाला तुम्ही थंड होईपर्यंत पाहत राहता, त्याला सूक्ष्म तप म्हटले जाते.

सासू सुनेला सारखी रागावते आणि सून जर समजदार असेल तर तिला सूक्ष्म तप खूप मिळत राहते. हिंदुस्तानात हे तप आपोआप मोफत, घर बसल्या मिळत राहते. घर बसल्या गंगा मिळते, पण लोक तिचा फायदा घेत नाहीत ना? नवरा जर काही बोलला तर त्यावेळी तुम्ही तप केले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** 'अक्रम विज्ञाना'त तपाचे स्थान कुठे आहे?

**दादाश्री :** तप करणे म्हणजे काय? तर जो मागील हिशोब चुकवावा लागतो, तो चुकवताना कधी गोड पण वाटते आणि कधी कडू पण वाटते. गोड वाटते तिथे तप करायचे आणि कडू वाटते तिथेही तपच करायचे. डिस्चार्ज कर्म कडू-गोड फळ दिल्याशिवाय राहतच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** या व्यक्तीने मला शिवी दिली की मला लगेच लक्षात येते की हा माझ्या कर्मांचा उदय आहे. तो निर्दोष आहे, तर यात तप कशाला म्हणणार?

**दादाश्री :** ज्ञानामुळे हे तप केले गेले. यात स्वत:ला तप करावे लागत नाही. आतमध्ये जे मन-बुद्धी तापतात, त्यांना समतापूर्वक 'पाहत' राहणे, तेच तप आहे. त्यात तन्मयाकार व्हायचे नाही. सर्व जग मन-बुद्धी तापते तेव्हा स्वत: पण तापते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे तप करावे लागेल?

**दादाश्री :** तप करावे लागत नाही. तप तर स्वाभाविकपणे होतेच.

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत तप होत असेल, तोपर्यंत अपूर्ण आहे, असेच म्हटले जाईल ना?

**दादाश्री :** थेट 'केवळज्ञान' होईपर्यंत अपूर्णच म्हटले जाते. माझे पण अपूर्णच म्हटले जाते आणि तुमचे पण अपूर्णच म्हटले जाते.

तप केल्यामुळे स्वत:च्या ज्ञानदशेची डिग्री वाढते. त्यामुळे अंतिम शुद्धता येते. मला पण शंभर टक्के पूर्ण शुद्ध सोने म्हणता येणार नाही आणि तुम्हालाही म्हणता येणार नाही. आणि ज्ञानींना सुद्धा शरीराची तपे असतात.

## प्रतिक्रमण : क्रमिक मार्गातील-अक्रम मार्गातील

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हणता 'अक्रम मार्गात' पक्षपात होत नाही तर मग खंडनाशिवाय मंडन कसे काय होऊ शकते?

**दादाश्री :** हा मंडन करण्याचा मार्ग नाहीच आणि खंडन करण्याचा पण मार्ग नाही. ज्यांना मोक्षाला जायचे आहे त्यांच्यासाठीच हा मार्ग आहे. आणि ज्यांना मोक्षाला जायचे नाही त्यांच्यासाठी दुसरा मार्ग आहे. दुसरा धर्म हवा असेल तर आम्ही तोही देतो.

क्रमिक मार्गाने पुढे जाणे हा खूप कठोर उपाय आहे, तरी पण

तो कायमचा मार्ग आहे. जोपर्यंत मनात वेगळे असेल, बोलण्यात वेगळे असेल आणि आचरणात वेगळे असेल, तोपर्यंत कोणताच धर्म चालणार नाही. सध्या सगळीकडे असेच तर झाले आहे ना?

म्हणून आम्ही या काळाच्या माणसांना जर धर्म जाणून घ्यायचा असेल तर त्यांना काय शिकवतो?

तुझ्याकडून खोटे बोलले गेले त्याला हरकत नाही. मनात तू खोटे बोललास त्याला हरकत नाही. परंतु आता तू त्याबद्दल 'या' प्रकारे प्रतिक्रमण कर आणि ठरव की पुन्हा कधी असे बोलणार नाही. आम्ही त्याला प्रतिक्रमण करणे शिकवतो.

**प्रश्नकर्ता :** आम्ही 'रायशी' आणि 'देवशी' प्रतिक्रमण करतो, तर काय ते चुकीचे आहे?

**दादाश्री :** प्रतिक्रमण तर 'शूट ॲट साइट' असले पाहिजे. उधार ठेवून चालणार नाही. जसे आपण वहीखाते उधार ठेवत नाही. तसेच प्रतिक्रमण पण उधार ठेवता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** जीव तर सतत कर्मबंधने बांधतच राहतो, तर काय त्याने सतत प्रतिक्रमण करत राहायचे?

**दादाश्री :** हो, निश्चितच करावे लागेल! ह्या आपल्या महात्म्यांपैकी बरेच महात्मा रोज पाचशे-पाचशे प्रतिक्रमण करत असतात.

**प्रश्नकर्ता :** ती तर भाव प्रतिक्रमणे आहेत, क्रिया प्रतिक्रमणे तर होतच नाहीत ना?

**दादाश्री :** नाही, क्रियेत तर प्रतिक्रमणे नसतातच. फार तर त्यामुळे मन चांगले राहील.

**प्रश्नकर्ता :** त्याने *कर्मनिर्जरा* होते की नाही?

**दादाश्री :** *निर्जरा* (आत्मप्रदेशातून कर्म वेगळे होणे) तर प्रत्येक जीवात होतच राहिली आहे. पण मला प्रतिक्रमण करायचे आहे, हा

चांगला भाव आहे. त्यामुळे *निर्जरा* चांगली होते. नाहीतर प्रतिक्रमण तर 'शूट ॲट साइट' करायला हवे. तुम्ही करता ते द्रव्य प्रतिक्रमण आहे, भाव प्रतिक्रमणाची आवश्यकता आहे.

**प्रश्नकर्ता :** द्रव्याबरोबर 'भाव' तर असतोच ना?

**दादाश्री :** नाही, त्यात फक्त द्रव्यच असते, भाव नसतो. कारण दूषमकाळातील जीवांसाठी भाव ठेवणे ही खूप कठीण गोष्ट आहे. जर 'ज्ञानी पुरुषां'ची कृपा असेल आणि त्यांनी डोक्यावर हात ठेवला असेल, तर त्यानंतर भाव उत्पन्न होतात. अन्यथा भाव उत्पन्न होत नाहीत.

'ज्ञानी पुरुष' कोणाला म्हणतात? तर ज्यांना पर-परिणतीच नसते. निरंतर स्वभाव-परिणतीच असते. रात्री-दिवसा कधीही स्वभाव परिणतीच असते, पर-परिणाम होतच नाहीत, ज्यांची वाणी, वर्तन आणि विनय मनोहर असतात, आर्तध्यान आणि रौद्रध्यान सर्वांशाने नसतात आणि अहंकार शून्य झाल्यामुळे, टेन्शन नसल्यामुळे ज्यांचे निरंतर मुक्त हास्य असते, जे अनंत गुणांचे भांडार असतात, त्यांना 'ज्ञानी पुरुष' म्हणतात.

## ज्ञानींचे प्रतिक्रमण

तुम्ही गादीवर झोपले असाल तर जिथे जिथे खडे टोचत असतील ते तुम्ही काढून टाकाल की नाही? तसेच ही प्रतिक्रमणे पण जिथे जिथे टोचत असते तिथेच करायची आहेत. तुम्हाला जिथे टोचत असेल तिथून तुम्ही काढून टाका आणि त्यांना जिथे टोचत असेल तिथून ते काढून टाकतील. प्रत्येक व्यक्तीची प्रतिक्रमणे वेगवेगळी असतात.

आता एखादी व्यक्ती कोणावर उपकार करत असेल पण त्याच्या घरी अनाचार होत असेल, असेही घडत असते. तर अशा वेळी प्रतिक्रमणे करावीच लागतील. जिथे जिथे टोचते, अशा सर्व जागी प्रतिक्रमणे करावीच लागेल. पण प्रत्येकाची प्रतिक्रमणे वेगवेगळी असतात.

मला पण प्रतिक्रमणे करावी लागतात. माझी प्रतिक्रमणे वेगळ्या प्रकारची असतात आणि तुमची पण वेगळ्या प्रकारची असतात. माझी

चूक तुमच्या बुद्धीला कळणारही नाही अशी असते. म्हणजेच त्या चुका सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम अशा असतात. त्याची आम्हाला प्रतिक्रमणे करावी लागतात. आम्हाला तर उपयोग चुकल्याबद्दलही प्रतिक्रमण करावे लागते. उपयोग चुकला तर आम्हाला चालणारच नाही ना? आम्हाला या सगळ्यांबरोबर बोलावे लागते, प्रश्नांची उत्तरे द्यावी लागतात, तरीही आम्हाला उपयोगातच राहायचे असते.

जोपर्यंत आमच्यात सहजपणा असतो, तोपर्यंत आम्हाला प्रतिक्रमणांची आवश्यकता नसते. सहजपणात तुम्हालाही प्रतिक्रमणांची आवश्यकता नसते. सहजपणात फरक पडला तर मात्र प्रतिक्रमण करावे लागेल. तुम्ही आम्हाला जेव्हाही पाहाल, तेव्हा सहजतेतच पाहाल. जेव्हाही पाहाल, तेव्हा आम्ही त्याच स्वभावातच दिसू. आमच्या सहजपणात फरक पडत नाही!



## [ 4 ]

## प्रति-स्पंदनामुळे दु:ख परिणाम

आपल्यामुळे इतरांना दु:ख होत आहे, असे जे आपल्याला वाटते, हा आपला 'सेन्सिटिवनेस' (भावनाशीलता) नावाचा गुण आहे. 'सेन्सिटिवनेस' हा एक प्रकारचा आपला इगोइजम (अहंकार) आहे. तो इगोइजम जसा जसा विरघळू लागेल तसे तसे समोरच्याला आपल्याकडून दु:ख होणार नाही. जोपर्यंत आपला इगोइजम आहे तोपर्यंत समोरच्याला दु:ख होणारच.

**प्रश्नकर्ता :** ती तर तुमच्या अवस्थेची गोष्ट झाली! पण आता आमच्या प्रश्नांची उत्तरे मिळायला हवीत ना?

**दादाश्री :** हो, मिळायलाच हवीत.

**प्रश्नकर्ता :** परंतु यामुळे तर फक्त स्वत:चेच समाधान होईल ना?

**दादाश्री :** फक्त स्वत:चेच नाही, तर प्रत्येकाला हळूहळू समाधान मिळायलाच हवे. स्वत:चे समाधान झाले तरच समोरच्याचेही समाधान होईल. परंतु जोपर्यंत स्वत:चा 'इगोइजम' आहे तोपर्यंत समोरच्या व्यक्तीवर परिणाम होणारच असा नियमच आहे. त्या 'इगोइजम'चा विलय झालाच पाहिजे.

हे सर्व तर फक्त 'इफेक्टस्' (परिणाम)च आहेत! जगात दु:ख

अशी गोष्टच नाही. या सर्व फक्त 'रॉंग बिलीफस्' (चुकीच्या मान्यता) आहेत. त्यांनाच तो खऱ्या मानतो. आता त्याच्या दृष्टीने तर ते खरोखर तसेच आहे ना? म्हणून आपल्यावर कुठल्याही प्रकारचा परिणाम होऊच नये यासाठी आपल्याला कसे व्हायला हवे? तर आपल्याला चोख (शुद्ध) व्हायला हवे. आपण जर चोख झालो तर इतर सर्व चोख झाल्याशिवाय राहणारच नाहीत.

कोणत्याही बाबतीत समोरच्याचा दोष नाहीच, त्यांचा कसा दोष? त्यांना तर असेच वाटते की हा संसार हेच सुख आहे आणि हीच खरी गोष्ट आहे. असेच ते मानून बसले आहेत. त्यांना जर आपण तुमच्या मान्यता चुकीच्या आहेत असे सांगायला गेलो तर ती आपलीच चूक आहे! आपल्यातच काही तरी कमतरता आहे. हे मी माझ्या अनुभवाने पाहिलेले आहे. जोपर्यंत मला असे वाटत असे तोपर्यंत तसे सर्व इफेक्टस् (परिणाम) होत होते. परंतु मग जेव्हा माझ्या मनातून ते निघून गेले, शंका संपली, तेव्हा ते सर्व निघून गेले! या सर्व पायऱ्या पाहून, त्यांचा अनुभव घेत घेत मी चढलो आहे. तुम्ही म्हणता त्या सर्व पायऱ्या मी पाहिल्या आहेत. आणि त्यातून अनुभव घेत घेत मी वर चढलो आहे. मी सर्व पाहिलेले आहे, म्हणूनच मी तुम्हाला मार्ग दाखवू शकतो. मी जे या सर्व लोकांना ज्ञान देतो, तेव्हा त्यांना मी पाहिलेल्या पायऱ्यांवरच आणतो. मी जे जे अनुभवलेले आहे, तोच रस्ता तुम्हाला दाखवितो, दुसरा रस्ताच नाही ना?

पूर्वी जर कधी दुःखाचा विचार आला, तर आपण वाटेल ती जोखीम पत्करून त्यात दुसऱ्या सुखाची आयडिया (कल्पना) सेट करीत असू. चिंता होत असेल तर सिनेमा पाहायला जात असू, किंवा इतर काही करत असू. दुसऱ्या किंमतीवर त्या वेळेचे दुःख बाजूला सारत असू, पण स्वरूपाचे ज्ञान झाल्यावर आता तो दुसऱ्या किंमतीवर दुःख बाजूला सारत नाही. म्हणून आता त्याला खूप दुःख सहन करावे लागते, असे माझ्या अनुभवास आले आहे! मी स्वतः हा अनुभव घेतला आहे, कारण दुसऱ्यांच्या निमित्ताने आलेल्या दुःखाच्या वेळी सुखी होण्यासाठी

मी माझ्या मनाला दुसरे पर्याय दाखवतच नाही. आणि जग काय करते? की स्वत:चे दु:ख दूर करण्यासाठी इतर विषयांत गुंतते, म्हणजेच माणूस त्या दु:खाला इकडून तिकडे ढकलतो. सर्व जग हेच तर करते ना? जरासे दु:ख आले तर पुंजी खर्च करत बसतो ना? आतमध्ये किती सामान भरले आहे? आणि आपण तर आता ह्याला (फाइल नं 1 ला) सांगतो की हे दु:ख भोगूनच घे. आपण पुंजी खर्च करू नये. पुंजी तशीच्या तशी अनामत राखावी.

दु:ख आले तर लोक त्यावर औषध चोपडतात. अरे, असे केल्याने तर उलट तू जोखीम वाढवत आहेस! त्या दु:खाला जर तू अनुभवपूर्वक पाहिलेस तर त्याची जोखीम कमी होईल. धक्के मारून दु:ख जाणार नाही. उलट ते तर तू वाढवत आहेस. शिल्लकच ठेवत आहेस. जो एक दु:ख पार करील, तो मग अनंत दु:खे पार करील. मग तर तो दु:ख पार करणारा लुटारूच झाला! मी तर कित्येक दु:खे पार केली आहेत, त्यामुळे मी लुटारू (विशेषज्ञ – तज्ज्ञ)च झालो आहे ना!



# [ 5 ]

## व्यवहारातील गुंता

**प्रश्नकर्ता :** व्यवहारात ज्या गाठी फुटतात, त्या अशा फुटतात की त्यांचे 'समाधान' शोधणे कठीण होते.

**दादाश्री :** आपली ही जी 'पाच वाक्ये' आहेत ती शेवटी समाधान मिळवून देतील अशीच आहेत. लवकर मिळेल किंवा उशीरा मिळेल पण समाधान मिळेलच मिळेल. बाकी, इतर कुठल्याही प्रकारे समाधान होणार नाही, म्हणूनच हे जग अत्यंत गुह्य असे कोडे आहे. 'दि वर्ल्ड इज दि पझल इटसेल्फ.' ते कधी सुटतच नाही. स्वतः दिवसभर व्यवहारात गुरफटलेलाच असतो, मग तो कसा काय प्रगती करणार? काही ना काही तरी कोडी उत्पन्न होतच राहतात. समोर कोणी भेटला की कोडे हजर.

**प्रश्नकर्ता :** एक कोडे सुटते ना सुटते तर तेवढ्यात दुसरे कोडे आ वासून उभेच असते.

**दादाश्री :** हो, हे तर कोड्यांचे संग्रहस्थानच आहे. परंतु जर तू स्वत:ला ओळखलेस तर तुझे कल्याण झालेच समज! नाहीतर ही कोडी आहेतच बुडण्यासाठी! ही सगळी परकी पीडा आहे, असे जरी समजले तरी ते अनुभव ज्ञान आहे. ही पीडा माझी नाही, परकी आहे; असे अनुभवास आले तर कल्याण होईल.

## 'क'ची करामत

आतमध्ये वेगवेगळ्या प्रकारचे 'क' बसलेले आहेत. 'क' म्हणजे करविणारे. लोभक, मोहक, क्रोधक, चेतक... मोहक मोह करविणारा आहे. आपल्याला मोह करायचा नसला तरी पण तो मोह करवितो!

**प्रश्नकर्ता :** मनात सारखे असे वाटत राहते की हे आपण जाणूनबुजून का ओढवून घेत आहोत? हा बंधनात पडत आहे की सुटत आहे, असा विचार मी का करावा?

**दादाश्री :** नाही, तसे विचार करायचे नसतील तरी पण तो 'क' तुमच्याकडून विचार करवितो. तुम्हाला आतमध्ये गुंतवतच राहतो. आणि इतर कोणासाठी विचार करावा असे हे जग नाहीच मुळी. त्यात जर कोणी असा विचार करू लागला तर त्याचे काय होईल? मार खावा लागेल (खूप त्रास सोसावा लागेल). दुसऱ्यांच्या उठाठेवी करण्यासाठी हे जग नसतेच. फक्त तुमची स्वत:ची 'सेफ साइड' (बाजू सुरक्षित) करण्यासाठी हे जग आहे.

**प्रश्नकर्ता :** पण आता या उठाठेवी माझ्या डोक्यात घुसल्या आहेत, तर मी त्या काढू कशा?

**दादाश्री :** तुम्ही त्यांना ओळखले पाहिजे की हे तर शत्रु आहेत आणि हे नातेवाईक आहेत. असे ओळखल्यानंतर मग आपण शत्रुंची आठवणच काढायची नाही.

## ज्ञानी पुरुषांची करुणा आणि समता

**प्रश्नकर्ता :** पण ते डोक्यात असे घुसलेले असते की ते तिथून निघतच नाही.

**दादाश्री :** पाहा ना! तुमची माझ्यावर केवढी भक्ती आहे, हे सर्व मला चांगलेच माहीत आहे. तरी पण तुम्हाला कधी कधी असे वाटते ना की 'दादा' असे आहेत.

**प्रश्नकर्ता :** अहो, कधी कधी 'दादां'ना शिव्यासुद्धा देतो. दादांना नाही, तर अंबालाल पटेलला!

**दादाश्री :** ते सर्व मला घरबसल्याच कळते. बघा ना, हे सर्व 'क' तुम्हाला कसे फसवितात आणि मार खायला लावतात? पण आम्ही तुमच्याबद्दल करुणा बाळगतो, की मार खात खात कधी ना कधी तरी समंजस होतील. कधीतरी त्यांना समजेल. तुम्हाला हा मार का बरे खायला लावतात? मला काय देणेघेणे? दादांना काय देणेघेणे? ज्यांच्यामुळे मला मार खावा लागतो त्यांच्याशी मी का बरे मैत्री केली? कधीतरी तुम्हाला असा अनुभव येईल.

**प्रश्नकर्ता :** दादा, तो अनुभव आला आहे! येईल नाही, तर आलाच आहे. अनुभव कसा तर मला असे वाटत असे की हा म्हातारा खूप त्रास देतो. म्हणजे मी तर या पटेलला होळीचा नारळ बनवला होता पण शेवटी या म्हाताऱ्यानेच सर्व काही ठीक केले!! मी म्हटले, सुटलो रे बाबा! नाहीतर दादा, मी तर तुम्हाला इतक्या शिव्या दिल्या होत्या की काही शिल्लकच ठेवले नव्हते. तरी पण आतून मात्र असेच वाटत असे की 'हे जे दादा आहेत, ते एकदम सच्चे आहेत.'

**दादाश्री :** आम्हाला पण ते सर्व घरबसल्या कळते. मी तुम्हाला एकदा म्हटलेलेही की तुम्ही मला उलट सुलट बोललात तरी माझी काही हरकत नाही पण तुम्ही फक्त इथे येत राहा. एक ना एक दिवस सगळे धुतले जाईल! तुम्ही उलट सुलट बोलता त्याला आम्ही महत्त्व देत नाही. आम्ही फक्त तुमचे श्रेय कसे होईल एवढेच पाहत असतो. तुमचे, तुमच्या घरच्यांचे, सगळ्यांचे श्रेयच पाहत असतो. तुम्ही तर तुमच्या प्रकृतीप्रमाणे बोलत असता. पण प्रत्यक्षात तुमची दृष्टी तशी नाही. तुमची दानत पण तशी नाही, तुमचे विचार पण तसे नाहीत, हे सर्वच आम्ही जाणतो.

म्हणून आता 'हे मार देणारे आहेत आणि हे मित्र आहेत' या प्रकारे तुम्ही 'माल' ओळखा. मार देणारे आले तर त्यांना 'या भाऊ, तुमचेच घर आहे' असे म्हणून त्यांना परतवून लावा.

आत जे दाखवतात ते सर्व खोटे आहे, शंभर टक्के खोटेच दाखवत आहेत, असे आता तुम्हाला समजते ना?

## शंकेचे समाधान नसतेच

**प्रश्नकर्ता :** पण दादा, समाधानी राहणे खूप कठीण जाते.

**दादाश्री :** समाधान कसे होणार? जगात शंकेचे समाधान होत नाही! खऱ्या गोष्टींचे समाधान होऊ शकते, शंकेचे समाधान कधीच होऊ शकत नाही.

शंका म्हणजे काय? तर स्वतःच्या आत्म्याला बिघडवण्याचे साधन. शंका म्हणजे जगातील सर्वात वाईट गोष्ट आणि शंका शंभर टक्के चुकीचीच असते आणि जिथे शंका करत नाही, तिथेच शंका (करण्यासारखी) असते. जिथे विश्वास ठेवतो, तिथेच शंका असते आणि जिथे शंका असते, तिथे तर काहीच नसते. अशा प्रकारे तुम्ही सगळीकडून मार खात आहात. 'आम्ही' तर 'ज्ञाना'ने हे पाहिले आहे की तुम्ही सगळ्याच बाजूंनी मार खात आहात.

**प्रश्नकर्ता :** ही शंकेची गोष्ट मला समजली नाही; जिथे विश्वास ठेवतो तिथेच शंका असते.

**दादाश्री :** त्याचे काय आहे की, तुम्ही कोणत्या ज्ञानाच्या आधारावर ह्या दृष्टीचे मोजमाप ओळखणार? अरे, उघड्या डोळ्यांनी पाहिले असेल तरी ते चुकीचे निघते! हे तर तुम्ही बुद्धीजन्य ज्ञानाने, विचार करून पाहता! म्हणून ते तुम्हाला त्रास देऊन देऊन पिळून काढील! म्हणूनच आम्ही सांगतो की बुद्धीपासून दूर राहा. बुद्धी अजिबात शांत बसू देत नाही. तुमचे मात्र खूप चांगले आहे. तुमची भावना चांगली आहे, म्हणून तर तुम्ही परत ह्या मार्गावर वळलात.

**प्रश्नकर्ता :** नंतर मी प्रतिक्रमणाचा जोर खूप वाढवला होता. पहाटे लवकर उठून प्रतिक्रमण करत असे!

**दादाश्री :** तुम्ही येथे अशी प्रतिक्रमणे शिकला होता, त्या

प्रतिक्रमणामुळे खूपच फायदा झाला. या प्रतिक्रमणामुळेच तर तुम्ही जिवंत आहात. तुमचे तर एवढेसेच कुटुंब आहे. माझ्या कुटुंबात तर किती सदस्य आहेत. परंतु कोणाबद्दलही मला शंका नाही.

## तिरडी निघताना सोबत कोण?

**प्रश्नकर्ता :** 'मी म्हणतो ते खरे आहे', असे मानू नये, असे आहे का?

**दादाश्री :** जरी खरे असले तरी पण आपल्याला काय? माझे म्हणणे असे आहे की तिरडी निघताना तर एकटेच जायचे असते ना? मग उगाच ही कटकट डोक्यावर घेऊन कशाला फिरायचे?

*जन्म पहेलां चालतो ने मुआ पछी चालशे,*
*अटके ना कोई दि' व्यवहार रे, सापेक्ष संसार रे...* - नवनीत

अनंत जन्मांत याच त्रासात पडलेला आहे! ही तर या जन्माची बायको-मुले आहेत, पण प्रत्येक जन्मात प्रत्येक वेळी बायको-मुलेच ठेवली आहेत. राग-द्वेष केले आहेत आणि कर्मेच बांधली आहेत! नातीगोती असे काही नसतेच. ही तर कर्मे फळे देत असतात. घटकेत प्रकाश देतात आणि घटकेत काळोख देतात. घटकेत फटके मारतात आणि घटकेत फुले वाहतात! मग यात कसली नातीगोती?

हे सर्व तर अनादिकाळापासून चालूच आहे! मग ह्याला चालविणारे आपण कोण? आपण आपल्या कर्मातून कसे सुटू, हेच 'पाहायचे' आहे. मुलांचे आणि आपले काहीच देणेघेणे नाही. ही तर उगाचच उपाधी! सर्व लोक कर्मांच्या आधीन आहेत. जर खरे नाते असते ना, तर घरातील सर्वच ठरवतील की आपण घरी भांडायचे नाही. पण इथे तर हे लोक दोन-तीन तासातच भांडू लागतात! कारण कोणाच्याच हातात सत्ता नाही ना! हे सर्व कर्मांचे उदय आहेत. फटाके फुटतात, तसे फटाफट फटाफट फुटतात. कोणी सखाही नाही आणि कोणी सोयराही नाही. मग शंका-कुशंका करण्याचा प्रश्नच नाही ना! 'तुम्ही' स्वतः 'शुद्धात्मा' आणि हा 'तुमचा' शेजारी, म्हणजेच हे शरीरच तुम्हाला दुःख देते ना! आणि मुले

तर 'तुमच्या' 'शेजाऱ्या'ची मुले. त्यांच्याशी तुमचे काय देणेघेणे? आणि शेजाऱ्याची मुले ऐकत नाहीत, आपण जर त्यांना काही सांगायला गेलो तर मुले काय म्हणतात, 'आम्ही कशी काय तुमची मुले?' आम्ही तर 'शुद्धात्मा आहोत'! कोणाला कोणाची पर्वाच नसते!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे ह्याचे सार काढले तर सगळे जण हिशोब वसूल करायला आले आहेत. आणि आम्ही हिशोब चुकतेही करत आहोत पण त्यात 'समभावाने निकाल' होतो की नाही, एवढेच आम्हाला हवे आहे.

**दादाश्री :** 'समभावाने निकाल' झाला तर कल्याणच होईल.

**प्रश्नकर्ता :** आम्ही तर वाकडे वागलो पण तुम्ही कृपा केली. पण आता ते सर्व चोख झाले, हे मात्र खरे आहे.

**दादाश्री :** तुम्ही दादांबरोबर जोडलेलेच राहिलात, हेच खूप झाले. कधीतरी तुम्हाला ह्याचे सार समजेल की हे सर्व खरे होते.

**प्रश्नकर्ता :** अहो, कधीतरी कशाला? आजपासूनच, उद्याचा काय भरवसा? म्हणून आता आम्हाला अशी शक्ती द्या की जी काही थोडी कर्मे शिल्लक आहेत, ती आम्ही संपवू शकू आणि आमची बुद्धी उलट दिशेने जाणार नाही.

**दादाश्री :** तुम्ही इथे तासभर येत राहिलात ना, तर तेवढे विरघळत विरघळत संपून जाईल.

## 'ज्ञाना'ने शंकेचे शमन

**प्रश्नकर्ता :** काही लोक असे असतात की त्यांच्याबद्दल आपले अभिप्राय असतात की 'हा माणूस चांगला आहे, हा लबाड आहे, हा लुच्चा आहे, आणि हा तर लुटायलाच आला आहे.'

**दादाश्री :** अभिप्राय बांधले जातात, तेच बंधन आहे. आमच्या खिशातून काल कोणी पैसे काढून घेऊन गेला असेल आणि आज जर तो परत इथे आला तरी आम्हाला तो चोर आहे अशी शंका होत नाही.

कारण काल त्याच्या कर्माचा उदय तसा होता, आणि आज त्याचा उदय कसा असेल ते कसे सांगता येईल?

**प्रश्नकर्ता :** पण प्राण आणि प्रकृती बरोबरच जातात.

**दादाश्री :** प्राण आणि प्रकृतीकडे पाहायचे नसते. आपले त्याच्याशी काहीच देणेघेणे नाही. तो बिचारा कर्माच्या आधीन आहे! तो त्याची कर्मे भोगत आहे, आपण आपली कर्मे भोगत आहोत. आपण सावध राहणे आवश्यक आहे.

**प्रश्नकर्ता :** त्यावेळी त्याच्याबद्दल समभाव राहील किंवा राहणार सुद्धा नाही.

**दादाश्री :** जर आमच्या म्हणण्यानुसार तुम्ही कराल की हे सर्व कर्माच्या आधीन आहे, तर तुमचे काम होईल. आणि जर आपले जायचे असेल तरच जाईल. म्हणून तुम्ही घाबरण्याचे काहीच कारण नाही.

काळोख्या रात्री गावात दिव्याच्या प्रकाशात खोलीत सापाला घुसताना पाहिले, तर तुम्हाला झोप येईल का?

**प्रश्नकर्ता :** नाही, भीती वाटेल.

**दादाश्री :** आणि जर तुम्हाला एकट्यालाच हे माहीत असेल, तर बाकीच्यांचे काय होईल?

**प्रश्नकर्ता :** ते तर आरामात झोपतील!

**दादाश्री :** तेव्हा भगवंत म्हणाले की ते सर्व तर आरामात झोपले आहेत, मग तू का झोपत नाहीस? तेव्हा तो म्हणतो, 'मी सापाला येताना पाहिले आहे, जाताना पाहीन तेव्हाच झोपेन.' म्हणजे साप घुसल्याचे ज्ञान झाले आहे. साप निघून गेल्याचे ज्ञान होईल तेव्हाच सुटता येईल. परंतु जोपर्यंत मनात ती शंका असेल तोपर्यंत सुटता येत नाही.

**प्रश्नकर्ता :** पण निघताना पाहिले नाही, तोपर्यंत शंका कशी जाईल?

**दादाश्री :** 'ज्ञानीं'च्या 'ज्ञाना'ने शंका जाईल! कोणीही, सापही

स्पर्श करू शकेल असे हे जग नाही. 'आम्ही' ज्ञानात पाहून सांगतो की हे जग क्षणभरदेखील अन्यायी झालेले नाही. जगातील कोर्टे, न्यायाधीश, मध्यस्थ, सगळे अन्यायी होऊ शकतील, पण जग कधीच अन्यायी झालेले नाही. म्हणून शंका घेऊ नका.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे भीती बाळगू नये? साप पाहिला तर पाहिला, तरी पण भीती बाळगायची नाही?

**दादाश्री :** भीती बाळगायची नाही म्हटले तरी भीती तर वाटतेच. आतल्या आत शंका वाटतच राहील. यात कोणी काही करू शकत नाही. ज्ञानात राहिल्याने शंका जाते.

## उपायात उपयोग कशासाठी?

या जगात असे कोणी जन्मालाच आलेला नाही की जो तुमचे नावही घेईल! आणि जर कोणी असा असेल तर तुम्ही लाखो उपाय केलेत तरी तुम्ही काहीही करू शकणार नाही. तेव्हा आता कुठे जावे? लाखो उपाय करावे? नाही, त्याने काहीही निष्पन्न होणार नाही. म्हणूनच सर्व कामे सोडून 'आत्म्याकडे' वळा.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे मूळ गोष्टच परत समोर आली.

**दादाश्री :** हो, जे होत आहे ते 'पाहत' रहा की काय होत आहे? त्या सर्व गोष्टी 'पर' आहेत आणि 'पराधीन' आहेत. जे होत आहे तोच न्याय आहे आणि तेच 'व्यवस्थित' आहे. चांगल्या माणसाला फासावर चढवतात तोही न्याय आहे आणि दुष्ट माणूस सुटतो तोही न्याय आहे. तुम्हाला ते पाहाता येत नाही, की कोण चांगला आणि कोण वाईट? तुम्हाला त्याची तपासणी करता येत नाही. तुम्ही तुमच्या मान्यतेनुसार ती केस पाहता.

## निज स्पंदनांमुळे प्राप्त होते परिभ्रमण

**प्रश्नकर्ता :** म्हणजे 'बरोबर आहे, चूक आहे', असा अर्थ काढूच नये, असेच ना?

**दादाश्री :** बरोबर-चूक या सर्व गैरसमजाच्या गोष्टी आहेत. स्वतःच्या समजुतीनुसार स्वतःच न्यायाधीश बनून बसला आहे.

जर तुम्ही कोणाला त्रास देत नसाल, तर कोणीही तुम्हाला त्रास देऊ शकणार नाही. याची मी तुम्हाला गॅरंटी लिहून देतो. इथे पुष्कळ साप फिरत असतील तरी ते तुम्हाला शिवणारही नाहीत, असे गॅरंटीवाले हे जग आहे.

हे ज्ञानी कशा प्रकारे सहीसलामत आणि आनंदात राहत असतील? कारण ज्ञानींनी हे जग जाणून घेतले आहे की 'काहीही होणार नाही, कोणी नावही घेणारा नाही. सर्वांच्यात मीच आहे, मीच आहे, मीच आहे, दुसरा कोणी नाहीच!'

हे जग समजणे खूप आवश्यक आहे. लोक समजतात तसे हे जग नाही. शास्त्रांत लिहिले आहे तसे हे जग नाही. शास्त्रांत तर पारिभाषिक भाषेत लिहिलेले आहे, ते काही सामान्य माणसांना समजेल असे नाही.

तुमची ढवळाढवळ बंद झाली तर जगातील कोणीही तुमच्यात ढवळाढवळ करणार नाही. तुमच्या ढवळाढवळीचेच हे सर्व परिणाम आहेत! जेव्हा तुमची ढवळाढवळ बंद होईल तेव्हा तुमचा कोणताच परिणाम तुमच्याकडे येणार नाही. तुम्ही संपूर्ण जगाचे, संपूर्ण ब्रह्मांडाचे स्वामी आहात. तुमच्यावर कोणीही उपरी (वरिष्ठ, बॉस) नाही. तुम्ही परमात्माच आहात. तुम्हाला विचारणारा कोणीही नाही.

हे सर्व तुमचेच परिणाम आहेत. आजपासून तुम्ही कोणावरही स्पंदने टाकण्याचे, किंचितमात्र कोणासाठीही विचार करण्याचे बंद करा. विचार आलेच तर प्रतिक्रमण करून धुऊन टाका, म्हणजे संपूर्ण दिवस कोणाहीबद्दलच्या स्पंदनाशिवाय जाईल! या प्रमाणे दिवस घालवता आले तरी पुष्कळ झाले, तोच पुरुषार्थ आहे.



## [ 6 ]

## जगाच्या कोर्टातून निर्दोष सुटका कधी?

आपल्याकडून कोणालाही किंचितदेखील दु:ख दिले गेले, तर कोर्टात केस चालूच राहणार! जोपर्यंत कोर्टात भांडणे आहेत, तोपर्यंत सुटता येणार नाही. हे सर्व कोर्टाच्या भांडणात आलेले लोक आहेत. आता जर कोर्टातील भांडणे मिटवायची असतील तर आपल्याला कोणी शिवी दिली असेल, त्याला आपण सोडून द्यायला हवे आणि आपण कोणाला शिवी देता कामा नये. कारण आपण खटला भरला तरीही खटला चालूच राहील! जर आपण फौजदारी गुन्हा दाखल केला की मग वकीलही शोधावा लागेल. आता आपल्याला इथून सुटून जायचे आहे, इथे करमत नाही. म्हणून आपण मार्ग काढायला हवा, सर्व काही सोडायला हवे!

कोणाला किंचितही दु:ख दिले तरी कोणताही जीव मोक्षाला जाऊ शकत नाही. मग ते अगदी साधू महाराज असोत की आणखी कोणीही असोत. अगदी जरी शिष्याला दु:ख होत असेल तरी पण साधू महाराजांना येथे अडकून राहावे लागेल, चालणारच नाही!

तसे पाहिले तर अज्ञानी तर सर्वांना दु:खच देत असतो. जरी दु:ख देत नसेल तरी आतमध्ये दु:खाचेच भाव चालू असतात. 'अज्ञानता म्हणजेच हिंसा आहे आणि ज्ञान म्हणजेच अहिंसक भाव आहे.'

तुम्हाला आता कोणाला दु:ख द्यायची इच्छा तर होत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** कधी कधी दिले जाते.

**दादाश्री :** दु:ख दिले गेले तर तुम्ही काय करता?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण.

**दादाश्री :** प्रतिक्रमण केले की मग कोर्टात केस जाणार नाही. 'भाऊ, तुझी माफी मागतो.' असे करून निकाल करून टाकला.

कोणाला थोडेसेही दु:ख होईल असे शब्द आमच्याकडून निघतच नाहीत. समोरची व्यक्ती तर वेडेपणा करील, त्याला तर कसलीच पर्वा नाही ना? परंतु ज्याला सुटायचे आहे त्यालाच काळजी असते ना?

अर्थात जर दोष होत नसतील तर प्रतिक्रमण करायची गरज नाही. तुमच्याकडून दोष झाला तरच प्रतिक्रमण करा. समोरचा जर म्हणाला 'साहेब, दोष होणारच नाहीत, इतकी सारी शक्ती तर माझ्याजवळ नाही. दोष तर होऊन जातात.' तर मग आम्ही त्यांना सांगू 'शक्ती नसेल तर प्रतिक्रमण करा.'

जर कोणी आपल्याला वेडे-वाकडे बोलला, आणि त्यावेळी जर आपण त्याला उत्तर दिले, मग ते उत्तर जरी कितीही चांगले असो, पण त्यामुळे जर किंचितही स्पंदन फेकले गेले, तरी चालणार नाही. समोरच्याला काहीही बोलण्याची सूट आहे. तो स्वतंत्र आहे. आता त्या मुलांनी दगड फेकले तर ती (त्यासाठी) स्वतंत्र नाहीत का? जोपर्यंत पोलिस अडवत नाही, तोपर्यंत स्वतंत्रच आहेत. समोरचा जीव तर वाटेल ते करील. तो जर वाकडा वागला आणि वैर धरले तर मग तो तुम्हाला लाखो जन्म मोक्षाला जाऊ देणार नाही! म्हणूनच आम्ही म्हणतो 'सावध राहा. कोणी वाकडा भेटला तर काहीही करून, भाऊ साहेब, भाऊ साहेब करून देखील सुटून जा! या जगातून सुटका करून घेणेच योग्य आहे.'

## दु:ख दिल्याचे प्रतिस्पंदन

या जगात तुम्ही कोणाला दु:ख द्याल तर त्याची प्रतिस्पंदने

तुमच्यावर पडल्याशिवाय राहणार नाहीत. स्त्री-पुरुषाने घटस्फोट घेतल्यानंतर पुरुषाने पुन्हा लग्न केले तरी पण जर त्या स्त्रीला दु:ख वाटत असेल तर त्याची प्रतिस्पंदने त्या पुरुषावर पडतीलच आणि त्याला मग तो हिशोब चुकता करावाच लागेल.

**प्रश्नकर्ता :** हे जरा सविस्तर सांगा ना!

**दादाश्री :** जोपर्यंत तुमच्या निमित्ताने दुसऱ्या कोणाला दु:ख पोहोचत असेल, तर त्याचा परिणाम तुमच्यावर होणारच आणि तो हिशोब तुम्हाला चुकवावा लागणारच, म्हणून सावध राहा. असे आम्ही सांगू इच्छितो.

तुम्ही जर ऑफिसमध्ये असिस्टंटला फटकारलेत, तर तुमच्यावर त्याचा परिणाम होणार की नाही? होणारच. तर सांगा आता, हे जग दु:खमुक्त कसे होऊ शकेल? ज्याच्यापासून दुसऱ्या कोणालाही किंचितही दु:ख होत नाही, तो स्वत: सुखी असतो. यात तर दुमत नाहीच. आम्ही तुम्हाला ज्या आज्ञा देतो त्या आज्ञांमुळे तुम्ही सर्व दु:खातून मुक्त व्हाल, अशा त्या आज्ञा आहेत. आणि आज्ञा पालन करण्यात तुम्हाला काहीही अडचण येणार नाही. खाण्या-पिण्याची, हिंडण्या-फिरण्याची सगळीच सूट. सिनेमा पाहायला जायचे असेल तर तीही सूट! कोणी म्हणेल, मला अंघोळीला तीन बादल्या पाणी पाहिजे, तर आम्ही म्हणू तू चार बादल्या घे. आमच्या आज्ञांमुळे कोणताही त्रास होणार नाही.

म्हणजे कुठलाही परिणाम तुम्हाला सोडत नाही. जर तुम्ही मुलाला सुधारायला जाल, परंतु त्यामुळे जर त्याला दु:ख झाले तर त्याचा परिणाम तुमच्यावर होईल. म्हणून तुम्ही असे बोला की ज्यामुळे त्याच्यावर परिणाम होणार नाही आणि तो सुधारेल. तांब्याच्या आणि काचेच्या भांड्यात फरक नसतो का? तुम्ही तांब्याच्या आणि काचेच्या भांड्यांना सारखेच समजता का? तांब्याच्या भांड्याला पोचा पडला तर तो काढता येतो. पण काचेचे भांडे ते तर फुटूनच जाईल! मुलाचे पूर्ण आयुष्यच उद्ध्वस्त होईल.

या अज्ञानामुळेच तर खूप त्रास होतो. ह्याला सुधारण्यासाठी तुम्ही बोलता, त्याला सुधारण्यासाठी तुम्ही बोलता, पण तुमच्या बोलण्यामुळे त्याला जे दु:ख होते, त्याचा परिणाम तुमच्यावर होईल.

**प्रश्नकर्ता :** या काळात मुलांना सांगावे तर लागतेच ना?

**दादाश्री :** सांगायला हरकत नाही, पण अशा प्रकारे सांगा की ज्यामुळे त्याला दु:ख वाटणार नाही आणि त्याची प्रतिस्पंदने परत तुमच्यावर येणार नाहीत. तुम्ही ठाम ठरवले पाहिजे की 'मला कोणालाही किंचितदेखील दु:ख द्यायचे नाही.'

## आठवण-तक्रारींचे निवारण

आठवण कुठून येते? आठवणीला सांगावे, आमचे तुझ्याशी काही देणेघेणे नाही, आम्हाला काहीही नको आहे तरी पण तू का येतेस? तेव्हा ती म्हणेल, 'तुमची तक्रार आहे, म्हणून आले आहे.' तेव्हा आपण म्हणावे 'बरे, तर आता तुझा निकाल लावून टाकतो!'

जे जे काही आठवते त्याचे बसल्याबसल्या 'प्रतिक्रमण' करावे, आणखी काहीच करायचे नाही. ज्या रस्त्यांनी आम्ही सुटलो आहोत, तेच रस्ते तुम्हाला सांगितले आहेत. अगदी सरळ आणि सोपे रस्ते आहेत. नाहीतर या संसारातून सुटणे शक्यच नाही. ते तर महावीर भगवंत सुटले, नाहीतर सुटू शकत नाही. म्हणून तर भगवंतांना महा-वीर म्हणतात! तरीही त्यांचे किती उच्च आणि निम्न श्रेणीचे जन्म झाले होते.

ज्ञानींच्या सांगण्यानुसार चालाल, तर सर्व मार्गी लागेल.

आठवण का येते? अजूनही कुठेतरी *चोंट* आहे (चित्त चिकटलेले आहे). पण ती 'रिलेटिव्ह' *चोंट* म्हटली जाते; 'रियल' नाही.

'या जगातील कोणतीही विनाशी वस्तू मला नको.' असे तुम्ही ठरवले आहे ना? तरी पण आठवण का येते? म्हणून प्रतिक्रमण करा. प्रतिक्रमण करता करता परत आठवण आली, तर आपल्याला समजले पाहिजे की अजून तक्रार बाकी आहे! म्हणून पुन्हा प्रतिक्रमणच करावे.

**प्रश्नकर्ता :** दादा, जोपर्यंत त्याचे बाकी असेल तोपर्यंत प्रतिक्रमणे होतच राहतात. त्याला बोलवावे लागत नाही.

**दादाश्री :** हो, त्याला बोलवावे लागत नाही. आपण निश्चित केलेले असते त्यामुळे आपोआप होतच राहतात.

**प्रश्नकर्ता :** (कर्मांचे) उदय तर येतच राहतात.

**दादाश्री :** उदय तर येतील. पण उदय म्हणजे काय? तर आत जे कर्म होते, ते फळ द्यायला समोर आले. मग ते कडू असेल किंवा गोड असेल, जसा तुमचा हिशोब असेल तसे! कर्मांचे फळ समोर आल्यावर जर आपल्याला चेहऱ्यावर नाराजी दिसली तर समजावे की ते कर्म आत दु:ख देण्यासाठी आले आहे, आणि जर चेहऱ्यावर आनंद दिसला तर समजावे की उदय सुख देण्यासाठी आले आहे. अर्थात उदय येईल तेव्हा आपण समजायला हवे की हे आले आहेत, तर आता त्याचा 'समभावाने निकाल' करायचा आहे.

**प्रश्नकर्ता :** पण त्यावेळी प्रकृती थोडासा जोर लावतेच ना? प्रकृतीचा स्वभाव तर बाहेर येतोच ना?

**दादाश्री :** हो, ते सर्व बाहेर येईल. तरी पण 'आपण' 'पाहत' राहायचे. तो सर्व आपलाच हिशोब आहे.

**प्रश्नकर्ता :** प्रकृतीचा हिशोब तर पूर्ण करायचा आहे ना?

**दादाश्री :** त्यात आपल्याला काहीच करायचे नाही. तो तर आपोआपच होत राहतो. 'आपण' तर फक्त 'पाहत' राहायचे की किती हिशोब बाकी राहिला आहे! 'आपण' ज्ञाता-द्रष्टा आणि परमानंदी, आपल्याला सगळे काही समजते.

प्रतिक्रमण करतात ते तर 'चंदुभाई' करतात त्यात आपले काय देणेघेणे? 'आपण' 'पाहत' राहायचे की 'चंदुभाई'ने प्रतिक्रमण केले की नाही केले? की मग परत पुढे ढकलून दिले? ढकलले असेल तर ते पण तुम्हाला समजेल.

'चंदुभाई' काय करत आहेत, जे जे काही करत आहेत ते सर्व 'आपण' 'पाहत' राहायचे, याला पुरुषार्थ म्हणतात. 'पाहायचे' राहिले तर तो प्रमाद.

**प्रश्नकर्ता :** 'पाहत' राहणे हे शुद्धात्म्याचे काम आहे का?

**दादाश्री :** स्वरूपाचे ज्ञान झाल्यावर ते काम होते; त्याशिवाय होतच नाही.

आठवण का आली? विनाकारण तर आठवण येत नाही, काहीतरी तक्रार असेल तरच येईल. आम्हाला का बरे कशाचीही आठवण येत नाही? म्हणून ज्याची ज्याची आठवण येईल, त्याचे प्रतिक्रमण करत राहावे.

**प्रश्नकर्ता :** जो जुना भरलेला माल आहे, त्याची आठवण यायला हवी. असे असते का?

**दादाश्री :** त्याची आठवण येतेच. जो माल संपणार आहे किंवा कर्मबंधन करविणारा आहे, त्याची आठवण येतेच. स्वरूपाचे ज्ञान झालेले असेल तर तो माल संपतो आणि अज्ञान असेल तर त्याच मालाने कर्मबंधने होतील! माल तोच असतो, पण अज्ञानदशेत तो बीजरूपाने असतो आणि ज्ञानदशेत ते बीज शिजवून खाऊन टाकले, असे होते. एकदा शिजल्यावर बीज परत कसे उगवेल?

## हार्टिली पश्चात्ताप

आतमध्ये पडलेल्या गाठीतून विचार फुटतात (बाहेर पडतात). एविडेन्स (संयोग) मिळाला की विचार फुटतात. एरवी तर तो ब्रह्मचाऱ्यासारखा असतो, पण रस्त्यात संयोग मिळाला की विषयाचे विचार येतात!!

**प्रश्नकर्ता :** ते विचार वातावरणांतूनच येतात ना? संयोगिक पुराव्यांच्या आधारावरच त्याचे संस्कार, त्याच्याबरोबरचे मित्र, हे सर्व एकदमच मिळतात ना?

**दादाश्री :** हो, बाहेरचा संयोग मिळायला पाहिजे. त्या आधारानेच मनाच्या गाठी फुटतात. नाहीतर फुटत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** त्या विचारांचा स्वीकार करण्यासाठी मार्गदर्शन करणारा कोण आहे?

**दादाश्री :** ते सर्व नैसर्गिकच आहे. पण तेव्हा तुम्हाला हे समजले पाहिजे की ही बुद्धी चुकीची आहे. असे समजले की मग तो त्या गाठी संपवून टाकील. या जगात फक्त ज्ञान हाच प्रकाश आहे. हे माझ्यासाठी हितकर नाही, असे त्याला समजले, असे ज्ञान त्याला प्राप्त झाले, तर तो त्या गाठी संपवून टाकील.

**प्रश्नकर्ता :** पण तसे तर सर्वच जण असे मानतात की 'खोटे बोलणे पाप आहे, विडी ओढणे वाईट आहे, मांसाहार करणे, चुकीचे आचरण करणे, हे सर्व वाईट आहे.' तरी पण लोक चुकीचे करतच राहतात. असे का?

**दादाश्री :** 'हे सर्व चुकीचे आहे, असे करता कामा नये.' असे तर सर्वच बोलतात पण ते वरकरणी बोलतात. 'सुपरफ्लुअस' बोलतात, 'हार्टिली' (मनापासून) बोलत नाहीत. नाहीतर जर ते 'हार्टिली' बोलतील तर काही काळानंतर दोष निघूनच जातील! तुमचा कितीही वाईट दोष असो, पण त्यासाठी जर तुम्हाला हार्टिली पश्चात्ताप होत असेल, तर मग पुन्हा तो दोष होणार नाही. आणि समजा परत झालाच, तरी हरकत नाही, पण खूप पश्चात्ताप करत राहा.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे माणूस सुधारण्याची शक्यता आहे का?

**दादाश्री :** हो, खूपच शक्यता आहे. पण सुधारणारा हवा. मात्र त्यासाठी 'M.D', 'F.R.C.S' डॉक्टर चालणार नाही. घोटाळेवाला चालणार नाही, त्यासाठी तर दोष 'सुधारणारा' हवा.

आता काही लोकांना असे वाटते की आम्ही खूप पश्चात्ताप केला आहे. तरी पण तो दोष पुन्हा झाला तर त्याला असे वाटते की इतका

पश्चात्ताप करूनही पुन्हा असे का होत आहे? खरे तर जर 'हार्टिली' पश्चात्ताप केला असेल तर त्याने दोष निश्चितच निघून जातो.

## दोषांची शुद्धी

स्वत:च्या चुका दिसतात, तो आत्मा आहे. स्वत: स्वत:साठी निष्पक्षपाती झाला, तो आत्मा आहे. तुम्ही आत्मा आहात, जर शुद्ध उपयोगात राहिलात तर तुम्हाला कोणत्याच कर्माचा स्पर्श होणार नाही. काही लोक मला म्हणतात की तुमचे ज्ञान खरे आहे, पण तुम्ही तर मोटारीतून हिंडता, तर ती जीवहिंसा नाही का? तेव्हा मला सांगावे लागते की, 'मी शुद्ध उपयोगी आहे.' आणि शास्त्रे काय सांगतात,

*'शुद्ध उपयोग ने समताधारी, ज्ञानध्यान मनोहरी रे;*
*कर्म कलंक को दूर निवारी, जीव वरे शिवनारी रे.'*

स्वत:चे दोष दिसू लागले, तेव्हापासूनच तरून जाण्याचा उपाय हाती लागला. चंदुभाईमध्ये जे जे दोष आहेत, ते सगळे दोष 'आपल्याला' दिसतात. जर स्वत:चे दोष दिसत नसतील तर ह्या 'ज्ञाना'चा उपयोगच काय? म्हणून कृपाळूदेवांनी म्हटले होते,

*'हुं तो दोष अनंतनुं भाजन छुं करुणाळ,*
*दीठा नहीं निजदोष तो तरीए कोण उपाय?'*

(हे करुणाकरा, मी तर अनंत दोषांचे भांडार आहे, आणि जर मला माझे दोष दिसले नाहीत, तर मग मी तरणार कसा?)

दोष झाले तर हरकत नाही. पण त्यावर उपयोग ठेवायचा. उपयोग ठेवला तर (स्वत:चे) दोष दिसतच राहतील. आणखी काही करायची गरज नाही.

चंदुभाईला 'तुम्हाला' एवढेच सांगावे लागेल की तुम्ही प्रतिक्रमण करत राहा. तुमच्या घरातील सर्व सदस्यांशी तुम्हाला, 'माझ्याकडून पूर्वी काही दु:ख दिले गेले असेल, या जन्मात, संख्यात किंवा असंख्यात जन्मात राग-द्वेष, विषय-कषाय यामुळे मी जे जे दोष केले असतील,

तर त्या सर्व दोषांसाठी मी क्षमा मागत आहे.' अशा प्रकारे रोज एक-एक तास काढावा. घरातील प्रत्येक व्यक्तीसाठी, आसपासच्या वर्तुळातील प्रत्येकाला घेऊन, उपयोग ठेवून प्रतिक्रमण करत राहिले पाहिजे. असे केल्यानंतर हे सर्व ओझे हलके होईल. नाहीतर आपोआपच हलके होणार नाही. आम्ही जगात सर्वांबरोबर या प्रकारे निवारण केले आहे, म्हणून तर ही सुटका झाली.

जोपर्यंत समोरच्याचा दोष आपल्या मनात आहे तोपर्यंत चैन पडत नाही. प्रतिक्रमण केलेत तर तो संपेल. राग-द्वेष असणारी प्रत्येक चिकट 'फाइल' (गाढ ऋणानुबंध असलेली व्यक्ती किंवा संयोग) उपयोगात घेऊन प्रतिक्रमण करून शुद्ध करायची आहे. रागाची (आसक्ती, मोहाची) फाइल असेल, तर त्यासाठी हमखास प्रतिक्रमणे करायला हवीत.

प्रतिक्रमणे झाली तर मग कितीही वैर असो, तरी पण या जन्मातच सुटून जाल. प्रतिक्रमण हाच एकमेव उपाय आहे. महावीर भगवंतांचा सिद्धांत आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान असा आहे! जिथे आलोचना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान नाहीत, तिथे मोक्षमार्गच नाही.

आमच्यात स्थूल दोष किंवा सूक्ष्म दोष नसतात. ज्ञानींमध्ये सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम दोष असतात. ते इतर कोणासाठी किंचितमात्रही हरकतकर्ता नसतात. आमचे सूक्ष्माहून सूक्ष्म, अतिसूक्ष्म दोषदेखील आमच्या दृष्टीबाहेर जात नाहीत. आमच्याकडून दोष झाला आहे हे इतर कोणाला कळत नाही.

तुमचे दोषदेखील आम्हाला दिसतात, पण आमची दृष्टी तुमच्या शुद्धात्म्याकडे असते, तुमच्या उदयकर्माकडे नसते. आम्हाला सगळ्यांचे सगळे दोष कळतात. पण त्याचा आमच्यावर परिणाम होत नाही. म्हणूनच कवीने लिहिले आहे,

*'मा कधी खोड काढे नहीं,*
*दादानेय दोष कोईना देखाय नहीं.'*

(आई कधी दोष पाहत नाही, दादांनाही कोणाचे दोष दिसत नाहीत.)

तुमचा कमकुवतपणा आम्ही जाणतो आणि कमकुवतपणा तर असणारच. म्हणून आमची सहज क्षमा असते. क्षमा द्यावी लागत नाही, तर मिळूनच जाते, अगदी सहज रित्या. सहज क्षमागुण हा तर अंतिम दशेचा गुण म्हटला जातो. आमची सहज क्षमा असते. एवढेच नाही तर तुमच्यासाठी आमच्या मनात सतत एकसारखे प्रेम असते. जे कमी होते, वाढते ते प्रेम नाही, ती आसक्ती आहे. आमचे प्रेम वाढतही नाही आणि कमीही होत नाही. आणि तेच शुद्ध प्रेम, परमात्म प्रेम आहे.

दोष झाला की लगेचच तुम्ही 'शूट ॲट साइट' प्रतिक्रमण करायला हवे. 'तुम्ही' 'चंदुभाई'ला सांगायला हवे की 'चला चंदुभाई, प्रतिक्रमण करा.' चंदुभाई म्हणतील 'मी म्हातारा झाला आहे, आता माझ्याने होत नाही.' तेव्हा तुम्ही त्याला म्हणावे, 'आम्ही तुम्हाला शक्ती देऊ.' मग त्याच्याकडून म्हणवून घ्या, 'मी अनंत शक्तीवाला आहे.' मग शक्ती येईल.

ज्याला स्वत:चे दोष दिसू लागेल, पाच (दोष) दिसू लागले तर समजावे की आता निराकरण (सुटका) होणार आहे.

जेवढे दोष दिसले, तेवढे दोष गेले! मग कोणी म्हणेल तोच दोष परत होत आहे. प्रत्यक्षात तसे नसते, तोच दोष परत येत नसतो. पण कांद्याच्या थराप्रमाणे प्रत्येक दोषाचे अनेक थर असतात. आपण प्रतिक्रमण करून एक थर काढून टाकला की मग परत दुसरा थर येतो, तोच थर परत येत नसतो. तीस थर होते, त्यातील एक गेला की मग एकोणतीस राहिले. एकोणतीसमधून एक थर जाईल तेव्हा अठ्ठावीस उरतील. अशा प्रकारे थर कमी होत जातील आणि शेवटी तो दोष पूर्णपणे संपेल!



## [ 7 ]

## प्रकृतीबरोबर तन्मय दशेत आत्मप्रकाश निर्लेप

मूळ गोष्ट समजून घ्या की हकीकत काय आहे? आणि मूळ गोष्ट काय आहे? एवढेच जाणण्यासाठी हा मनुष्यजन्म आहे. 'यात आपले काय आणि आपले काय नाही' एवढे जाणून घ्या. मग रडारड करायची असेल तर करा. आपल्याच जगात आपणच चुकलो आहोत! परक्या जगात आलो असतो तर गोष्ट वेगळी होती.

**प्रश्नकर्ता :** जग आपले कुठे आहे?

**दादाश्री :** तर मग कोणाचे आहे? आपले याचा अर्थ असा की आपला कोणी मालक नाही आणि आपला कोणी उपरी (वरिष्ठ) नाही. जग आपलेच आहे. हे जग पाहण्याचा लाभ घ्या, जाणण्याचा लाभ घ्या, तर मात्र खरे म्हणायचे!

**प्रश्नकर्ता :** पण पाहण्या-जाणण्यात तर आम्ही आत खोल घुसतो आणि मग अडकून बसतो.

**दादाश्री :** जे अडकते ते आपले स्वरूप नाही, तरी पण 'हेच माझे स्वरूप आहे, मी अडकलो' असे मानणे हीच तर चूक आहे.

'पाहिले-जाणले' तर निसर्ग किती सुंदर वाटेल! पण त्याला तर

आत चिंता वाटत असते, म्हणून तो निसर्गाकडे पाहतच नाही ना! बाग-बगीचे खूप सुंदर असतात पण त्याला ते विषासारखे वाटतात! हे जग कायम सुंदर आहे, या गायी-म्हशी किती सुंदर दिसतात! पण या माणसांची संगत केल्यामुळे गायी-म्हशी पण अडचणीत येतात.

**प्रश्नकर्ता :** गायी-म्हशींना माणसे अशी वाकडी आहेत हे समजते का?

**दादाश्री :** नाही, त्या माणसातूनच (परत) आलेल्या आहेत. बिचाऱ्या सतत माणसांच्याच संपर्कात असतात. या गायी-म्हशी म्हणजे आपल्या नातलगांच्याच मुली आलेल्या असतात! आणि घरात बसून जो कुत्रा भुंकतो तो पण आपला नातलगच आलेला असतो.

**प्रश्नकर्ता :** जीव मेल्यानंतर लगेच जन्म घेतात का?

**दादाश्री :** लगेचच, त्यात कसला आला आहे वेळ? यात कोणी जन्म देणाराही नाही आणि कोणी घेणाराही नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे हे सगळे स्वयंसंचालित आहे?

**दादाश्री :** हो, हे सर्व स्वयंसंचालित आहे. स्वभावानेच संचालित आहे. उदा. पाण्याचा स्वभाव खाली जाण्याचा आहे, ते खालीच जाणार. त्याला तुम्ही काहीही करा, पण त्याचा स्वभाव बदलणार नाही.

**प्रश्नकर्ता :** आमच्या प्रकृत्या आहेत, तर त्यातील काही प्रकृत्या उंच जातात आणि काही खाली जातात.

**दादाश्री :** त्या सर्व प्रकृतींना पाहायचेच आहे. ह्या मोटारीच्या हेड लाईटचा प्रकाश बांद्राच्या (मुंबईतील एक परिसर) खाडीच्या चिखलाला स्पर्श करतो, खाडीतील पाण्याला स्पर्श करतो, खाडीच्या वासाला स्पर्श करतो, तरी पण प्रकाशाला कशाचाही स्पर्श होत नाही... तो प्रकाश चिखलाला स्पर्श करून जातो पण चिखल त्याला चिकटत नाही, वास त्याला चिकटत नाही. त्याला काहीच चिकटत नाही. म्हणून प्रकाशाला चिखल लागेल, वास लागेल, पाणी लागेल अशी भीती

बाळगायचे आपल्याला काहीच कारण नाही. ह्या मोटारीचा प्रकाश जर असा आहे तर आत्म्याचा प्रकाश किती चांगला असेल? आत्मा प्रकाश स्वरूपच आहे!

**प्रश्नकर्ता :** आम्ही प्रकृतीबरोबर तन्मयाकार झालेलो आहोत, त्यामुळे आमचे जे मिश्रचेतन आहे, त्याला तर घाण चिकटणार ना?

**दादाश्री :** त्याला चिकटत आहे ते आपण 'पाहायचे'!

**प्रश्नकर्ता :** परंतु त्याचा आमच्यावर परिणाम होतो, त्याचे काय?

**दादाश्री :** त्यालाही आपण 'पाहायचे'! प्रकाशाचे काम काय? तर 'पाहणे' मग डोंगर येवोत, चिखल येवो, पाणी येवो, वास येवो, काटेरी झुडपे जरी आलीत तर त्यातही घुसून प्रकाश पुढे निघून जातो. पण त्या प्रकाशाला काटे लागत नाहीत. हा प्रकाश जर असा आहे, तर तो प्रकाश किती चांगला असेल!!

तुम्ही जर काळोखात ड्राइव्हिंग केले तर तुम्हाला किती जीव-जंतू चिरडले जात आहेत हे समजत नाही, पण लाइट लावली तर लगेच कळते की इतके जीव-जंतू गाडीशी आदळत आहेत. अहो, हे तर आता ह्या लाइटच्या प्रकाशामुळे दिसले. तर काय त्या आधी ते आदळत नव्हते? आदळतच होते. फॉरेनर्सनां ते दिसत नाहीत पण आपल्याकडे प्रकाश आहे म्हणून आपल्याला ते दिसतात. आपल्याला दिसतात म्हणून आपल्याला उपाधी होते, त्यांना उपाधी होत नाही. अशा प्रकारे हे जग चालत आहे!

**प्रश्नकर्ता :** पण सगळ्यांना उपाधीत तर यावेच लागते ना?

**दादाश्री :** उपाधीत आलो आहोत, म्हणून तर आपण निरुपाधीचा मार्ग शोधून काढतो. पण जो उपाधीत आलाच नाही तो निरुपाधीचा मार्ग कसा काय शोधेल? त्याला तर अजून उपाधीत येणे बाकी आहे.

ही गोष्ट एकदा नीट समजून घ्यायची आहे. हा बाहेरचा प्रकाश कोणाला स्पर्शत नाही, आणि या प्रकाशामुळे जीवजंतू आदळताना दिसत

आहेत, नाहीतर काहीच दिसत नव्हते. म्हणजेच एकदा हे समजल्यानंतर कसली काळजी नाही आणि उपाधीही नाही! पण 'आपण' 'जाणले' पाहिजे की आता ह्या लाइटच्या प्रकाशामुळे जीवजंतू चिरडले जात आहेत हे दिसत आहे. यातील कोणत्याही गोष्टीचे आपण कर्ता नाही.

**प्रश्नकर्ता :** व्यवहारात काही भागात नैमित्तिक कर्तेपणा येतो. अशावेळी आम्ही जरा जास्त तन्मयाकार होतो, तेव्हा अधिक 'रिएक्शन' (प्रतिक्रिया) येतात.

**दादाश्री :** त्यालाही 'आपण' पाहायचे. पाहिल्या नाहीत तरी पण काही फेरफार होणार नाही. आपल्याला काम करत राहायचे आहे. सकाळी उठल्यावर चहा पिता की नाही? तर तेव्हा करत राहा असे म्हणायची गरज पडते का? पण तरीही 'काम करू नका, हे असेच चालणार' असे म्हणता कामा नये. असे बोलणे हा गुन्हा आहे. आपण तर 'काम करत राहा' असे म्हटले पाहिजे.

## 'व्यवस्थित'ची संपूर्ण समज आली तर केवळज्ञान

गाडीतून उतरवण्यात आले तर समजा हे 'व्यवस्थित' आहे. मग परत बोलावले तरी ते पण 'व्यवस्थित' आणि परत उतरवले तर ते पण 'व्यवस्थित'. असे जरी सात वेळा उतरवले तरी 'व्यवस्थित'! आणि सात वेळा बसवले तरी 'व्यवस्थित'! असे ज्याला सतत (अनुभवास येते) त्याला केवळज्ञान होईल! आम्ही तुम्हाला असे 'व्यवस्थित' दिले आहे की तुम्हाला केवळज्ञान होऊ शकते, 'व्यवस्थित' जर संपूर्ण, एकदम परिपूर्ण समजले तर! 'व्यवस्थित' हे तर सर्व चोवीस तीर्थंकरांच्या शास्त्रांचे सार आहे.

**प्रश्नकर्ता :** आपल्याला प्रथम 'व्यवस्थित' समजले असेल, मगच आपण ज्ञान देऊ लागलात ना?

**दादाश्री :** हो, त्यानंतरच दिले ना! 'व्यवस्थित' मला कित्येक जन्मांपासून अनुभवास आले आहे आणि त्यानंतरच मी ते बाहेर दिले.

नाहीतर देऊ शकणार नाही ना? यात तर जोखीम, मोठी जोखीम आहे. वीतरागींचे एकही अक्षर बोलणे आणि कोणाला उपदेश करणे, ही खूप मोठी जोखीम आहे. तुम्हाला किती वेळा मोटारीतून उतरवले तर 'व्यवस्थित' हजर राहील?

**प्रश्नकर्ता :** चार-पाच वेळा, मग पारा चढतो.

**दादाश्री :** पारा चढला तर तो पुद्गलाचा चढेल. 'आपण' तर 'जाणायचे' आहे की ह्या पुद्गलाचा पारा चढला आहे. आपण म्हणावे की 'ह्या पुद्गलाचा पारा चढला आहे, तरी पण मी परत आलो आणि गाडीत बसलो.' म्हणजे पारा चढला आहे, हे 'आपण' 'जाणले' पाहिजे. हे 'व्यवस्थित' इतके सुंदर आहे! पारा चढला आणि जर आडमुठेपणा करून निघून गेला आणि परत आलाच नाही, तर मात्र ते चुकीचे आहे. हे 'व्यवस्थित' जर समजले तर मग 'ढवळाढवळ' करायला काही उरतच नाही. पुद्गलाचे जे व्हायचे ते होवो, पण 'आपण' मात्र वाकडे व्हायचे नाही. पुद्गल तर आपल्याला वाकडे करायचा सतत प्रयत्न करीत असते.



## [ 8 ]

## परिणामांचा स्वीकार करणारा

**प्रश्नकर्ता :** अंत:करणाच्या कोणत्या भागावर प्रथम 'इफेक्ट' (परिणाम) होतो?

**दादाश्री :** प्रथम बुद्धीवर 'इफेक्ट' होतो. बुद्धी जर हजर नसेल तर परिणाम होत नाही.

**प्रश्नकर्ता :** अतिशय विकट संयोगात अंत:करणानंतर मग पुढील कोणत्या भागावर 'इफेक्ट' होतो?

**दादाश्री :** पुढे कोणावरच परिणाम होत नाही.

**प्रश्नकर्ता :** 'प्रतिष्ठित आत्म्यावर' होतो का?

**दादाश्री :** त्याला 'प्रतिष्ठित आत्मा'च म्हणतात. अंत:करणातील क्रोध-मान-माया-लोभ, मन-बुद्धी-चित्त-अहंकार या सगळ्यांना 'प्रतिष्ठित आत्मा'च म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** तर मग 'प्रतिष्ठित आत्मा' आणि अंत:करण यांना वेगळे का म्हटले आहे?

**दादाश्री :** वेगळे म्हटलेलेच नाही. 'शुद्धात्मा' सोडला तर बाकी सर्व 'प्रतिष्ठित आत्मा.' मग आणखी विचारलेत तर मग अंत:करण वेगळे, इंद्रिये वेगळी, मन वेगळे असे सांगावेच लागते ना!

**प्रश्नकर्ता :** बुद्धीवर परिणाम होतो, मग मनावर का परिणाम होत नाही?

**दादाश्री :** बुद्धीतून मग मनापर्यंत पोहोचते. जर मध्ये बुद्धी नसेल तर काहीच परिणाम होणार नाही.

आमच्यात बुद्धी नाही म्हणून आमच्यावर काहीच परिणाम होत नाही. आमच्या आत पण अनेक प्रकारचे 'लबाड' आहेत, ते तऱ्हेतऱ्हेचे बोलतात, परंतु जर मध्ये स्वीकार करणारी बुद्धी असेल तर भानगड होईल ना? बुद्धी स्वीकार करते, मग मनापर्यंत पोहोचते आणि मग मन धुमाकूळ घालते!

**प्रश्नकर्ता :** बुद्धीने स्वीकारले, त्यानंतर रवंथ करण्याची क्रिया कोण करतो?

**दादाश्री :** बुद्धी स्वीकार करते आणि मग ते मनापर्यंत पोहोचते. मग मनच धूमाकूळ घालते, रवंथ करण्याचे काम पण मनच करते. मन विरोधाभासी आहे. घटकेत ते इकडे घेऊन जाते आणि घटकेत दुसऱ्या कोपऱ्यात नेते. हलवून-हलवून वादळ निर्माण करते!

## बुद्धी आणि प्रज्ञा यांचे डिमार्केशन

**प्रश्नकर्ता :** हे काम बुद्धीने केले की प्रज्ञेने केले, हे कसे ओळखावे? बुद्धी आणि प्रज्ञा यांची व्याख्या काय? एखादी गोष्ट घडली तर बुद्धी चालवली, बुद्धी उत्पन्न झाली असे म्हणतात, तर मग बुद्धी नेमके कशाला म्हणतात?

**दादाश्री :** *अजंपा* (बेचैनी, अशांती, भीती) निर्माण करविते ती बुद्धी. प्रज्ञेत *अजंपा* होत नाही. तुम्हाला थोडासाही *अजंपा* झाला तर समजा की इथे बुद्धीचे वर्चस्व आहे. तुम्हाला बुद्धीचा उपयोग करायचा नसेल तरी पण उपयोग होऊनच जातो. तीच तुम्हाला निवांत बसू देत नाही. ती तुम्हाला 'इमोशनल' (भावनिक) करते. त्या बुद्धीला आपण म्हणावे, 'हे बुद्धीताई, तुम्ही तुमच्या माहेरी जा. आता तुमचा-आमचा

काहीच संबंध नाही.' सूर्याचा प्रकाश झाल्यावर मेणबत्तीची काय गरज? म्हणजेच आत्म्याचा प्रकाश प्राप्त झाल्यावर बुद्धीच्या प्रकाशाची गरज भासत नाही. माझ्यात बुद्धी नाही. मी अबुध आहे.

**प्रश्नकर्ता :** तर मग मौन राहणे, याला बुद्धी चालवली असे नाही का म्हटले जाणार?

**दादाश्री :** मौन राहायचे म्हटले तरी मौन राहता येत नाही.

**प्रश्नकर्ता :** नाही, पण एखाद्याने मौन धारण केले तर?

**दादाश्री :** कसे राहील? बुद्धी 'इमोशनल' करतच राहते. 'मोशन'मध्ये ठेवतच नाही. क्षणभरदेखील तुम्हाला निवांत बसू देत नाही. बुद्धी रात्री दोन वाजता उठवेल. धुमाकूळ घालेल! प्रचंड धुमाकूळ! शांतपणे विश्रांती पण घेऊ देणार नाही.

**प्रश्नकर्ता :** ज्ञाता-द्रष्टा राहिलो तरच बुद्धीचा उपयोग होणार नाही ना?

**दादाश्री :** ज्ञाता-द्रष्टा राहिला तर मग बुद्धीला हरकत नाही, कारण तेव्हा बुद्धीचा उपयोग होईलच कसा? मग तर अंतिम 'स्टेशन' येईल! पण बुद्धी ज्ञाता-द्रष्टा राहूच देत नाही.

भाजी घ्यायला बाजारात गेलात आणि तुम्हाला सत्संगात जायची घाई असेल, तरी पण बुद्धी चार दुकाने हिंडायला लावेल! मगच ती सोडेल. बुद्धी सतत भटकवतच राहते.

**प्रश्नकर्ता :** जिथे जे मिळेल ते घेऊन, जून भेंडी घेऊन घरी आले. म्हणजे बुद्धी चालवली नाही, असे म्हणायचे का?

**दादाश्री :** जून येईल की कोवळी येईल याची तुम्हाला काय खात्री? काही जण तर दुकानावर जाऊन फक्त 'भेंडी द्या' असेच म्हणतात, आणि त्यांना चांगली भेंडी मिळूनही जाते!

आणि जून भेंडी आली तरी असे काय बिघडले? संसारात तर

असे चालायचेच. रोजच जून येणार नाही. केव्हातरीच येते. शिवाय त्याचे पुण्यही असतेच ना? चांगल्या माणसांची तर पुण्ये पण चांगली असतात. त्यामुळे पुढे सर्व तयारच असते. आणि खटपट करणाऱ्यांचे पुण्य पण खटपटवालेच असते.

## अहंकाराच्या उदयावेळी 'ॲडजस्टमेंट'

**प्रश्नकर्ता :** मग हा अहंकार, ही काय वस्तू आहे?

**दादाश्री :** अहंकार ही काही वस्तू नाही. कोणी म्हटले की 'तुम्ही चंदुभाई आहात', आणि तुम्ही पण मानलेत की 'मी चंदुभाई' आहे, तर तो अहंकार!

**प्रश्नकर्ता :** पण अहंकार जेव्हा दुखावला जातो तेव्हा तर चांगले-वाईट असे काहीच भान राहत नाही.

**दादाश्री :** अहंकाराला कधीच डोळे नसतात, तो आंधळाच असतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे इतर सर्वांपेक्षा अहंकार मोठा आहे, असेच ना?

**दादाश्री :** हो, तो सरदार आहे. त्याच्या 'सरदारकी' खालीच सर्व चालू असते!

**प्रश्नकर्ता :** तर मग त्यावेळी काय 'ॲडजस्टमेंट' घ्यायला हवी?

**दादाश्री :** त्यात कसली 'ॲडजस्टमेंट'? 'तुम्ही फक्त पाहतच राहायचे की कसा आंधळा आहे!' बस, हीच 'ॲडजस्टमेंट' घ्यायची आहे.

अहंकार काही एखादी वस्तू नाही. 'आपण' जे मानतो की 'हा मी आहे', तो सर्व अहंकार आणि 'मी शुद्धात्मा आहे' तेवढाच निर्अहंकार. 'मी पटेल आहे', 'मी पन्नास वर्षांचा आहे', 'मी कलेक्टर आहे', 'मी वकील आहे.' असे जे जे बोलता तो सर्व अहंकार आहे.

**प्रश्नकर्ता :** चांगले करण्याची जो प्रेरणा देतो, त्यालाही अहंकारच म्हणायचा का?

**दादाश्री :** हो, त्याला पण अहंकारच म्हणतात. चुकीचे करण्याची प्रेरणा देतो, तो पण अहंकार. तो चांगल्याकडून वाईटाकडे केव्हा वळेल, ते काही सांगता येत नाही. कारण शेवटी तो आंधळा आहे ना!

तुम्ही एखाद्याला दान देत असाल आणि तोच मनुष्य जर (तुम्हाला राग येईल) असे काही बोलला, तर तुम्ही त्याला मारायला धावाल! कारण तो अहंकार आहे.

**प्रश्नकर्ता :** सैनिक म्हणतो, 'मी हिंदुस्तानासाठी लढत आहे' तर तो पण अहंकार?

**दादाश्री :** हो, तो पण अहंकारच आहे. एकूण काय, तर त्याने काही लाभ होत नाही. थोडे पुण्य लाभते. चांगले करणारा 'कधी वाईट करील' काहीच सांगता येत नाही. आज तो हिंदुस्तानासाठी लढत आहे आणि उद्या कदाचित आपल्या कॅप्टनबरोबरही भांडेल! काहीच सांगता येत नाही. अहंकार पूर्ण निर्लज्ज असतो. कधी उलट करील, काहीच सांगता येत नाही. तो ध्येयशून्य असतो. आणि जेवढे लोक अहंकाराने ध्येय ठेवत होते, त्या सर्वांची हिंदुस्तानात पूजा होते.

**प्रश्नकर्ता :** पण पुढे जाण्यासाठी अहंकाराची गरज तर आहेच ना?

**दादाश्री :** तो अहंकार तर आपोआपच असतो. अहंकार ठेवल्याने अहंकार राहत नाही. तो येऊन घुसतोच!

**प्रश्नकर्ता :** मानसशास्त्रात असे लिहिले आहे की 'पर्सनालिटी डेव्हलपमेंट' (व्यक्तिमत्व विकासा)साठी थोड्याशा अहंकाराचीही गरज असते, ते बरोबर आहे का?

**दादाश्री :** तो नैसर्गिकपणे असतोच. निसर्गाचा नियमच आहे की 'डेव्हलपमेंट' (प्रगती)साठी अहंकार उत्पन्न होतो आणि स्वतः 'डेव्हलप' होत जातो. असे करत करत जेव्हा 'डेव्हलपमेंट' पूर्ण होऊ

लागते, तेव्हा माणूस हिंदुस्तानात (जन्माला) येतो. त्यानंतर त्याला 'डेव्हलपमेंट'ची फारशी गरज उरत नाही. मोक्षाचा रस्ता सापडल्यानंतर अहंकार बाळगण्याचा वेडेपणा कोण करील? तसा तर तो खूप चांगला असतो, दानशूर असतो पण घरी गेल्यावर त्याला बऱ्याच काळज्या, उपाध्या असतातच. दिवसभर अंतरदाह होतच असतो.

## 'आत्मप्राप्ती'ची लक्षणे

**प्रश्नकर्ता :** जर मी माझ्या आत्म्याला ओळखले असेल तर माझ्यात कोणती लक्षणे सुरू होतील? माझ्यात असे कोणते परिवर्तन झाले असेल की ज्यावरून मला कळेल की मी योग्य मार्गावर आहे.

**दादाश्री :** सर्वात प्रथम इगोइजम (अहंकार) बंद होईल. नंतर दुसरे म्हणजे क्रोध-मान-माया-लोभ संपतील, असे झाले तर समजा की तुम्ही आत्मा झालात! तुम्हाला अशी लक्षणे जाणवतात का?

**प्रश्नकर्ता :** नाही. ती तर अजून उत्पन्न झालेली नाहीत.

**दादाश्री :** ती लक्षणे उत्पन्न झाली की मग समजा की तुम्ही आत्मस्वरूप झाला आहात! सध्या तुम्ही 'चंदुभाई' स्वरूप आहात! आता जर कोणी म्हणाले, 'ह्या डॉक्टर चंदुभाईनी माझी केस बिघडवली?' तर इथे बसल्याबसल्या तुमच्यावर त्याचा परिणाम होईल की नाही?

**प्रश्नकर्ता :** परिणाम तर होईल.

**दादाश्री :** म्हणजेच तुम्ही 'चंदुभाई' आहात. आणि या 'अंबालाल'ला जर कोणी शिव्या दिल्या तर 'मी' या 'अंबालाल'ला म्हणेन, 'बघा, तुम्ही काही बोलला असाल, म्हणूनच तो तुम्हाला शिव्या देत आहे!' आम्हाला पूर्ण वेगळेपणाचाच अनुभव असतो. तुम्ही पण जेव्हा वेगळे व्हाल, तेव्हा 'कोडे' सुटेल. नाहीतर रोज 'कोडी' उत्पन्न होतच राहतील.

**प्रश्नकर्ता :** ही जी 'कोडी' आहेत, ती जीवनाबरोबर जोडलेली आहेत की कर्म भोगण्यासाठी आहेत?

**दादाश्री :** हे अज्ञान आहे. ही माणसे बेभान आहेत. कशापासून बेभान आहेत? तर 'स्वतःच्या स्वरूपापासून बेभान आहेत!' 'स्वतः कोण आहे?' याचे भानच नाही. हे किती मोठे आश्चर्य आहे? हे ऐकताना तुम्हाला लाज नाही का वाटत? स्वतः स्वतःपासूनच अनोळखी आहे. लाज वाटावी असेच आहे ना हे? आणि मग जेव्हा बाहेर फिरतो तेव्हा किती रुबाब दाखवतो! अरे, तुला स्वरूपाचे भान नाही, मग विनाकारण उड्या का मारतोस? 'स्वतः' स्वतःपासून गुप्त राहूच शकत नाही ना? आणि तुम्ही स्वतःच स्वतःपासून गुप्त आहात, मग याला काय म्हणायचे? म्हणूनच तुम्हाला शुद्धीवर आणण्यासाठी मी हे 'विज्ञान' देऊ इच्छितो. 'हे' ज्ञान नाही, 'हे' विज्ञान आहे. 'ज्ञान' क्रियाकारी नसते. हे 'विज्ञान' क्रियाकारी असते. हे ज्ञान घेतल्यानंतर तुम्हाला काहीच करावे लागत नाही. ज्ञानच सर्व करत राहते. विज्ञान नेहमी चेतन असते आणि शास्त्रज्ञान म्हणजे शब्दज्ञान असते. ते क्रियाकारी होऊ शकत नाही. जास्तीतजास्त ते तुम्हाला सद्-असद्चा विवेक शिकवेल. सद्-असद्चा विवेक म्हणजे, हे 'खरे' आहे, किंवा हे 'खोटे' आहे, अशी जाणीव करवून देईल. आणि हे तर 'अक्रम विज्ञान' आहे.

## कारण-कार्य यांची साखळी

**प्रश्नकर्ता :** शरीर आणि आत्मा यांचा संबंध तर आहे ना?

**दादाश्री :** हे जे शरीर आहे, तो आत्म्याचा परिणाम आहे. जी जी 'कॉजेस्' (कारणे) केली, त्या सर्वांचा हा 'इफेक्ट' आहे. तुम्हाला जर कोणी फुले वाहिली तर तुम्ही खुश होता आणि जर शिवी दिली तर तुम्ही चिडता. त्या चिडण्यात किंवा खुश होण्यात तुमच्या बाह्य दर्शनाला महत्त्व नाही, तर अंतरभावामुळे कर्म चार्ज होत असते. मग पुढील जन्मात ते 'डिस्चार्ज' होते, त्यावेळी ते 'इफेक्टिव' आहे. मन, वचन, काया हे सर्व 'इफेक्टिव' आहेत. 'इफेक्ट' भोगताना परत नवीन 'कॉजेस्' निर्माण होतात, ते पुढील जन्मात परत 'इफेक्टिव' होतात. अशा तऱ्हेने 'कॉजेस्' एन्ड 'इफेक्ट', 'इफेक्ट' एन्ड 'कॉजेस्' अशी साखळी सतत चालू राहते.

फक्त मनुष्यजन्मातच 'कॉजेस्' बंद होऊ शकतात. इतर सर्व गतीत तर फक्त 'इफेक्ट'च आहेत. इथे (मनुष्य जन्मात) 'कॉजेस्' आणि 'इफेक्ट' दोन्हीही आहेत. आम्ही जेव्हा ज्ञान देतो, तेव्हा 'कॉजेस्' बंद करतो. मग नवीन 'इफेक्ट' होत नाही.

**प्रश्नकर्ता :** 'इफेक्टिव' राहणे चांगले की 'इफेक्टिव' मिटणे चांगले?

**दादाश्री :** असे मिटवले तर मग या सर्व लोकांना कसलीच गरज भासणार नाही. थोडेसे औषध चोपडले तर मिटेल. मग थंडी वाजणार नाही, उकाडा वाटणार नाही, म्हणजे मग पंखे, कपडे कसलीच गरज भासणार नाही.

**प्रश्नकर्ता :** या जन्म-मरणाच्या कारणांचे जे 'इफेक्ट' आहेत ते निघून गेलेले चांगले की राहिलेले चांगले?

**दादाश्री :** 'इफेक्ट' अशा प्रकारे कधीच निघू शकत नाहीत. 'इफेक्ट' म्हणजे परिणाम. परिणामाला दूर करता येत नाही, पण 'कॉजेस्' बंद केली जाऊ शकतात.

**प्रश्नकर्ता :** ते कार्य-कारण भावामुळे आहे का?

**दादाश्री :** हो, 'इफेक्ट' तर कार्य आहे आणि कार्यात बदल होत नाही. हा जो 'इफेक्ट' आहे, तो 'डिस्चार्ज' आहे आणि आतमध्ये चार्ज होत राहते. चार्ज बंद केला जाऊ शकतो. 'डिस्चार्ज' बंद केला जाऊ शकत नाही.

## अकर्तापदामुळे अबंधदशा

**प्रश्नकर्ता :** 'कॉजेस्' बंद करण्याची प्रक्रिया काय आहे?

**दादाश्री :** 'हे मी करतो' हे भान तुटले की तेव्हापासून 'कॉजेस्' बंद होतात! मग नवीन 'कॉजेस्' निर्माण होत नाहीत आणि जो जुना माल आहे तो 'डिस्चार्ज' होत राहतो! तर आता जुना माल कसा 'डिस्चार्ज' होतो, ते मी तुम्हाला समजावतो.

इथून चाळीस मैल दूर एका 'इरिगेशन' टँकमधून मोठ्या पाइपाद्वारा अहमदाबादला तलाव भरण्यासाठी पाणी येते, तो तलाव भरला की आपण इरिगेशन टँकवाल्यांना कळवितो की आता पाणी सोडणे बंद करा. मग ते लगेच बंद करतात, तरी पण काही वेळ पाणी येतच राहते. कारण चाळीस मैलाच्या पाइप लाइनमध्ये पाणी आहे त्याला तर येऊ द्यावे लागेलच ना? त्याला काय म्हणतात? आम्ही त्याला डिस्चार्ज म्हणतो. त्याचप्रकारे आमच्याकडून ज्ञान घेतलेल्या व्यक्तीचा 'चार्ज' बंद होतो. 'मी करतो' असे भान संपते, आणि 'व्यवस्थित शक्ती' करत आहे आणि 'शुद्धात्मा' 'ज्ञाता-द्रष्टा' राहतो. मग जे काही होईल, ते 'पाहत' राहावे. म्हणजेच ज्यामुळे 'चार्ज' होत होते ते कर्तापद पूर्णपणे संपून गेले. मग जो 'डिस्चार्ज' उरला तो संपविणे एवढेच शिल्लक राहते.

## आता प्रारब्ध झाले जुने, 'व्यवस्थित'मध्ये ज्ञान सामावले

**प्रश्नकर्ता :** तुम्ही 'व्यवस्थित शक्ती'ला प्रभुशक्ती मानता की प्रारब्ध म्हणता?

**दादाश्री :** नाही, 'व्यवस्थित शक्ती' आणि प्रारब्ध याचे काहीच देणेघेणे नाही. एखादी व्यक्ती जर प्रारब्ध मानू लागली तर लोक म्हणतात, 'तू पुरुषार्थ कर, उगाचच प्रारब्धावर अवलंबून राहू नकोस.' अर्थात प्रारब्ध म्हणजे पंगु अवलंबन आहे आणि 'व्यवस्थित' हे तर 'एक्झॅक्ट' आहे.

**प्रश्नकर्ता :** 'व्यवस्थित' म्हणजे पूर्वनिश्चित? ते पूर्वनिर्धारित आहे का?

**दादाश्री :** हो, संपूर्ण पूर्वनिश्चित आहे. परंतु जोपर्यंत तुम्हाला संपूर्ण ज्ञान नाही तोपर्यंत तुम्ही 'हे सर्व व्यवस्थितच आहे' असे बोलता कामा नये. मन-वचन-काया हे सर्व 'व्यवस्थित'च्या आधीन आहे. तुम्ही हात वर करता, मनात विचार करता, आत प्रेरणा होते, हे सर्व 'व्यवस्थित'च्या आधीन आहे. तुम्ही 'शुद्धात्मा' आहात आणि बाकी सर्व

त्याच्या आधीन आहे! म्हणून त्यात हात घालू नका. 'काय होत आहे' ते फक्त पाहत राहावे!

**प्रश्नकर्ता :** तर मग 'शुद्धात्मा' तेवढा 'व्यवस्थित'च्या बंधनात आला ना?

**दादाश्री :** नाही, 'शुद्धात्मा' बंधनात नाही. 'शुद्धात्मा' झाल्यावर ज्ञाता-द्रष्टा राहण्याचीच गरज आहे.

मी टॉपवर (उंचावर) जाऊन हे सर्व सांगत आहे! जगातील लोकांनी ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्या पर्वताच्या पायथ्यावरून सांगितल्या आहेत. काही लोकांनी पाच फूट उंचीवर चढून सांगितले आहे, तर काही लोकांनी दहा-फूट उंचीवर चढून सांगितले आहेत. मी इतका उंच चढलो आहे की माझे डोके वरच्या टॉपला (शिखराला) पाहते आणि खालचा सर्व भागही दिसतो! याउलट वीतरागींनी टॉपवर उभे राहून गोष्टी सांगितल्या आहेत. टॉपवर संपूर्ण सत्य आहे! मी जे सांगतो त्यात थोडी उणीव असू शकते. कारण मी टॉपवरचे सगळेच पाहू शकत नाही. टॉपची तर गोष्टच वेगळी ना!

**प्रश्नकर्ता :** महावीर भगवंत असे म्हणतात की, कोणीही कर्मक्षय करू शकत नाही, म्हणजे त्यात 'ज्ञानी' पण आलेच ना?

**दादाश्री :** नाही, ज्ञानी तर स्वतःची कर्मे स्वतःच संपवतात आणि दुसऱ्यांची कर्मे पण संपवितात! आणि ही गोष्ट तर जे 'ज्ञानी' नाहीत त्यांच्यासाठी सांगितली गेली आहे.

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानीं'चे प्रकृतीवर प्रभुत्व असते?

**दादाश्री :** नाही, नसते! पण प्रकृतीचा परिणाम त्यांच्यावर होत नाही. 'स्वतः'च्या स्वातंत्र्यावर प्रकृतीचा परिणाम होत नाही. पण प्रकृतीच्या आधीन तर महावीर भगवंतांना देखील राहावे लागले होते!

**प्रश्नकर्ता :** दादाजी, आपले ज्ञान घेऊनसुद्धा जर एखाद्याला

समाधी वाटत नसेल, त्याची 'पाटी लिहिलेलीच' राहत असेल, तर कधीतरी त्याची लिहिलेली पाटी कोरी होईल, हे 'व्यवस्थित'च्या हातात असते का?

**दादाश्री :** यात 'व्यवस्थित शक्ती' काही नुकसान करत नाही. स्वतःची अजागृतीच नुकसान करत असते. जर मी सांगितलेल्या वाक्यांवर अंमल केला तर त्याला निरंतर समाधी लाभेल. 'स्वतः' 'जागृत' राहण्याची आवश्यकता आहे. हे 'ज्ञान' मी देतो तेव्हा मी तुम्हाला आत्म्याच्या जागृतीत आणतो! आत्म्याच्या संपूर्ण जागृतीला 'केवळज्ञान' म्हटले आहे. जेव्हा जागृती उत्पन्न होते, तेव्हा स्वतःचे सर्वच दोष दिसतात. रोज स्वतःचे पाच-पाचशे दोष 'स्वतः' पाहू शकतो. आणि जे दोष पाहतो, ते दोष अवश्य निघून जातात.

आपल्याकडे हे 'विज्ञान' आहे. स्वतःचे दोष दिसू लागले तेव्हापासूनच त्याची परमात्मा होण्याची सुरुवात झाली. नाहीतर स्वतःचा दोष कोणालाही दिसत नाही. स्वतःच न्यायाधीश, स्वतःच आरोपी आणि स्वतःच वकील असेल तर स्वतःचे दोष कसे काय पाहू शकेल?



## [ ९ ]

## कषायांची सुरुवात

**प्रश्नकर्ता :** 'चार्ज' कषाय आणि 'डिस्चार्ज' कषाय याबद्दल मला जाणून घ्यायचे आहे.

**दादाश्री :** आता तुम्हाला जे कषाय होत आहेत, तुम्ही जर आता कोणावर रागावलात, तर तो कषाय 'डिस्चार्ज' कषाय आहे. परंतु जर त्याच्यात तुमचा भाव असेल तर परत 'चार्ज'चे बी पडेल.

**प्रश्नकर्ता :** कुठलाही 'डिस्चार्ज' असो, त्यात चार्ज तर असणारच ना? भावकर्मे तर येतीलच ना?

**दादाश्री :** नाही, जेव्हा 'डिस्चार्ज' होतो तेव्हा जर 'चार्ज' करायचे नसेल तर, ज्याने आमच्याकडून ज्ञान घेतले आहे त्याचे 'चार्ज' होतच नाही. मग कर्मे चिकटतच नाहीत.

**प्रश्नकर्ता :** हा 'डिस्चार्ज' आहे आणि हा 'चार्ज' आहे हे समजण्यासाठी काही परीक्षा आहे का?

**दादाश्री :** हो, परीक्षा आहे. स्वत:ला सर्व समजते. जर चार्ज झाले तर त्याबरोबर अशांती वाटते, आतील समाधी तुटते आणि चार्ज होत नसेल तर अशावेळी समाधी जात नाही.

**प्रश्नकर्ता :** समाधी असेल तरी पण क्रोध येतो?

**दादाश्री :** क्रोध येतो, पण तो डिस्चार्ज क्रोध आहे, पण आत जर क्रोध करण्याचा भाव असेल तर तेव्हा समाधी राहत नाही.

**प्रश्नकर्ता :** लोभाचे पण तसेच असते का?

**दादाश्री :** हो, क्रोध-मान-माया-लोभ सर्वांचे असेच असते. एक 'डिस्चार्ज' भाव आहे आणि दुसरा 'चार्ज' भाव आहे. तुमचे नाव काय आहे?

**प्रश्नकर्ता :** चंदुभाई.

**दादाश्री :** तुम्ही 'चंदुभाई' आहात याची खात्री केली आहे का?

**प्रश्नकर्ता :** सर्वांनी मला असे म्हटले आहे.

**दादाश्री :** तुम्ही नामधारी आहात हे तर मी पण कबूल करतो, परंतु खरोखर 'तुम्ही' कोण आहात? जोपर्यंत 'मी चंदुभाई आहे' हा आरोपित भाव आहे तोपर्यंत कर्मे चार्ज होतच राहतील.

**प्रश्नकर्ता :** राग-द्वेष, हे कषायभाव आहेत का इतर काही आहेत?

**दादाश्री :** हो, ते कषाय भावच आहेत. ते दुसरे तत्त्व नाही. क्रोध आणि मान म्हणजे द्वेष, आणि माया व लोभ म्हणजे राग (मोह, आसक्ती). क्रोध-मान-माया-लोभ, हे आत्म्याचे गुणधर्म नाहीत, आणि पुद्‌गलाचे गुणधर्म पण नाहीत.

**प्रश्नकर्ता :** मग हे तिसरे तत्त्व कोणते आहे?

**दादाश्री :** आत्मा आणि पुद्‌गल यांच्या (एकत्र) उपस्थितीमुळे उत्पन्न होणारे हे गुण आहेत. अशी उपस्थिती नसेल तर हे गुणधर्म उत्पन्न होत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** कषाय मध्ये कष् + आय असे येते, ते काय आहे?

**दादाश्री :** आत्म्याला त्रास देतात ते सर्व कषाय आहेत.

**प्रश्नकर्ता :** रागा (आसक्ती)मुळे त्रास होत नाही, तरी पण त्याला कषाय का म्हणतात?

**दादाश्री :** रागामुळे त्रास होत नाही, परंतु राग हे कषायाचे बीज आहे. त्यातूनच मोठे झाड तयार होते!

द्वेष ही कषायांची सुरुवात आहे आणि राग म्हणजे बी रुजत घातले, तेव्हापासूनच मग त्याचा परिणाम येईल. त्याचा परिणाम काय येईल? तर कषाय. म्हणजेच जेव्हा परिणाम येईल तेव्हा द्वेष उत्पन्न होईल. सध्या तर राग आहे म्हणून गोड वाटते.

## अनुकूल परिस्थितीत कषायभाव होतात का?

**प्रश्नकर्ता :** अनुकूल संयोगात कषायभाव किंवा असे काही होत नाही आणि प्रतिकूल संयोगात कषायभाव खूप होतात, तर त्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** असे आहे की, फक्त प्रतिकूलतेमध्येच कषाय होतात असे नाही. अनुकूलतेतसुद्धा खूप कषाय होतात. पण अनुकूलतेचे कषाय थंड असतात. त्यांना रागकषाय म्हणतात. त्यात लोभ आणि कपट दोन्हीही असतात. प्रत्यक्षात त्यात इतका थंडावा वाटतो की प्रतिदिन गाठ वाढतच जाते. अनुकूल सुखदायी वाटते पण सुखदायीच खूप कठीण आहे.

**प्रश्नकर्ता :** अनुकूलतेत तर हा कषायभाव आहे हे कळतच नाही.

**दादाश्री :** तेव्हा कषाय कळत नाहीत, पण तेच कषाय खूप दुखःदायी असतात (खूप त्रास देतात). प्रतिकूलतेचे कषाय तर बिचारे भोळे असतात! जगाला ते लगेच समजतात. याउलट अनुकूलतेचे कषाय, लोभ आणि कपट तर फळे-फुले येऊन मोठे होतात! प्रतिकूलतेचे कषाय, मान आणि क्रोध हे आहेत, त्यांना द्वेष म्हटले जाते. अनुकूलतेचे कषाय अनंत जन्म भटकवतात. ताई, तुम्हाला समजले ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** अर्थात अनुकूल आणि प्रतिकूल दोन्हीही चुकीचे आहेत. म्हणून आत्मा जाणून घ्यायला हवा. आत्मा जाणल्यानंतर अनुकूल आणि प्रतिकूल सर्व संपते!

**प्रश्नकर्ता :** तर मग त्यासाठी कोणता पुरुषार्थ करायला हवा?

**दादाश्री :** पुरुषार्थ करून काहीच होणार नाही. तुम्ही इथे या, आम्ही तुम्हाला आत्म्याची ओळख करून देऊ. मग तुम्हाला आनंदच आनंद होईल आणि हे सर्व कषाय संपून जातील.

जोपर्यंत आत्म्याचा अनुभव होत नाही तोपर्यंत काहीही निष्पन्न होत नाही. लोक म्हणतात, 'साखर गोड आहे, साखर गोड आहे.' आपण त्यांना विचारले की 'कशी गोड आहे?' तेव्हा ते म्हणतील 'मला माहीत नाही! हे तर तुम्ही जेव्हा तोंडात ठेवाल तेव्हाच तुम्हाला कळेल.' तसेच आत्म्याचेही आहे. हे सगळे जण आत्म्याबद्दल बोलतात पण ते फक्त बोलण्यातच आहे. त्यात फलदायी काहीच नाही. कषाय जात नाहीत आणि आपले दिवस सुधारत नाहीत. अनंत जन्म असेच भटकत राहिले आहेत. 'ज्ञानी पुरुषां'चे दर्शन घेतले नाही, सत् ऐकले नाही, सत्वर श्रद्धा बसली नाही. सत्ला एकदा जाणायला तर हवे ना?

कषाय खूप दु:खदायी आहेत ना? आणि जे सुख देतात ते कषाय, ते कसे असतात?

**प्रश्नकर्ता :** हे तर तुम्ही सांगितलेत तेव्हा समजले की ते महादु:खदायी आहेत. नाहीतर अनुकूलतेत कषाय असतात हे तर समजलेच नव्हते.

**दादाश्री :** 'ज्ञानी पुरुषां'नी सांगितल्याशिवाय माणसाला स्वत:च्या चुका समजतच नाहीत. असा अनंत चुका आहेत. एवढी एकच चूक नसते. अनंत चुकांनी आपल्याला घेरलेले आहे.

**प्रश्नकर्ता :** चुका तर पदोपदी होतात.

**दादाश्री :** अनुकूल, याला पण कषाय म्हणतात, हे आता तुम्हाला नीट समजले ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** हे जे सतत गारवरसात (सांसारिक सुखाच्या गारव्यात

पडून राहायची इच्छा) ठेवतात, खूप गार वाटते, खूप मजा येते, असे वाटते तेच कषाय भटकवणारे आहेत.

## कषायांचा आधार

**प्रश्नकर्ता :** हे कषाय कशाच्या आधारावर आहेत?

**दादाश्री :** 'अज्ञान' हाच त्यांचा आधार आहे.

अज्ञानता हाच या सर्वांचा 'बेझमेन्ट' (पाया) आहे. अज्ञानता गेली की सर्व निराकरण झाले. आम्ही समजावून सांगितले की अज्ञान निघून जाते. अज्ञान गेले की कषाय कमी होऊ लागतात, म्हणजेच राग-द्वेष कमी होऊ लागतात. मग प्रकृती रिकामी होऊ लागते. आहे ना एकदम सोपा रस्ता?

## 'अक्रमा'ची बलिहारी

**प्रश्नकर्ता :** दादा, काहीही न करता हे प्राप्त होणे, हे समजत नाही.

**दादाश्री :** 'अक्रम विज्ञान' फक्त ज्ञानींच्या कृपेमुळेच प्राप्त होते. आणि क्रमिक मार्गात पण कृपा तर असतेच, पण तिथे गुरु सांगतील तसे करत राहावे लागते. 'अक्रम'मध्ये कर्तापद नसते. इथे तर सरळ ज्ञानच, 'डायरेक्ट' ज्ञान. म्हणून खूप सरळ होऊन जाते! म्हणूनच याला 'लिफ्टमार्ग' म्हटले आहे. 'लिफ्टमार्ग' म्हणजे कष्ट वगैरे काहीही करायचे नाहीत. फक्त आज्ञेत राहायचे. त्यामुळे नवीन 'चार्ज' होणार नाही. मग फक्त विसर्जनच होत राहील. ज्या भावाने सर्जन केले होते, त्याच भावाने विसर्जन होत राहील.

## अनुभव-लक्ष-प्रतीती

'स्वत:' अनादि काळापासून भ्रांतीत अडकला आहे. आत्मा तर स्वभावातच आहे, पण विभावामुळे भ्रांती उत्पन्न झाली. याला सुषुप्त अवस्था म्हणतात. जेव्हा जागा होतो तेव्हा त्याचे लक्ष बसते. तो ज्ञानामुळे

जागा होतो 'ज्ञानी पुरुष' ज्ञानासह बोलावतात. म्हणून आत्मा जागा होतो. त्यानंतर मग लक्ष जात नाही. लक्ष बसले की मग अनुभव, लक्ष आणि प्रतीती राहते. या लक्षाबरोबर प्रतीती असतेच. आणि आता अनुभव वाढत जातील. पूर्ण अनुभवाला केवळज्ञान म्हटले आहे.

## सामीप्यभावामुळे मुक्ती

अज्ञानतेमुळे कषाय उत्पन्न होतात. ज्ञानामुळे कषाय होत नाहीत. स्वरूपज्ञान झाल्यानंतर तुम्ही 'उग्र' झालात तर ते पूर्वीचे कषाय आहेत आणि आता ते डिस्चार्ज होत आहेत. डिस्चार्ज होत आहेत, त्याला भगवंतांनी चारित्र्य मोहनीय असे म्हटले आहे.

'आपला' 'शेजारी' चेतनभावासहित आहे. तो चार्ज झालेला आहे, म्हणून अपमान झाला तर त्याचे सर्व भाव, बुद्धीचे सर्व भाव, मनाचे भाव उफाळून येतात, ते सर्व शेजाऱ्याचे भाव आहेत. मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार, हे सर्व जेव्हा उसळून येतात तेव्हा 'तुम्ही' चंदुभाईला हळूच सांगा, 'उड्या मारू नकोस, आता शांत राहा.' म्हणजेच तुम्ही शेजाऱ्याप्रमाणे शेजारधर्म पाळा. एखाद्या वेळी तो फारच उत्तेजित झाला तर तुम्ही आरशासमोर जाऊन पाहा. त्या आरशात तुम्हाला चंदुभाई दिसतील ना? मग चंदुभाईवरून हळूवार हात फिरवा, तुम्ही इथे हात फिरवाल, तर त्या आरशातही हात फिरेल. असे दिसेल ना? मग तुम्ही चंदुभाईला म्हणा, 'शांत व्हा, 'आम्ही' आहोत ना, मग आता तुम्हाला कसली भीती?' या प्रकारे सराव करा. आरशासमोर बसलात की तुम्ही वेगळे आणि चंदुभाई वेगळे. दोन्ही वेगळे आहेतच. सामीप्यभावामुळे एकरूपता झाली आहे. दुसरे काहीच नाही. सुरुवातीपासून वेगळेच आहेत. ही तर फक्त 'रॉंग बिलिफ' (चुकीची मान्यता)च बसली आहे. 'ज्ञानी पुरुष' जेव्हा 'राइट बिलिफ' देतात तेव्हा निराकरण होते. हे दृष्टीफेरच आहे. केवळ दृष्टीचीच चूक आहे.



## [ 10 ]

## विषयांत सुखबुद्धी कोणाला वाटते?

**दादाश्री :** तुमच्या किती फाइल्स् आहेत?

**प्रश्नकर्ता :** माझी तर फक्त एकच 'फाइल' आहे, वेदनीयची.

**दादाश्री :** आता जर तुम्ही वेदनीयला असे म्हणाल की 'इथे येऊ नकोस.' तर मग जी वेदनीय पूर्वी आठ फूट उंच होती ती ऐंशी फूट उंच होऊन येईल, आणि जर तुम्ही तिला म्हणाल 'तू लवकर ये,' तर मग आठ फुटाची असली तरी दोन फुटा एवढीच वाटेल. आणि जेव्हा वेदनीयचा काळ संपेल तेव्हा तर ती थांबणारच नाही लगेच निघून जाईल. मग जी आपल्याबरोबर कायम राहणार नसेल तिला तर 'गेस्ट' (पाहुणी) म्हणायला हवे ना? गेस्टबरोबर तर आपण चांगले वागायला हवे ना? संयम राखायला हवा. तुम्हाला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** वाटते तर खरे दादा, पण सहन होत नाही.

**दादाश्री :** हे जे सहन होत नाही, त्याला 'सायकॉलोजिकल इफेक्ट' (मानसिक परिणाम) म्हणतात. तेव्हा 'दादा, दादा' असे म्हणा, आणि 'मला सहनशक्ती द्या' असे म्हणाल तर तशा शक्ती उत्पन्न होतील.

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत पाच इंद्रियांच्या विषयात सुखबुद्धी आहे तोपर्यंत अशा प्रकारे निकाल करता येत नाही ना?

**दादाश्री :** ती सुखबुद्धी आत्म्यात नसते. जो आत्मा मी तुम्हाला

दिला आहे त्यात सुखबुद्धी किंचितही नाही. हे सुख त्याने कधी चाखलेलेही नाही. ही जी सुखबुद्धी आहे ती अहंकारामध्ये आहे.

सुखबुद्धी असली तरी हरकत नाही. सुखबुद्धी ही आत्म्याची गोष्ट नाही, ती पुद्‌गलाची आहे. तुम्हाला एखादी वस्तू दिली की तुम्हाला त्या वस्तूबद्दल सुखबुद्धी उत्पन्न होते. पण नंतर तीच वस्तू जास्त दिली तर तुम्हाला त्यात दुःखबुद्धीही निर्माण होते. हे तुम्हाला माहीत आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, खूप वीट येतो मग.

**दादाश्री :** अर्थात ती पुद्‌गल आहे, पूरण-गलन होणारी गोष्ट आहे, कायमची गोष्ट नाही. 'टेम्पररी ॲडजस्टमेन्ट' आहे. सुखबुद्धी म्हणजे, हा आंबा चांगला आहे आणि तो परत मागितला, म्हणून त्यात सुखबुद्धी आहे असे मानता येणार नाही. ते तर फक्त देहाचे आकर्षण आहे.

**प्रश्नकर्ता :** देहाचे आणि जिभेचे आकर्षण खूप होत असते.

**दादाश्री :** हे जे आकर्षण होत असते, त्यात फक्त जागृती राखायची आहे. आम्ही तुम्हाला जे वाक्य दिले आहे ना, 'मन, वचन, काया यांच्या सर्व संगी क्रियांपासून मी पूर्णपणे असंगच आहे.' ही जागृती राहिली पाहिजे. आणि खरोखर-एक्झॅटली तसेच आहे. हे सर्व पूरण-गलन आहे. तुम्ही ही जागृती ठेवली तर तुम्हाला कर्मबंधन होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** जर अशी जागृती राहिली नाही तर तो आमच्या चारित्र्याचा दोष मानायचा का?

**दादाश्री :** तसे क्रमिक मार्गात असते.

**प्रश्नकर्ता :** पण त्या चारित्र्यामोहामुळे ढिलेपणा येतो.

**दादाश्री :** 'क्रमिक मार्गात' त्याला ढिलेपणा म्हणतात. त्यासाठी तुम्हाला उपाय करावा लागतो. पण या (अक्रम मार्गात) याला ढिलेपणा म्हणत नाही. यात तर तुम्हाला फक्त जागृतीच राखायची आहे. आम्ही जो आत्मा दिला आहे ती जागृतीच आहे.

**प्रश्नकर्ता :** जागृती नसेल तर राग (मोह, आसक्ती) होतो ना?

**दादाश्री :** नाही. असे नाही. आता तुम्हाला राग होतच नाही. हे जे होत आहे ते तर आकर्षण आहे.

**प्रश्नकर्ता :** जे होत आहे ते आकर्षण आहे, तर याला कमकुवतपणा म्हणायचा नाही का?

**दादाश्री :** नाही, त्याला कमकुवतपणा म्हटले जाणार नाही. त्याचे आणि आत्म्याचे काहीही देणेघेणे नाही. ते फक्त तुम्हाला तुमचे सुख मिळू देत नाही. त्यामुळे एक-दोन जन्म अधिक घ्यावे लागतील. परंतु त्यावर उपायही आहे. आपल्या इथे हे सर्व जण 'सामायिक' करतात त्या सामायिकमध्ये हा विषय घेऊन ध्यान कराल तर तो विषय विलय होत जाईल, संपून जाईल. तुम्हाला ज्याचा ज्याचा विलय करायचा असेल, त्याचा येथे (सामायिकमध्ये) विलय करता येईल.

**प्रश्नकर्ता :** असे काही असेल तर ते कामाचे आहे ना?

**दादाश्री :** हो आहे. इथे सर्वकाही आहे. इथे आम्ही तुम्हाला सर्व काही दाखवू. तुम्हाला एखाद्या ठिकाणी जिभेचा स्वाद बाधक होत असेल तर तोच विषय सामायिकमध्ये ठेवा. आणि जसे सांगितले आहे त्याप्रमाणे त्याला पाहत राहा. फक्त पाहण्यानेच त्या सर्व गाठी विलय पावतील.

विचार आल्याशिवाय तर कधी आकर्षण होतच नाही. आकर्षण होणार असेल तेव्हा आतमध्ये विचार येतात. विचार मनातून येतात आणि मन गाठीचे बनलेले आहे. ज्याचे विचार जास्त येतात ती गाठ मोठी आहे.

## संसार चालविण्यासाठी आत्मा अकर्ता

आतमध्ये जे भाव होत असतात ते भावक करवितात. आतमध्ये क्रोधक, लोभक, मानक, हे भावक आहेत. ते सर्व आत बसलेले आहेत, आणि ते भाव करवितात. त्यांच्यात जर भाव्य मिसळला, भाव्य म्हणजेच आत्मा (प्रतिष्ठित) जर तन्मयाकार झाला तर नवीन चित्रिकरण होते.

हा जो संसार आहे तो आत्म्याच्या उपस्थितीमुळे चालतो. त्यात जर आत्मा किंचितदेखील तन्मयाकार झाला नाही, तरीही संसार चालू शकतो. म्हणूनच आम्ही हा 'व्यवस्थित'चा शोध लावला आहे. 'क्रमिक'मध्ये तर आत्म्याने चालविल्याशिवाय चालणारच नाही असे मानतात, याउलट आम्ही तुम्हाला विज्ञान दिले आहे, आणि 'व्यवस्थित' सर्व काही चालवेल.

**प्रश्नकर्ता :** मला द्वेष झाला, तर त्यात आत्मा तन्मयाकार झाला की नाही? तो द्वेष कोणी केला? मी केला?

**दादाश्री :** आत्मा तन्मयाकार होतो तेव्हा काय होते? राग आणि द्वेष दोन्ही होतात. आता राग-द्वेष झाले आहेत हे कसे कळणार? तर जेव्हा द्वेष होतो तेव्हा आतमध्ये चिंता होते, जीव जळतो. या ज्ञानानंतर आत्मा तन्मयाकार होत नाही. म्हणून शांतीची स्थिती राहते, निराकूळता वाटते. निराकूळता म्हणजेच सिद्ध भगवानांचे 1/8 गुण उत्पन्न झाले असे म्हणतात. जग तर आकूळता आणि व्याकूळता यातच असते. सतत तळमळ होतच असते. म्हणून तर लोक 'ज्ञानींना' शोधत असतात.

लोक समजतात की आत्मा भाव करतो. खरे तर आत्मा भाव करत नाही. भावक भाव करवितात. भाव उत्पन्न होतात, त्यांना खरे मानणे म्हणजेच तन्मयाकार होणे. त्यातून मग बीज पडते.

**प्रश्नकर्ता :** भावक म्हणजे जुनी कर्मे?

**दादाश्री :** भावक म्हणजे मनाच्या गाठी. कोणाची मानाची गाठ, कोणाची लोभाची गाठ, कोणाची क्रोधाची गाठ, तर कोणाची विषयाची गाठ. या सर्व गाठीच त्रास देतात. आत्मा प्राप्त झाल्यानंतर मग भावांत 'भाव्य' तन्मयाकार होत नाही, त्यामुळे मग निराकूळता वाटते.

## निराकूळ आनंद

साऱ्या जगात जो आनंद आहे, तो आकूळता आणि व्याकूळता असलेला आनंद आहे आणि 'ज्ञानी' झाल्यानंतर निराकूळ आनंद उत्पन्न होतो.

'ज्ञानी पुरुषां'पाशी निराकूळ आनंद उत्पन्न होतो. पुद्‌गलाचा काहीच संबंध नाही, तर मग हे सुख कुठून उत्पन्न झाले? तर हे जे स्वाभाविक सुख, सहज सुख, उत्पन्न झाले, तेच आत्म्याचे सुख आहे आणि एवढेच ज्याला पक्के समजले तो सहजसुखाच्या स्वपदात राहील, मग तो हळूहळू परिपूर्ण होईल!

आनंद दोन प्रकारचे असतात : एक आपल्याला धंद्यात खूप पैसे मिळाले, चांगला सौदा झाला तर त्यावेळी आनंद होतो. पण त्याला आकूळता-व्याकूळता असलेला आनंद, मूर्च्छित आनंद म्हणतात. मुलाचे लग्न करतात, मुलीचे लग्न करतात तेव्हाही आनंद होतो, तो पण आकूळता-व्याकूळता असलेला आनंद, मूर्च्छित आनंद म्हटला जातो आणि जेव्हा निराकूळ आनंद होईल तेव्हा समजावे की आत्मा प्राप्त झाला.

**प्रश्नकर्ता :** निराकूळ आनंद कशाला म्हणतात?

**दादाश्री :** इथे सत्संगात जो आनंद होतो, तो निराकूळ आनंद असतो. इथे आकूळता आणि व्याकूळता नसते.

आकूळता-व्याकूळता असलेल्या आनंदात काय असते की आतमध्ये गोंधळ चालू असतो. पण इथे तर गोंधळ बंद असतो आणि जगाचे विस्मरण होते. आता जर एखाद्या वस्तूमुळे आनंद झाला तर आपल्याला समजते की हा पौद्‌गलिक आनंद आहे. आणि हे तर सहज सुख! म्हणजेच निराकूळ आनंद. आकूळता-व्याकूळता नाही. जणू आपण स्थिर झालो आहोत असेच आपल्याला वाटते. किंचितही उन्माद नसतो.

ज्यांच्या परिचयात आपण राहतो, त्यांच्यासारखेच आपण बनतो.

**प्रश्नकर्ता :** आपण आम्हाला जे दिले आहे त्यामुळे या काळात आपण ज्या स्थितीपर्यंत पोहोचला आहात, त्या स्थितीपर्यंत आम्ही पोहोचू शकतो का?

**दादाश्री :** आपल्याला दुसरे कामच काय आहे? तुम्हाला निराकूळता प्राप्त झाली आहे ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** निराकूळता, हा सिद्ध भगवानांचा 1/8 गुण आहे. 1/8 सिद्ध झालात. मग चौदा आणे शिल्लक राहिले ते मग नंतर होतील. सिद्ध तर झालात ना? शिक्का तर लागला ना? मग आता कसली भीती? आता जर कोणी वरून येईल आणि म्हणेल 'चला साहेब मोक्षाला.' तर मी म्हणेन, 'काय घाई आहे?' तर तो म्हणेल 'आम्हाला तुमच्याबद्दल *लागणी* (भावुकता असलेले प्रेम, आपुलकी) आहे.' तेव्हा मी म्हणेन 'अहो, भाऊसाहेब, माझ्यावर *लागणी* ठेवू नका. मी *लागणी* ठेवण्यासारखा पुरुष नाही. माझा मोक्ष माझ्याजवळ आहे.' निराकूळता उत्पन्न झाली की मग काय बाकी राहिले? नाहीतर चिंता-वरीज् भटकवतच ठेवतात, अहंकार भटकवतच ठेवतो.

## अहंकाराची प्रतिस्पंदने - व्यवहारात

अहंकार आंधळे बनवतो. जेवढा अहंकार जास्त तेवढे आंधळेपण जास्त.

**प्रश्नकर्ता :** कार्य करण्यासाठी तर अहंकाराची गरज लागेलच ना?

**दादाश्री :** नाही, तो निर्जीव अहंकार वेगळा आहे. त्याला अहंकार म्हणतच नाहीत ना? लोक देखील त्याला अहंकारी म्हणत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** मग कोणता अहंकार नुकसानदायक आहे?

**दादाश्री :** तुम्ही सर्व जण मला 'ज्ञानी' म्हणून ओळखता. परंतु बाहेर व्यवहारात लोक मला 'ज्ञानी' म्हणून थोडेच ओळखतात? तरी पण लोकांना माझ्यात अशी एकही गोष्ट दिसणार नाही की ज्यामुळे लोक मला अहंकारी म्हणतील. याउलट तुम्हाला ते तसे म्हणतील. या अहंकाराने सर्व काही धुळीला मिळवले आहे.

**प्रश्नकर्ता :** पण या अहंकारानेच सर्व व्यवहार चालतो ना?

**दादाश्री :** अहंकाराने व्यवहार चालत नाही. अहंकार एका मर्यादेबाहेर जाता कामा नये, नाहीतर तो नुकसान करतो.

**प्रश्नकर्ता :** लोकांकडे आमच्या पूर्वीच्या अहंकाराची प्रतिस्पंदने पोहोचली आहेत, म्हणून त्यांना आम्ही अहंकारीच वाटतो.

**दादाश्री :** तुमची पूर्वीच्या अहंकाराची प्रतिस्पंदने जोपर्यंत संपणार नाहीत, तोपर्यंत तुम्हाला वाट पाहावी लागेल.

एक चांगल्या अब्रूदार घराण्यातील मुलगा होता. पण त्याला चोऱ्या करण्याची वाईट सवय लागली होती. नंतर त्याने चोरी करणे बंद केले आणि तो माझ्याजवळ येऊन मला म्हणाला, 'दादा, अजूनही लोक मला चोर म्हणतात.' मी त्याला म्हटले 'तू गेली दहा वर्षे चोरी करत होतास, तरी पण लोकांनी तुला ओळखले नाही. तेव्हा तुला लोक सावकार म्हणत होते. आता तू चोर नाहीस. तू सावकार झालास, तरी पण दहा वर्षांपर्यंत चोरीबद्दलची जुनी प्रतिस्पंदने येत राहतील. म्हणून तू आता दहा वर्षे सहन कर. पण आता परत चोरी करू नकोस.' कारण तुला असे वाटेल की एवीतेवी 'लोक मला चोर म्हणतच आहेत, तर मग चोरीच करावी.' पण असे करू नकोस.

हा काळोख लगेच संपेल असा नाही. आम्हाला ज्ञान झाले त्यापूर्वीची आमची प्रतिस्पंदने आमच्या नातेवाईकांना अजूनही कधीकधी जाणवतात.

**प्रश्नकर्ता :** मग ती प्रतिस्पंदने लवकर कशी जातील?

**दादाश्री :** हळूहळू जाऊच लागली आहेत. इथून गाडी निघाली की लोक काय म्हणतात? गाडी मुंबईला गेली.

**प्रश्नकर्ता :** एक 'पेसेंजर' ट्रेन असते आणि एक 'राजधानी एक्सप्रेस' असते. मला 'राजधानी एक्सप्रेस' हवी आहे.

**दादाश्री :** तो तर उतावीळपणा आहे. तुम्ही खिचडी कच्ची शिजवलीत तर सगळ्यांना कच्ची खावी लागेल. म्हणून अशा जेवणासाठी आपण 'धीरजलाल'लाच (!) बोलवावे (धीर धरावे)!

## परिणाम परसत्तेत

**प्रश्नकर्ता :** चुकीचे करणाऱ्याला सर्व समजत असते, तरीही तो चुकीची कृत्ये का करतो?

**दादाश्री :** चुकीचे होत आहे, तो पर-परिणाम आहे. आपण इथून हा 'चेंडू' फेकला आणि त्याला म्हटले की आता तू जिथे फेकलेला आहेस तिथेच थांबून रहा, तिथून दूर जाऊ नकोस. तर हे शक्य आहे का? नाही. 'चेंडू' फेंकल्यानंतर तो पर-परिणामात जातो. म्हणून ज्या प्रकारे केले असेल, म्हणजे चेंडू तीन फूट उंचीवरून टाकला असेल तर परिणाम दोन फुटाचे येतील! दहा फुटांचे परिणाम सात फूट होतील, पण ते आपणहूनच बंद होतील, मात्र तुम्ही त्यात परत हात घातला नाही तर!

**प्रश्नकर्ता :** असे म्हणता येईल की फार पूर्वीपासून चुकीचे करत आला आहे, म्हणून चुकीच्या दिशेला ओढला जातो.

**दादाश्री :** असे काही नाही. हे सर्व 'व्यवस्थित'च्या हातात आहे. तेव्हा यात त्याचा दोष नाही. फक्त त्याने 'मी कोण आहे?' हे समजून घ्यायला हवे. तेवढे समजले तर त्याला मुक्तीचा श्वास मिळतो. समजत नाही म्हणून तर ही सारी बंधने पडत राहतात.

हे आपले 'सायन्स'आहे, संक्षिप्त 'सायन्स' आहे. जर 'ज्ञानी पुरुष' भेटले आणि ज्ञान मिळाले तर गोष्ट एकदम छोटी आहे आणि 'ज्ञानी पुरुष' भेटले नाहीत तर काहीच काम होणार नाही. जर 'ज्ञानी पुरुष' मिळाले नाहीत तर (चांगली कर्मे) उर्ध्वगतीला नेतील, पुण्य मिळवून देतील, पण मुक्ती मिळत नाही.



[ 11 ]

## मानवी स्वभावात विकार हेय,
## आत्म स्वभावात विकार ज्ञेय!

**प्रश्नकर्ता :** स्वरूपाचे ज्ञान प्राप्त झाल्यानंतरही मनात विकार राहतात. त्याचे कारण काय?

**दादाश्री :** मनाचे विकार तर ज्ञेय आहेत. म्हणजे ती पाहण्याची वस्तू आहे. पूर्वी आपण मानवस्वभावात होतो. तेव्हा हे चांगले आणि ते वाईट, हे चांगले विचार आणि हे वाईट विचार, असे असे. आता आपण आत्मस्वभावात आलोत, त्यामुळे सर्व विचार सारखेच! सर्व विचार 'ज्ञेय' आहेत आणि 'आपण' ज्ञाता आहोत. ज्ञेय-ज्ञाता असा संबंध आहे. मग ढवळाढवळ करण्याचा प्रश्नच कुठे येतो? सांगा बरे?

**प्रश्नकर्ता :** या प्रकारे आत्मदृष्टीने पाहाण्यासाठी काही पुरुषार्थ करावा लागतो की मग आपलेआपणच दिसते?

**दादाश्री :** आपलेआपणच दिसते! आम्ही जे ज्ञान दिले आहे त्याने 'रिलेटिव्ह' आणि 'रियल'ला पाहा, सर्व 'रिलेटिव्ह' विनाशी गोष्टी आहेत आणि सर्व 'रियल' अविनाशी आहे. आपल्याला ही जी सारी ज्ञेये दिसतात ती सर्व विनाशी ज्ञेये आहेत. स्थूल संयोग, सूक्ष्म संयोग, हे सर्व विनाशी संयोग आहेत. ह्या सर्व गोष्टी इथे सत्संगात येऊन विचारायला हव्यात. आणि स्पष्टीकरण मिळवून घ्यायला हवे. मग प्रत्येक गोष्टीचे लक्ष राहील आणि लक्ष राहिले की मग काहीच करावे लागणार

नाही. स्वरूपाचे ज्ञान प्राप्त झाल्यावर काहीच करावे लागत नाही. ज्ञान ज्ञानातच राहते. आत्मा ज्ञायक स्वभावातच राहतो. ज्ञायक म्हणजे जाणत राहण्याच्या स्वभावातच राहतो. आत्म्याला इतर कोणताच स्वभाव उत्पन्न होत नाही.

**प्रश्नकर्ता :** जाणणे म्हणजे मनाला जाणणे की शरीराच्या संवेदनांना जाणणे?

**दादाश्री :** सर्व काही जाणणे. मनात विचार येतात ते ही जाणणे, बुद्धी काय करत आहे ते पण जाणणे, आणि अहंकार काय करत आहे, ते पण जाणणे. जेवढेही संयोग आहेत त्या सर्वांनाच जाणणे. संयोग समजतात की नाही? मनात विचार येतात आणि जातात, त्यांना संयोग म्हणतात. कोणतीही गोष्ट येते आणि जाते तिला संयोग म्हणतात. आणि जो येत नाही आणि जात नाही, जो पाहाणारा आहे तो तर सदैव असतो, तो 'ज्ञायक' आहे. हा ज्ञायक येणाऱ्या-जाणाऱ्या सर्व संयोगांना पाहत असतो, हा अमका माणूस आला आणि गेला. असे सर्व पाहतच असतो, हाच आत्म्याचा स्वभाव आहे, आणि शेवटी सर्व संयोग वियोगी स्वभावाचेच आहेत. म्हणून जरी आपण त्यांना म्हटले की बसा थोडा वेळ, तरी पण ते जातीलच!

तुमचा जोपर्यंत मानवीस्वभाव होता तोपर्यंत मनात जे विचार येत होते त्यात तुम्ही तन्मयाकार होत होता आणि हे विचार 'मला येत आहेत' असे तुम्हाला वाटे. आता तुम्हाला तन्मयता राहिली नाही. आता 'तुम्ही' मुक्त राहता. कारण मानवी स्वभाव हा पौद्‌गलिक स्वभाव आहे आणि आता जो आहे तो आत्मस्वभाव आहे. आत्मस्वभाव हा अविनाशी स्वभाव आहे, आणि मानवी स्वभाव विनाशी आहे. तो तर येतो आणि जातो, त्याला पाहत राहायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** दादा, संयोगच नसतील तर?

**दादाश्री :** संयोग नसतील तर आत्मा पण नसेल.

**प्रश्नकर्ता :** तिथे आत्मा नसतो का?

**दादाश्री :** नाही, संयोग नसतील तर आत्मा काय पाहणार? संयोगांचे अस्तित्व नसेल तर आत्म्याचे पण अस्तित्व नसेल.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे याचा अर्थ असा झाला की जड आणि चेतन दोन्ही एकत्रच असतात. त्याशिवाय तर काही होणारच नाही ना?

**दादाश्री :** संपूर्ण जग हे असेच्या असेच राहणार आहे. हे जग कधीच ज्ञेयरहित होणार नाही! ज्ञाताही राहतील आणि ज्ञेयेही राहतील.

**प्रश्नकर्ता :** सिद्धक्षेत्रात गेले की तिथे संयोग नसतात ना?

**दादाश्री :** नाही, पण तिथे असून देखील त्यांना येथील सर्व संयोग दिसतात. त्यांना काय पाहायचे असते? तर हेच पाहायचे. हा मी इथे हात वर केला तर त्यांना तिकडे मी वर केलेला हात दिसतो.

**प्रश्नकर्ता :** त्यांचा ज्ञाता-द्रष्टा गुण तर कायमच असतो ना?

**दादाश्री :** हो, तो कायमच असतो. ते आत्म्याचे स्वरूपच आहे. आणि ज्ञाता-द्रष्टा राहिले तरच आनंद असतो. नाहीतर आनंद असूच शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** ज्ञाता-द्रष्टा राहिले नाही तर काय आनंद नसतो?

**दादाश्री :** नसतो. ज्ञाता-द्रष्टाचे फळ आनंद आहे. एकीकडे ज्ञाता-द्रष्टा होणे आणि दुसरीकडे आनंद उत्पन्न होणे, असे असते. उदाहरणार्थ सिनेमाला गेलेला माणूस जर पडदा उघडलाच नाही तर अस्वस्थ होतो, शिट्या मारत राहतो. असे का करतो? कारण तो जे पाहायला आला आहे ते त्याला पाहायला मिळत नाही म्हणून त्याला दुःख होते. जोपर्यंत ज्ञेय दिसत नाही तोपर्यंत त्याला सुख उत्पन्न होत नाही. त्याच प्रकारे आत्मा ज्ञेयांना पाहतो आणि जाणतो, तेव्हा आतमध्ये परमानंद उत्पन्न होतो. समजा रात्री खोलीत एकटाच झोपलेला असेल तर तेव्हा काय पाहील? तेव्हा कोणते फोटो पाहील? तर तेव्हा आतील सर्व दिसते. शेवटी झोप पण दिसते, स्वप्न पण दिसते.

**प्रश्नकर्ता :** पण सिद्धक्षेत्रात स्वप्न दिसत नाही ना?

**दादाश्री :** नाही, तिथे स्वप्न नसते. हा देह आहे म्हणून स्वप्न आहे आणि आता जे समोर दिसत आहे ते पण उघड्या डोळ्यांचे स्वप्न आहे. ज्ञानींना झोप नसते त्यांचे तर पाहणे चालूच असते. त्यांना दुसऱ्या प्रदेशात पाहायला मिळते, सिद्धक्षेत्रात तर देहच नसतो. या देहाचे देखील ओझे आहे, दु:ख आहे. ज्ञानींना देहाचे खूप वजन जाणवते.

**प्रश्नकर्ता :** हा देह आहे, हा कर्मांचाच परिणाम आहे ना?

**दादाश्री :** हो, कर्मांचाच परिणाम आहे.

**प्रश्नकर्ता :** कर्मांची संपूर्ण निर्जरा व्हायला हवी ना?

**दादाश्री :** कर्मांची संपूर्ण निर्जरा झाली की तो जातो. शुद्ध चित्त झाले तर कर्मांची निर्जरा झाली, असे म्हटले जाते.

**प्रश्नकर्ता :** अव्यवहार राशीत ज्ञातापण आणि संयोग असतात का?

**दादाश्री :** त्यात तर पोत्यात बांधून ठेवल्यासारखे वाटते. तिथे खूप दु:ख असते.

**प्रश्नकर्ता :** त्यात अस्तित्वाचे भान असते का?

**दादाश्री :** अस्तित्वाचे भान असते, म्हणूनच दु:ख जाणवते.

**प्रश्नकर्ता :** नरकगतीत काय होते?

**दादाश्री :** नरकगतीत देखील पंचेंद्रियांची दु:खे असतात. जर सातव्या नरकाची दु:खे ऐकली तर माणूस मरूनच जाईल! तिथे तर भयंकर दु:खे असतात. अव्यवहार राशीतील जीवांना इतकी भयंकर दु:खे नसतात. त्यांना घुसमट होत असते.

## ज्ञानी बुद्धीला शृंगारित करतात

लोक बुद्धीला ज्ञान म्हणतात, पण बुद्धी हा 'इनडायरेक्ट' प्रकाश आहे आणि 'ज्ञान' आत्म्याचा 'डायरेक्ट' प्रकाश आहे.

**प्रश्नकर्ता :** बुद्धी कुठे पूर्ण होते आणि प्रज्ञा कुठून सुरू होते?

**दादाश्री :** बुद्धी पूर्ण होण्यापूर्वीच प्रज्ञेची सुरुवात होऊन जाते. 'ज्ञानी पुरुष' भेटले आणि त्यांनी आत्मा प्राप्त करवून दिला की प्रज्ञेची सुरुवात होते. ही प्रज्ञाच मोक्षाला घेऊन जाते. प्रज्ञा आत निरंतर सावध करत असते आणि बुद्धी आत ढवळाढवळ करत असते.

**प्रश्नकर्ता :** पण बुद्धीचे काही 'पॉझिटिव्ह' कार्य तर असेलच ना?

**दादाश्री :** बुद्धीचे 'पॉझिटिव्ह' कार्य हेच आहे की जर ज्ञानी पुरुषांकडून बुद्धी सम्यक् करवून घेतली असेल, तर ती चालेल. स्वत:च्या समजेनुसार चालत असेल तर ती विपरीत बुद्धी. त्या बुद्धीला व्यभिचारीणी बुद्धी असे म्हणतात. ज्या बुद्धीला 'ज्ञानी पुरुषां'कडून 'गिलेट' (मुलामा) चढवून घेतला असेल अशा बुद्धीला श्रीकृष्णाने अव्यभिचारिणी बुद्धी म्हटले आहे. जेवढा वेळ तुम्ही आमच्याजवळ बसाल, तेवढा वेळ तुमची बुद्धी सम्यक् होऊ लागेल.

**प्रश्नकर्ता :** पण मग आम्ही इथून निघून गेल्यावर काय होईल?

**दादाश्री :** आमच्याजवळ बसल्याने जेवढ्या बुद्धीवर 'गिलेट' झाला असेल ती सम्यक् होऊन जाते. ती बुद्धी मग तुम्हाला त्रास देणार नाही आणि जेवढी बुद्धी विपरीत असेल, ती तुम्हाला त्रास देईल.

**प्रश्नकर्ता :** आमची बुद्धी पूर्णपणे सम्यक् राहावी, विपरीत राहू नये, यासाठी आम्ही कोणता पुरुषार्थ करावा?

**दादाश्री :** येथे येऊन तुम्ही ती सम्यक् करवून घ्यावी. तुम्हाला स्वत:ला ते जमणार नाही.

**प्रश्नकर्ता :** फक्त येथे येऊन बसल्यानेच बुद्धी सम्यक् होईल का?

**दादाश्री :** येथे प्रश्न विचारून, चर्चा करून, समाधान मिळवून

बुद्धी सम्यक् होत जाते. नंतर तुमच्यात बुद्धी राहणारच नाही. बुद्धीचा अभाव व्हायला खूप वेळ लागेल, पण प्रथम बुद्धी सम्यक् तर होत जाईल.

**प्रश्नकर्ता :** आमच्याजवळ सम्यक् बुद्धी आहे, विपरीत बुद्धी आहे आणि प्रज्ञा पण आहे, तर या तिघांचे कार्य एकदमच चालू आहे?

**दादाश्री :** हो, या तिघांचे कार्य एकदम चालू आहे. प्रज्ञा मोक्षाला नेण्यासाठी सतत सावध करत असते! इशारा देत असते. आणि मोक्षाचा रस्ता अडविण्यासाठी अज्ञा आहे. अज्ञा कधीच मोक्षाला जाऊ देत नाही. अज्ञा हे बुद्धीचे प्रदर्शन आहे. बुद्धी तर संसारातील फायदा नुकसानच दाखवते, द्वंद्वच दाखविते.

**प्रश्नकर्ता :** द्वंद्वातील फसगत आणि घर्षण, हा तर आयुष्याचा कायमचा एक भाग आहे. जिथे-तिथे हे द्वंद्व येऊन उभेच राहते.

**दादाश्री :** त्या द्वंद्वातच जग अडकले आहे ना! आणि 'ज्ञानी' द्वंद्वातीत असतात. फायद्याचा परिणाम फायद्याच्या रूपात होत नाही आणि नुकसानाचा परिणाम नुकसानाच्या रूपात होत नाही. फायदा-नुकसान कशातून निघतात? 'माझ्या'तून की बाहेरून? हे सर्व ते जाणतात.

## बुद्धीचा अंत

**प्रश्नकर्ता :** बुद्धी अजूनही ढवळाढवळ करते, तर काय करावे?

**दादाश्री :** बुद्धी ह्या बाजूने ढवळाढवळ करू लागली की तुम्ही दृष्टी दुसरीकडे वळवा. वाटेत तुम्हाला एखादी नावडती व्यक्ती दिसली की तुम्ही तोंड दुसरीकडे वळवता ना? तसेच जो आपल्यात ढवळाढवळ करत आहे, त्याच्यापासून दृष्टी हटवा. ढवळाढवळ कोण करते? बुद्धी! बुद्धीचा स्वभाव काय? तर ती आपल्याला संसारातून बाहेर निघूच देत नाही.

**प्रश्नकर्ता :** बुद्धी कधी संपते?

**दादाश्री :** जर तुम्ही तिच्याकडे खूप काळापर्यंत पाहिलेच नाही,

दृष्टी फिरवूनच राहिलात तर तिला समजेल. मग ती आपणहूनच बंद होईल. तुम्ही जोपर्यंत तिला खूप मान द्याल, तिचा स्वीकार कराल, तिचे सल्ले मानाल, तोपर्यंत ती ढवळाढवळ करतच राहील.

**प्रश्नकर्ता :** मन-बुद्धी-चित्त-अहंकार यावर आपला प्रभाव पडायला नको का?

**दादाश्री :** मशिनरीवर (यंत्रांवर) कधी प्रभाव पडतच नाही. म्हणजेच मन-बुद्धी-चित्त-अहंकार यावर प्रभाव पडतच नाही. अंत:करण जेव्हा रिकामे होईल, तेव्हा सर्व आपोआप जाग्यावर येईल. 'त्यांना' साथ दिली नाहीत आणि त्यांना 'पाहत'च राहिलात तर मग तुम्ही मुक्तच आहात. जेवढा वेळ 'तुम्ही' त्यांना पाहत राहाल, तेवढा वेळ चित्त शुद्ध होत राहील. जरी फक्त चित्त जाग्यावर आले तरी इतर सर्व काही जाग्यावर येईल. अशुद्ध चित्तामुळेच लोक भटकत असतात. म्हणून तर चित्ताची शुद्धी होईपर्यंत हा योग चांगला जमवता यायला हवा.

**प्रश्नकर्ता :** आतमध्ये कपट उत्पन्न होते, कपटाचे विचार येतात, तर काय करावे?

**दादाश्री :** ते सर्व पुद्‌गल आहे. विचार करणारा पण पुद्‌गल आहे. आत्म्यात असे काही नसते, त्यात कोणत्याच प्रकारचा कचरा नसतो. 'पझल' होत असते ते पण पुद्‌गल आहे आणि पझल निर्माण करणाराही पुद्‌गल आहे. 'पझल'ला जाणले कोणी? तर आत्म्याने. सरळपणा आणि कपट याला जो जाणतो तो आत्मा आहे!

## डिसिजनमध्ये वेव्हरिंग

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत एखाद्या गोष्टीचा डीसिजन (निर्णय) होत नाही, तोपर्यंत वेव्हरिंग (द्विधा) असते.

**दादाश्री :** 'डिसिजन' होत नाही म्हणून काही त्या प्लॅटफॉर्मवर बसून राहायचे नाही. 'आता जाऊ की नंतर' असे वाटू लागले तर जी गाडी येईल त्यात बसावे.

'डिसिजन' होत नाही याचे कारण बुद्धीचा अभाव हे आहे. बुद्धीवान व्यक्ती प्रत्येक बाबतीत त्वरित 'डिसिजन' घेऊ शकतात, 'ऑन दी मोमेन्ट' (अगदी त्याच क्षणी). पाच मिनिटे पण लागत नाहीत. म्हणून आम्ही त्याला 'कॉमनसेन्स' म्हणतो. 'कॉमनसेन्स' म्हणजे 'एवरीव्हेर ॲप्लीकेबल' (सगळीकडे लागू). ही किल्ली अशी आहे की तिने सर्व कुलपे उघडतात.

इथे बसू की जाऊ, याचा निर्णय होत नसेल तर तू जायला लाग. हो, मग जर तुला इथे बसायचे असेल तर 'व्यवस्थित शक्ती' तुला परत इथे घेऊन येईल. तुला अशा प्रकारे निर्णय घ्यायला हवा.

**प्रश्नकर्ता :** काहीही झाले तरी इथून जायचेच नाही, असाच निश्चय असतो आणि त्याचवेळी (बुद्धी) असेही दाखवते की जावे तर लागेलच?

**दादाश्री :** तेव्हा जास्त जोर कुठल्या बाजूने आहे, हे पाहावे.

**प्रश्नकर्ता :** इथे बसण्याच्या बाजूनेच जोर देतो!

**दादाश्री :** या बाजूनेच जोर असेल तर इथेच बसून राहावे. 'हे घ्या, बसले साहेब, थोडी भजी घेऊन येतो.' असे म्हणावे.

## घाईने हळू चाला!

**प्रश्नकर्ता :** व्यवहार आधी की निश्चय?

**दादाश्री :** व्यवहार आधी पण याचा अर्थ असा नाही की व्यवहाराबद्दल राग (मोह, आसक्ती) ठेवावा.

**प्रश्नकर्ता :** तर मग व्यवहाराबद्दल निरागी व्हायचे का?

**दादाश्री :** राग केलात तर एक गुन्हा आणि निरागी झालात तर दुप्पट गुन्हा, निरागी पण होता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** निरागी म्हणजे?

**दादाश्री :** व्यवहाराबद्दल निस्पृःह होणे. व्यवहाराबद्दल निस्पृःह

म्हणजे, उदा. आईने विचारले, 'तू माझे का ऐकत नाहीस?' तर मुलगा म्हणेल 'आता मी आत्मा झालो आहे! (?)' तर असे चालणार नाही. व्यवहारात विनय, विवेक सर्व काही असणे आवश्यक आहे. आपल्या व्यवहाराबद्दल कोणाची तक्रार असता कामा नये.

कोणत्याही गोष्टीत घाई करणे हा सिंगल गुन्हा आहे आणि घाई न करणे हा डबल गुन्हा आहे.

तुम्हाला कोणत्या खड्ड्यात पडायचे आहे?

**प्रश्नकर्ता :** कोणत्याच नाही.

**दादाश्री :** म्हणून गोष्ट समजून घ्या. घाई केली नाहीस तर काय गाडी तुझी वाट बघत बसेल? आणि घाई केलीस तर कारची टक्कर होईल. म्हणून घाई केली तर त्याला सिंगल गुन्हा म्हटले आहे आणि घाई केली नाही तर त्याला डबल गुन्हा म्हटले आहे.

## मनाचे लंगर

**प्रश्नकर्ता :** मन कशा प्रकारे स्थिर राहू शकते?

**दादाश्री :** मन स्थिर करण्यात काय फायदा आहे याचा तुम्ही हिशोब केला आहे का?

**प्रश्नकर्ता :** त्यामुळे शांती मिळते.

**दादाश्री :** मनाला अस्थिर कोणी केले?

**प्रश्नकर्ता :** आम्हीच केले.

**दादाश्री :** तुम्ही अस्थिर का केले? जाणूनबुजून असे केले का? 'स्वत: चे हित कशात आहे आणि अहित कशात आहे' हे न जाणल्यामुळे मनाचा वाटेल तसा उपयोग केला. जर हित-अहित कळले असते तर मग स्वत:च्या हितासाठीच त्याचा उपयोग केला असता. आता मन 'आउट ऑफ कंट्रोल' झाले आहे (मनावरचा ताबा सुटला आहे). आता जर पुन्हा नव्याने ज्ञान मिळाले, स्वत:चे हित-अहित कळेल असे ज्ञान

मिळाले, की त्यानंतरच मन थाऱ्यावर येईल. म्हणजेच येथे जेव्हा आम्ही ज्ञान देतो तेव्हा मन थाऱ्यावर येते.

मन नेहमीच ज्ञानाने बांधले जाऊ शकते. इतर कोणत्याच उपायाने बांधले जात नाही. एकाग्रता केल्याने मन थोडा वेळ थाऱ्यावर राहते. फार तर तास-अर्धा तास, मग परत ते इकडे-तिकडे सरकते.

**प्रश्नकर्ता :** मन काय आहे?

**दादाश्री :** मन, तो आपला 'स्टॉक' आहे. दुकानदार बारा महिन्यानंतर सगळा स्टॉक काढतात की नाही? काढतात. तसेच संपूर्ण आयुष्याचा स्टॉक म्हणजे मन आहे. मागील जन्माचा स्टॉक तुमच्या या जन्मात उदयाला येतो आणि तुम्हाला पुढील सूचना देतो. आता आत नवीन मन तयार होत आहे. जुने मन सध्या 'डिस्चार्ज' होत चालले आहे आणि नवीन मन तयार होत आहे.

**प्रश्नकर्ता :** मन कसे 'डिस्चार्ज' होते आणि कसे बनते, हे कसे कळेल?

**दादाश्री :** मनात जे विचार येतात, त्यांच्याशी तुम्ही तन्मयाकार होता, ती आत्म्याची शक्ती नाही. आतमध्ये कमकुवतपणा आहे, त्यामुळे तन्मयाकार होत असतो. अज्ञानामुळे तन्मयाकार होत असतो. मूळ आत्मा तसा नाही. तो तर अनंत शक्तीवाला, अनंत ज्ञानवाला आहे. परंतु हा जो तुमचा मानलेला आत्मा आहे, त्यामुळे हा सगळा घोटाळा आहे. म्हणजेच विचारांशी तन्मयाकार झालात की नवीन चार्ज होऊ लागतो.

ज्यांना स्वरूपाचे ज्ञान आहे, ते तर जे विचार येतात त्यांच्याशी तन्मयाकार होत नाहीत. त्यामुळे त्याची वेळ आल्यावर मन डिस्चार्ज होऊन जाईल आणि मग नवीन चार्ज होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** परंतु इथे तर 'ऑटोमॅटिक' (आपोआप) तन्मयाकार होऊन जातो.

**दादाश्री :** हो 'ऑटोमॅटिक'च होऊन जातो, यालाच तर भ्रांति

म्हणतात ना! यात स्वतःचा काहीच पुरुषार्थ नाही. जोपर्यंत स्वतः पुरुष होत नाही तोपर्यंत पुरुषार्थ नसतोच. ही तर प्रकृती तुम्हाला जबरदस्तीने नाचवते.

**प्रश्नकर्ता :** शरीर आणि मन यांच्यात काय संबंध आहे?

**दादाश्री :** शरीराचे सारे नियंत्रण, या पाच इंद्रियांचे नियंत्रण, सर्वांचे नियंत्रण मनाच्या हातात आहे. मनाने डोळ्यांना सांगितले की हे तू पाहाण्यासारखे आहे, की मग डोळे लगेच ते पाहतात आणि जर मनाने पाहू नको सांगितले तर डोळे पाहत असतील तरी पण बंद होतील. म्हणजे शरीरावर संपूर्ण नियंत्रण मनाचे आहे.

**प्रश्नकर्ता :** पुष्कळदा मन आतून सांगते की हे पाहायचे नाही, तरी पण पाहिले जाते ते कशामुळे?

**दादाश्री :** पाहिले जाते हा तर त्याचा मूळ स्वभाव आहे. परंतु पाहायचे नाही असे ठरवले की मग पाहणारच नाही. पाहणे हा तर डोळ्यांचा स्वभाव आहे. इंद्रियांच्या स्वभावाप्रमाणे इंद्रिये तर लालची होतातच, परंतु मनाने जर मनाई केली की मग ती पुन्हा पाहणारच नाहीत. आता, 'मनावर कोणाचे नियंत्रण आहे' ते पाहायचे आहे. तुमच्या मनावर कोणाचे नियंत्रण आहे?

**प्रश्नकर्ता :** बुद्धीचे.

**दादाश्री :** बुद्धी काय करते?

**प्रश्नकर्ता :** बुद्धी सार-असार यातील भेद सांगते.

**दादाश्री :** बुद्धीने ठरवल्याप्रमाणे होते का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** बुद्धीवर कोणाचे नियंत्रण आहे?

**प्रश्नकर्ता :** ते तर माहीत नाही.

**दादाश्री :** अहंकाराचे, नाहीतर कोणाचे ?

मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार, हे अंत:करणाचे चार भाग आहेत. या चौघांचे या शरीरावर नियंत्रण आहे, आणि या चौघांचे नियंत्रण आहे म्हणून भ्रांती आहे. 'स्वत: 'च्या हातात नियंत्रण आले की मग हा त्रास होणार नाही, मग पुरुषार्थ उत्पन्न होईल.

**प्रश्नकर्ता :** नियंत्रण हातात यावे यासाठी काय करावे ?

**दादाश्री :** ते सर्व 'ज्ञानी पुरुष' करतात. जे स्वत: बंधनमुक्त झालेले आहेत तेच आपल्याला मुक्त करू शकतात. जे स्वत:च बांधलेले आहेत ते दुसऱ्यांना कसे काय मुक्त करू शकतील ? आणि या कलियुगात आपले आपण करता येईल एवढी शक्ती माणसात नाही. या कलियुगातील माणसे कशी आहेत ? ती घसरत घसरत आलेली आहेत, घसरलेली माणसे आपलीआपण वरती चढतील हे शक्यच नाही. म्हणूनच 'ज्ञानी पुरुषां'ची मदत घ्यावी लागेल.

## जिथे इंटरेस्ट तिथे एकाग्रता

**प्रश्नकर्ता :** दादा, मला भगवंतांमध्ये एकाग्रता होत नाही.

**दादाश्री :** तुम्ही भाजी घ्यायला किंवा साडी घ्यायला जाता, तेव्हा एकाग्रता राहते की नाही ?

**प्रश्नकर्ता :** हो, राहते. मोह असतो म्हणून राहते.

**दादाश्री :** भगवंतात आणि मोक्षात तुम्हाला 'इंटरेस्ट'च (रूची, गोडी) वाटत नाही. म्हणून एकाग्रता होत नाही.

अरे, रंगाने एक स्त्री खूपच गोरी होती आणि तिचा नवरा एकदम सावळा होता. त्या स्त्रीला एक दिवस मी विचारले 'तुझा नवरा सावळा आहे, तर त्याच्यावर तुझा संपूर्ण भाव आहे का ? तेव्हा ती म्हणाली 'माझे पती मला खूपच प्रिय आहेत.' तर असा सावळा पती तिला प्रिय वाटतो पण भगवंत तुम्हाला प्रिय वाटत नाहीत. हे ही आश्चर्यच आहे ना ?

आणि ह्या विचारतात, माझे मन एकाग्र का होत नाही? मग भाजी आणायला जाता तिथे एकाग्रता कशी राहते? ह्या सर्व तर अनुभवाच्या गोष्टी आहेत. ही काही थाप नाही. भगवंतात 'इंटरेस्ट'च नाही, म्हणूनच एकाग्रता होत नाही. जर भगवंताबद्दल आसक्ती निर्माण झाली तर भगवंतावर एकाग्रता होईल.

जोपर्यंत पैशात 'इंटरेस्ट' आहे तोपर्यंत पैसे-पैसे करत राहणार आणि एकदा भगवंतात 'इंटरेस्ट' निर्माण झाला की मग पैशांचा 'इंटरेस्ट' संपेल. म्हणजेच तुमचा 'इंटरेस्ट' बदलायला हवा.

आता भगवंतात इंटरेस्ट नाही, हा तुमचा दोष नाही. जी गोष्ट पाहिलेलीच नाही, त्याबद्दल इंटरेस्ट कसा उत्पन्न होईल? साडी तर तुम्ही पाहता, तिचे रंगरूप तुम्हाला दिसते म्हणून साडीत इंटरेस्ट वाटतोच. पण परमात्मा तर दिसतच नाही ना? तेव्हा असे म्हटले आहे की भगवंतांचे प्रतिनिधी असे जे ज्ञानी पुरुष आहेत, त्यांच्यात तुम्ही इंटरेस्ट बसवा, तर तिथे बसेल आणि त्यांच्यावर इंटरेस्ट निर्माण झाला तर तो भगवंतापर्यंत पोहोचला असे समजा.

जिथे कषाय आहेत, तिथे 'इंटरेस्ट' असेल तर तो 'इंटरेस्ट' कषायिक असतो. ती कषायिक प्रतीती असते ती मग थोड्या वेळाने संपते, म्हणजे रागाने बसते आणि नंतर द्वेषाने सुटते आणि भगवंतांच्या प्रतिनिधीबद्दल तर रागाने 'इंटरेस्ट' निर्माण होत नाही. कारण त्यांच्याकडे राग करण्यासारखे काही नसतेच ना!



[ 12 ]

## प्राकृत गुण नष्ट होतील!

आपल्यावर ज्याची सावली पडते, त्याचा रोग (आपल्यात) निश्चितच घुसतो. हा हापूसचा आंबा बाहेरून कितीही सुंदर दिसत असला तरी त्याचे आपल्याला काय करायचे आहे? त्याच्यात खूप गुण असले तरी आपल्याला काय? कोणी म्हणेल की साहेब, याच्यात इतके सर्व गुण आहेत, गुणधामच आहे ना?

तेव्हा वीतरागी यावर काय म्हणतात?

हा फर्स्टक्लास (उत्तम) गुणधाम तर आहे पण ते गुण कोणाच्या आधीन आहेत? ते गुण त्याच्या स्वत:च्या आधीन नाहीत. पित्त, वायु आणि कफ यांच्या आधीन आहेत. हे तिन्ही गुण जर वाढले तर त्याला सन्निपात होईल आणि तुम्हाला शिव्या देऊ लागेल! आयुष्यात कधी कोणाला एकही शिवी किंवा अपशब्द न बोलणारा माणूस देखील सन्निपात झाल्यावर काय करतो? म्हणूनच भगवंत म्हणाले की एकच गुंठाण्यात (48 मिनिटात) हे सर्व पौद्‌गलिक गुण फ्रॅक्चर होऊ शकतात, इतके विनाशी आहेत. तू कमाई करून करून किती दिवस कमावशील? आणि त्रिदोष झाले की सगळे एकदमच संपून जातील!

जेव्हा माणसाला दु:ख सहन होत नाही तेव्हा मेंदूत क्रॅक (भेग) पडते. त्याला सन्निपात म्हणत नाहीत, तर क्रॅक म्हणतात. आपल्याला असे वाटते की हा माणूस असे का बोलत आहे? त्याचे कारण या इंजिनात क्रॅक पडली आहे, म्हणून दादांकडून वेल्डिंग करून (क्रॅक

जोडून) घ्या. नव्या इंजिनात सुद्धा क्रॅक पडू शकते! दु:ख सहन झाले नाही, आणि सच्चा पुरुष असेल तर तो क्रॅक होतो, अन्यथा उद्धट होतो. उद्धटपेक्षा तर क्रॅक माणूस चांगला म्हणायचा. क्रॅकचे आम्ही वेल्डिंग करून दिले की इंजिन चालू होते. ही सर्व अगदी नवीन इंजिने, लॅन्कॅशायरमधून आणलेली, पण हेड क्रॅक झाली आहेत, मग ती कशी चालू शकतील? या माणसांच्या मेंदूत पण क्रॅक पडते. ते तृतीयमच बोलतात. आपण विचारतो एक आणि ते उत्तर देतात भलतेच.

म्हणून या गुणांना काहीच अर्थ नाही. बासमतीचा छान भात असेल पण दुसऱ्या दिवशी त्याची काय अवस्था होते? सडतोच! पौद्‌गलिक गुण देखील सडतील. शेठ खूप दयाळू दिसतात परंतु एखाद्या दिवशी नोकरावर चिडले की निर्दयता निघते. ती आपल्याला पाहवत नाही. म्हणून हे सर्व समजून घेतले पाहिजे.

## ज्ञानींची विराधना म्हणजेच...

**प्रश्नकर्ता :** पूर्वजन्मात जर ज्ञानींची विराधना केली असेल तर त्याचा परिणाम काय होतो? अशी सगळी लक्षणे माझ्यात आहेत तर त्यासाठी क्षमा होऊ शकते की ते भोगावेच लागेल?

**दादाश्री :** ज्ञानी स्वत:च त्याचा सर्व उपचार करतात. ज्ञानी तर करुणामय असतात. म्हणून त्यांच्या सत्तेत असेल तेवढे औषध तर ते सर्वांना पाजतातच. पण जे त्यांच्या सत्तेबाहेर असेल ते तर भोगावेच लागते. कारण विसर्जन निसर्गाच्या हातात आहे.

**प्रश्नकर्ता :** विराधनेसाठी पश्चात्ताप होत राहतो.

**दादाश्री :** त्याचा पश्चात्ताप होतो, दु:खाचे वेदन होते, भोगावे लागते, असमाधी वाटते, म्हणजे त्याचा अंतच होत नाही. ती सोडतच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** म्हणजे दादा, त्याचा अंत होणारच नाही का?

**दादाश्री :** अंत होणार नाही याचा अर्थ असा की ती दोन-चार दिवसात संपणारी गोष्ट नाही. एखाद्या माणसाची टाकी ह्या खोली एवढी

असते आणि एखाद्याची पूर्ण 'बिल्डिंगएवढी' असते. मग त्यात फरक असणारच ना?

**प्रश्नकर्ता :** पण दादा, ती रिकामी तर होईलच ना?

**दादाश्री :** हो, रिकामी होईल. रिकामी होईल असे मानून आपण चालावे. पण तशी चूक मात्र परत होता कामा नये. नाहीतर तो पाइप बंद होईल. परत तशी चूक होणार असेल तर तीन दिवस उपास करावेत, पण विराधना होऊ देऊ नये!

## ज्ञानींच्या राजीपाची चावी

**प्रश्नकर्ता :** दादा भगवान, आपली खरी ओळख करण्यासाठी आम्ही काय करायला हवे? आणि आपला *राजीपा* (गुरुजनांची कृपा आणि प्रसन्नता) मिळण्यासाठी आम्हाला कोणती पात्रता मिळवायला हवी?

**दादाश्री :** *राजीपा* मिळविण्यासाठी तर 'परम विनया'चीच आवश्यकता आहे. दुसऱ्या कोणत्याही गोष्टीची आवश्यकता नाही. 'परम विनया'मुळेच *राजीपा* मिळतो. पाय चेपून *राजीपा* मिळतो असे नाही. मला गाड्यातून फिरवलेत, तरी *राजीपा* मिळणार नाही. 'परम विनया'नेच मिळेल.

**प्रश्नकर्ता :** 'परम विनय' म्हणजे काय ते जरा समजावून सांगा.

**दादाश्री :** त्यात विशेष 'सिन्सियारिटी' आणि 'मोरॉलिटी' (प्रामाणिकपणा आणि नैतिकता) असते. ज्यांना आमच्याबरोबर एकता वाटते, वेगळेपणा वाटत नाही, 'मी आणि दादा' एकच आहोत असेच वाटत राहते, तिथे सर्व शक्ती उत्पन्न होतात. 'परम विनय'चा अर्थ तर खूप मोठा आहे. आपल्या इथे सत्संगात इतके लोक येतात पण 'परम विनय' असल्यामुळे इथे विना नियमच सर्व चालते. 'परम विनय' आहे, म्हणूनच नियमांची गरज पडली नाही.

जे आमच्या आज्ञेत विशेषपणे राहतात, त्यांना चांगला अनुभव येतो. त्यांना आमचा *राजीपा* प्राप्त होतो. तुम्ही असा परिणाम दाखवा की ज्यामुळे तुम्हाला माझ्या शेजारी बसवण्याची मला इच्छा होईल.



# [ 13 ]

## घर्षणामुळे घडण

आपण ब्रह्मांडाचे मालक आहोत (आत्मस्वरूपाच्या दृष्टीने). म्हणून कोणत्याही जीवात हस्तक्षेप करू नये. शक्य असेल तर मदत करा आणि शक्य नसेल तरी हरकत नाही, पण कोणाच्यात हस्तक्षेप होताच कामा नये.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ पर-आत्म्याला परमात्मा मानावे?

**दादाश्री :** नाही, मानायचे नाही. तो परमात्माच आहे. मानणे म्हणजे थाप झाली. थाप लक्षात राहील न राहील, हा तर खरोखरच परमात्मा आहे. परंतु हे परमात्मा विभूती स्वरूपात आले आहेत. दुसरे काहीच नाही. मग जरी कोणी भीक मागत असेल तरी पण विभूती आहे आणि राजा असेल तोही विभूती आहे. आपल्याकडे राजे असतात त्यांना विभूती स्वरूप म्हणतात. भिकाऱ्याला म्हणत नाहीत. मूळ स्वरूप आहे त्यातून विशेषता उत्पन्न झाली आहे. विशेष रूप झाले आहे म्हणून त्यांना विभूती म्हणतात. आणि विभूतींना भगवंतच मानले जाणार ना? म्हणून कोणातच हस्तक्षेप करू नये. समोरच्याने (आपल्यात) हस्तक्षेप केला तर आपण ते सहन करावे, कारण भगवंतांनी हस्तक्षेप केला तर आपण ते सहन करायलाच हवे.

आपण वास्तवात 'व्यवहार स्वरूप' नाही. 'ह्या' सर्व फक्त 'टेम्परी ॲडजस्टमेंटस्' आहेत. ज्याप्रकारे मुले खेळण्यांशी खेळतात,

त्याप्रमाणे सर्व जग खेळण्यांशी खेळत आहे. स्वत:च्या हिताचे काही करतच नाही. निरंतर परवशतेच्या दु:खातच असते आणि संघर्ष होतच राहतात. संघर्षण आणि घर्षण यामुळे आत्म्याच्या अनंत शक्ती 'फ्रॅक्चर' होऊन जातात.

नोकराच्या हातून कप-बशा फुटल्या तर आतमध्ये खूप संघर्षण होते. त्याचे काय कारण? तर भानच नाही, अशी जागृतीच नाही की माझे काय आणि परके काय? परक्याचे, मी चालवतो की दुसरा कोणी?

तुम्हाला असे वाटते की 'मी चालवतो', पण खरे तर तुम्ही काहीच चालवत नाही. तुम्ही फक्त असे मानून बसला आहात. तुम्हाला काय चालवायचे आहे ते तर तुम्हाला माहीत नाही. 'पुरुष' झाल्यावर पुरुषार्थ होऊ शकतो. तुम्ही 'पुरुष' झालाच नाहीत तर पुरुषार्थ कसा होऊ शकेल?

व्यवहार शुद्ध होण्यासाठी काय हवे असते? 'कॉमनसेन्स कम्प्लीट' हवी (पूर्ण व्यवहारिक समज हवी). स्थैर्य हवे, गांभीर्य हवे. व्यवहारात 'कॉमनसेन्स'ची गरज असते. 'कॉमनसेन्स' म्हणजे 'एव्हरिव्हेअर ॲप्लिकेबल' स्वरूपज्ञानासोबत 'कॉमनसेन्स' असेल तर खूप शोभेल.

**प्रश्नकर्ता :** 'कॉमनसेन्स' कशा प्रकारे प्रकट होतो?

**दादाश्री :** कोणी आपल्याशी संघर्ष (वाद-भांडण) करील पण आपण कोणाशी संघर्ष करणार नाही, असे जर वागलो तर 'कॉमनसेन्स' उत्पन्न होतो. आपण कोणाशी संघर्ष करता कामा नये, नाहीतर 'कॉमनसेन्स' निघून जाईल. आपल्याकडून घर्षण होता कामा नये.

समोरच्याच्या घर्षणामुळे 'कॉमनसेन्स' उत्पन्न होतो. आत्म्याची शक्ती अशी आहे की घर्षणाच्या वेळी कसे वागावे याचे सर्व उपाय दाखवते आणि एकदा हे उपाय कळले की मग ते ज्ञान जात नाही. असे करत करत 'कॉमनसेन्स' गोळा होत जातो.

आपले विज्ञान मिळाल्यावर माणूस या प्रकारे राहू शकतो. किंवा

सामान्य जनतेतही कोणी अशा प्रकारे राहू शकतो. असे पुण्यशाली लोक असतात. पण ते फक्त काही बाबतीतच असे राहू शकतात, सर्वच बाबतीत नाही!

सर्व आत्मशक्ती कशामुळे नष्ट होतात? तर घर्षणामुळे. संघर्षात थोडे जरी अडकले तरी खलास! समोरच्याने संघर्ष केला तरी आपण संयमपूर्वक राहायला हवे! संघर्ष तर होताच कामा नये. अगदी हा देह जायचा असेल तर जावो पण संघर्ष तर होताच कामा नये.

देह तर कोणाच्या म्हणण्याने जात नाही. ते तर 'व्यवस्थित'च्या ताब्यात आहे!

या जगात वैरभावामुळे संघर्ष होतो. संसाराचे मूळ 'बीज' वैर हे आहे. ज्याचे वैर आणि घर्षण बंद झाले त्याचा मोक्ष झालाच! प्रेम बाधक नाही, वैर संपले की प्रेम उत्पन्न होते.

माझे कोणाशी भांडण होत नाही. मला जबरदस्त 'कॉमनसेन्स' आहे म्हणून तुम्हाला काय म्हणायचे आहे हे मला ताबडतोब समजते. लोकांना असे वाटते की हे दादांचे अहित करत आहेत, परंतु मला लगेच समजते की हे अहित, अहित नाही. हे सांसारिक अहितही नाही आणि धार्मिक अहितही नाही, आणि आत्म्यासंबंधी तर अहित नाहीच. लोकांना असे वाटते की हे आत्म्याचे अहित करत आहेत पण आम्हाला त्यात हित वाटते. एवढा या 'कॉमनसेन्स'चा प्रभाव आहे. म्हणून आम्ही 'कॉमनसेन्स'चा अर्थच असा लिहिला आहे की 'एव्हरिव्हेअर ॲप्लिकेबल.'

आजकालच्या जनरेशनमध्ये (पिढीकडे) 'कॉमनसेन्स' अशी गोष्टच नाही. जनरेशन टु जनरेशन (पिढी दर पिढी) 'कॉमनसेन्स' कमी होत चालला आहे.

संपूर्ण जग घर्षण आणि संघर्ष यातच गुंतलेले आहे. दिवाळीच्या दिवशी सगळे जण ठरवतात की आज घर्षण करायचे नाही. म्हणून त्या दिवशी चांगले चांगले खायला मिळते, चांगले कपडे घालायला मिळतात,

सगळे चांगले चांगले मिळते. जिकडे जाल तिकडे सर्व 'या, या' म्हणतात, असे प्रेम मिळते. संघर्ष नसेल तर प्रेम असते. खरे खोटे पाहण्याची गरजच नाही. व्यवहारिक बुद्धी व्यवहारात तर उपयोगी पडतेच, आणि ती तर तशी आपोआप ॲडजस्ट झालेलीच आहे. पण दुसरी विशेष बुद्धी आहे, तीच नेहमी संघर्ष करवीत असते.

**प्रश्नकर्ता :** सगळ्या घर्षणांचे कारण हेच आहे ना की एका 'लेअर'चे (थराचे) दुसऱ्या 'लेअर'पासून अंतर खूप आहे?

**दादाश्री :** घर्षण ही तर प्रगती आहे! जेवढी डोकेफोड होते, जेवढी घर्षणे होतात, तेवढाच पुढे जाण्याचा मार्ग मिळतो. घर्षण झालेच नाही तर जिथे आहात, तिथेच राहाल. लोक घर्षण शोधत असतात.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे घर्षण प्रगतीसाठी आहे, असे समजून शोधले तर प्रगती होईल?

**दादाश्री :** पण तसे समजून लोक शोधत नाहीत. परमेश्वर काही उंचीवर नेत नसतो, घर्षणच उंचीवर घेऊन जाते. घर्षण ठराविक मर्यादेपर्यंतच उंचीवर घेऊन जाऊ शकते, नंतर मात्र ज्ञानी भेटले तरच काम होईल. घर्षण तर नैसर्गिक रित्या घडून येते. नदीत दगड इथून तिथून घासून गोल गुळगुळीत होतात, त्याप्रमाणे.

**प्रश्नकर्ता :** घर्षण आणि संघर्षण यात फरक काय?

**दादाश्री :** ज्यांच्यात जीव नसतो. अशा गोष्टींशी घर्षण झाले तर त्याला घर्षण म्हणतात आणि जिंवत जीवांशी आदळ-आपट (वाद-भांडण) झाली तर ते संघर्षण.

**प्रश्नकर्ता :** संघर्षणामुळे आत्मशक्ती अवरुद्ध होते ना?

**दादाश्री :** हो, खरी गोष्ट आहे. संघर्ष झाला तर हरकत नाही पण 'मला संघर्ष करायचा आहे' हा भाव काढून टाकावा, असे मी सांगतो. संघर्ष करायचा 'आपला' भाव असता कामा नये. मग 'चंदुलाल'ने संघर्ष केला तरी हरकत नाही. भाव अवरुद्ध होता कामा नये!

शरीराची आदळ-आपट झाली आणि इजा झाली तर औषधाने ती बरी होते. परंतु घर्षण आणि संघर्षणामुळे मनावर जे डाग पडले असतील, बुद्धीवर जे डाग पडले असतील ते कोण काढील? हजारो जन्म ते जाणार नाहीत.

**प्रश्नकर्ता :** अधिक प्रमाणात घर्षण आले तर जडता येते ना?

**दादाश्री :** जडता तर येते पण शक्ती देखील संपून जाते. त्यामुळेच अनंत शक्ती दिसत नाही. शक्ती अनंत आहे, पण घर्षणामुळे सर्व संपली आहे. महावीर भगवंतांना एकही घर्षण झाले नव्हते. अगदी जन्मापासून शेवटपर्यंत! आणि आपली पन्नास हजार, एक लाख व्हायला हवीत, त्याऐवजी कोटीने होतात, त्याचे काय? अरे, एका दिवसात वीस-पंचवीस वेळा तर होतातच. जरा डोळा वर केला की घर्षण, दुसऱ्यांबद्दल वाईट भाव मनात आला, हे सर्व घर्षण! या भिंतीबरोबर घर्षण झाले तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** डोके फुटेल.

**दादाश्री :** ती तर जड आहे! आणि जर चेतनावाल्यांबरोबर घर्षण झाले तर काय होईल? फक्त घर्षण झाले नाही तर माणूस मोक्षात जाईल. मला घर्षणात अडकायचेच नाही, असे जर कोणी शिकला तर मग त्याला गुरुची किंवा कोणाचीच गरज नाही. तो एक दोन जन्मातच सरळ मोक्षाला जाईल. 'घर्षण करायचेच नाही' अशी त्याची श्रद्धा बसली आणि त्याने तसा ठाम निश्चय केला की तेव्हापासूनच त्याला समकित झाले. म्हणून जर एखाद्याला समकित प्राप्त करायचे असेल तर आम्ही गॅरंटी देतो की जा, घर्षण करायचेच नाही असा निश्चय करा, तेव्हापासूनच तुम्हाला समकित होईल!

**प्रश्नकर्ता :** घर्षण आणि संघर्षणाने मन आणि बुद्धीवर घाव पडतात का?

**दादाश्री :** अरे! फक्त मनावर, आणि बुद्धीवरच नाही तर पूर्ण अंत:करणावरच घाव पडत राहतात आणि त्याचा परिणाम संपूर्ण शरीरावर देखील होतो. म्हणजेच घर्षणामुळे खूप खूप त्रास आहे.

**प्रश्नकर्ता :** घर्षण होत नसेल, तर त्याला खरा अहिंसक भाव निर्माण झाला असे म्हणायचे का?

**दादाश्री :** नाही, असे नाही. पण या दादांकडून हे समजले की भिंतीशी घर्षण केल्याने एवढा फायदा (!) तर भगवंतांशी घर्षण करण्यात किती फायदा? एवढे कळले तरी परिवर्तन होईल.

अहिंसा ही पूर्णपणे समजेल अशी नाही. पूर्णपणे समजणे खूप खूप कठीण आहे. त्याऐवजी 'मला कधीही घर्षणात अडकायचे नाही' असे ठाम ठरवले की मग शक्ती अनामत राहतील, आणि दिवसेंदिवस वाढतच जातील. त्यामुळे मग घर्षणामुळे होणारे नुकसान होणार नाही!

तरीही जर कधी घर्षण झालेच तर त्यानंतर आपण लगेच प्रतिक्रमण केले तर तो दोष मिटेल. म्हणून हे समजायला हवे की ह्या बाबतीत घर्षण होत आहे, तर तेव्हा तिथे प्रतिक्रमण केले पाहिजे. नाहीतर खूप जोखीम आहे. या ज्ञानामुळे मोक्षाला तर जाल, पण घर्षणामुळे मोक्षाला जाताना खूप अडचणी येतील आणि वेळही लागेल.

या भिंतीसाठी वाईट विचार आले तर हरकत नाही, कारण हे एकतर्फी नुकसान आहे. याउलट जिवंत लोकांबद्दल एक जरी वाईट विचार आला तर मात्र जोखीम आहे. दोन्ही पक्षांचे नुकसान होते. परंतु त्यानंतर जर आपण प्रतिक्रमण केले तर सर्व दोष निघून जातील. म्हणून जिथे जिथे घर्षण होत असेल तिथे तिथे प्रतिक्रमण केल्याने घर्षण संपेल.

**प्रश्नकर्ता :** घर्षण कोण करविते? जड की चेतन?

**दादाश्री :** पूर्वीचे घर्षणच पुन्हा घर्षण करवितात. यात जड किंवा चेतन हा प्रश्नच नाही. आत्मा यात हात घालतच नाही. हे सर्व घर्षण पुद्‌गलच करवीत असते पण जी पूर्वीची घर्षणे आहेत तीच पुन्हा पुन्हा घर्षणे करवितात. ज्यांची पूर्वीची घर्षणे संपलेली आहेत त्यांना पुन्हा घर्षणे होत नाहीत. नाही तर घर्षणावर घर्षण आणि त्यावर पुन्हा घर्षण, असे वाढतच राहते.

पुद्‌गल म्हणजे काय? तर ते पूर्णपणे जड नाही, ते मिश्रचेतन आहे. त्याला विभाविक पुद्‌गल म्हणतात. विभाविक म्हणजे विशेषभावाने परिणमित झालेले पुद्‌गल, तेच सर्व करविते! जे शुद्ध पुद्‌गल आहे ते असे काही करवीत नाही. हे पुद्‌गल तर मिश्रचेतन झाले आहे. आत्म्याचा विशेष भाव आणि जडाचा विशेष भाव दोन्ही एकत्र होऊन तिसरे रूप तयार झालेले आहे, प्रकृती स्वरूप झाले आहे. तेच घर्षण करवीत असते.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हणता, की घर्षणाने साऱ्या शक्ती संपतात. मग जागृतीने त्या शक्ती परत ओढून आणता येतील का?

**दादाश्री :** शक्तींना ओढण्याची गरज नाही. शक्ती तर आहेतच. त्या आता उत्पन्न होत आहेत. पूर्वी (मागील जन्मात) जी घर्षणे झाली होती, त्यामुळे नुकसान झाले होते, तेच आता परत येत आहे. परंतु जर आता परत नवीन घर्षण निर्माण केले तर मात्र निघून जातील, आलेल्या शक्ती पण निघून जातील. आणि जर स्वतः घर्षण होऊच दिले नाही, तर शक्ती उत्पन्न होत राहील!



## [ 14 ]

## प्रतिकूल परिस्थितीबद्दल प्रेम

**प्रश्नकर्ता :** प्रत्येकाला अनुकूल संयोगच हवे असतात, असे का?

**दादाश्री :** ज्याच्यात सुख वाटते, शाता (सुख परिणाम) वाटते ते अनुकूल. अशाता (दु:ख परिणाम) वाटते ते प्रतिकूल. आत्म्याचा स्वभाव आनंदमय आहे, म्हणून त्याला प्रतिकूलता नकोच असते ना! म्हणूनच अगदी लहानाहून लहान जीव असला तरी त्याला अनुकूल वाटले नाही तर तो तिथून बाजूला होतो.

म्हणजे ही शेवटची गोष्ट समजून घ्या की अनुकूल आणि प्रतिकूलला समान करून टाका. कारण यात काहीच तथ्य नाही. या रुपयाच्या नाण्यावर एका बाजूला राणीचे चित्र असते आणि दुसऱ्या बाजूला काहीतरी लिहिलेले असते, त्यासारखे हे आहे. अर्थात यात काहीच नाही. अनुकूल आणि प्रतिकूल या सर्व फक्त कल्पनाच आहेत.

तुम्ही आता शुद्धात्मा झालात, आता काही अनुकूल पण नाही आणि काही प्रतिकूल पण नाही. जोपर्यंत आरोपित भाव आहे तोपर्यंत संसार आहे आणि तोपर्यंतच अनुकूल आणि प्रतिकूल अशी भानगड आहे. आता तर जगाला जे प्रतिकूल वाटते ते आपल्याला अनुकूल वाटते. प्रतिकूलता येते तेव्हाच तर आपल्याला कळते की पारा चढला आहे की उतरला आहे.

आपण घरी आलो आणि आल्यानंतर लगेच एखादी उपाधी उत्पन्न झाली की आपल्याला समजते की अजूनही आपल्याला खाली-वर असे परिणाम होत आहेत. किंवा आत थंडावा वाटत आहे, असे पण समजते. पण त्यासाठी थर्मामीटर पाहिजे ना? आणि तसा थर्मामीटर बाजारात विकत मिळत नाही. आपल्या घरीच एखादा असेल तर बरे! सध्या कलियुग आहे, दूषमकाळ आहे, त्यामुळे घरात फक्त एकच नाही तर दोन-चार 'थर्मामीटर' तर असतातच ना! नाहीतर आपल्याला कोण मापणार? कोणाला भाड्याने ठेवले तरी पण तो करणार नाही! भाड्याने ठेवलेला माणूस आपला अपमान करील, पण त्याचे तोंड फुगलेले नसेल. म्हणून आपल्याला कळते की हे सर्व नकली आहे! आणि हा तर एकदम एक्झॅक्ट - अस्सल! तोंड फुगलेले, डोळे लाल, म्हणजे पैसे देऊन सुद्धा हे शक्य होत नाही, आणि आपल्याला तर हे सर्व मोफत मिळते!

हा संसार डोळ्यांनी पाहताना सुंदर वाटेल असाच आहे. मग तो कसा सुटेल? फटका बसला, त्रास झाला तरी पण नंतर विसरून जातो. लोक म्हणतात ना की वैराग्य टिकत नाही, पण ते टिकेल कसे?

वास्तवात संयोग आणि शुद्धात्मा याखेरीज दुसरे काही नाहीच. संयोग दोन प्रकारचे असतात, प्रतिकूल आणि अनुकूल. त्यात अनुकूल संयोगात काहीच त्रास होत नाही, प्रतिकूलमध्येच त्रास होतो. तेवढ्या संयोगांनाच आपण जपायचे आहे. शिवाय संयोग हे वियोगी स्वभावाचेच असतात. म्हणून त्यांची वेळ झाली की ते निघूनच जातात. आपण त्यांना बसा, बसा म्हटले तरी ते थांबत नाहीत.

वाईट संयोग जास्त काळ टिकत नाहीत. तरी पण लोक दुःखी का आहेत? कारण वाईट संयोगांना आठवून आठवून ते दुःखी होत असतात. आता तर तो (संयोग) गेला, आता त्याच्यासाठी कशाला आकांत करत बसला आहेस? भाजल्यावर रडतो ते ठीक आहे, ती वेगळी गोष्ट आहे. पण आता तर सर्व ठीक होत आले आहे तरी पण तो आरडाओरडा करत राहतो, बघा 'मी भाजलो, मी भाजलो!'

तुमचे पण आता फक्त संयोगच बाकी राहिले आहेत. गोड संयोगांचा तुम्हाला उपयोग करून घेता येत नाही. गोड संयोगांचे तुम्ही वेदन करता, त्यामुळे कडू संयोगांचे पण वेदन करावे लागते. जर गोड संयोगांना 'जाणलेत', तर मग कडू संयोगात पण 'जाणणे' जमेल! पण अजूनही तुमच्या पूर्वीच्या सवयी जात नाहीत, म्हणून तुम्ही त्याचे वेदन करू लागता. आत्मा वेदन करतच नाही, आत्मा फक्त जाणतच राहतो. जो वेदन करतो, तो भ्रांत आत्मा आहे, प्रतिष्ठित आत्मा आहे. त्यालाही आपण जाणायचे की 'अहाहा! हा प्रतिष्ठित आत्मा जिलेबीत तन्मयाकार झाला आहे.'

महावीर भगवंतांनी त्यांच्या शिष्यांना शिकविले होते की तुम्ही बाहेर जाता आणि जर कोणी तुम्हाला काठीने मारले तर तुम्ही असे समजले पाहिजे की फक्त काठीच मारली आहे ना? हात तर तोडला नाही ना? तेवढी तरी बचत झाली! म्हणजे यालाच लाभ समजा! कोणी एक हात कापला तर समजा दुसरा हात तर नाही ना कापला? दोन्ही हात कापले तर म्हणा, पाय तर आहेत ना? दोन्ही हात आणि दोन्ही पाय कापले तर म्हणा, मी जिवंत तर आहे ना? डोळ्यांनी दिसत तर आहे ना? लाभ-अलाभ भगवंतांनी दाखविला, तू रडू नकोस. हस, आनंद कर. ह्यात काही चुकीचे म्हटले नाही ना?

भगवंतानी सम्यक् दृष्टीने पाहिले होते, त्यामुळे तोट्यात देखील फायदा दिसतो.

## सुटण्याची चावी कोणती?

या जगाचा नियम काय आहे? तर शक्तीवान अशक्तला मारतो. निसर्ग कोणाला शक्तीवान बनवतो? तर ज्याने कमी पापे केली आहेत त्याला, आणि ज्याने जास्त पापे केली आहेत त्याला अशक्त बनवतो.

जर तुम्हाला सुटका करून घ्यायची असेल तर एकदा मार खाऊन घ्या (त्रास सोसा). मी आयुष्यभर असेच केले आहे. त्यानंतर मी निष्कर्ष काढले की आता माझ्यासाठी कोणताही मार शिल्लक नाही, आता

भीतीही राहिली नाही. सर्व जग काय आहे याचे सार मी काढले आहे. मला स्वतःला तर सार मिळाले आहे, पण आता लोकांनाही मी सार काढून देतो.

म्हणजेच केव्हा ना केव्हा तरी या मार्गावर यावे लागेलच ना? नियम कोणालाच सोडत नाहीत. थोडासा गुन्हा केला तर चार पायवाले होऊन भोगावे लागेल. चार पायात सुख वाटेल का?

गुन्हे करणे बंद करा. अहिंसेमुळे तुम्हाला कोणत्याही प्रकारचा त्रास होण्याची भीती राहणार नाही. कोणी मारील, कोणी चावेल एवढीही भीती बाळगू नका. ही संपूर्ण खोली जरी सापांनी भरलेली असेल तरी जर अहिंसक पुरुषाने त्या खोलीत प्रवेश केला तर साप एकमेकांवर चढतील, पण त्याला स्पर्शही करणार नाहीत!

म्हणून सावध होऊन चाला. हे जग अगदी वेगळ्याच प्रकारचे आहे! पूर्णपणे न्यायस्वरूप आहे. जगाचे सार काढून अनुभवाच्या स्टेजवर (स्थितीत) आलो, तरच काम होईल ना? 'याचा परिणाम काय होईल?' याचा शोध तर घ्यावाच लागेल ना?

**प्रश्नकर्ता :** मार खाल्ल्यानंतर 'रिसर्च' (शोध) करतोच ना?

**दादाश्री :** हो, खरा 'रिसर्च' मार खाल्ल्यानंतरच करता येते. मारल्यानंतर 'रिसर्च' होऊ शकत नाही.

## जग निर्दोष - निश्चयाने आणि व्यवहाराने

**दादाश्री :** लोकांना स्वतःचे दोष दिसत नाहीत ना?

**प्रश्नकर्ता :** हो, दिसत नाहीत.

**दादाश्री :** का? त्याचे कारण काय असेल? लोक तर फार बुद्धीमान आहेत ना?

**प्रश्नकर्ता :** दुसऱ्यांचे सर्वच दोष दिसतात.

**दादाश्री :** ते पण खरे दोष दिसत नाहीत. स्वतःच्या बुद्धीने

तोलून–मापून समोरच्याचे दोष काढतात. आम्हाला तर या जगात कोणाचेच दोष दिसत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** दादा, संपूर्ण जग निर्दोष आहे. हे 'रियल' भावाने बरोबर आहे, पण 'रिलेटिव्ह' भावाने तर त्या वस्तूत दोष असतीलच ना?

**दादाश्री :** हो, पण आपल्याला आता 'रिलेटिव्ह'मध्ये राहायचेच नाही ना? आपल्याला तर 'रियल' भावातच राहायचे आहे. 'रिलेटिव्ह' भाव म्हणजे संसारभाव. तुम्हाला 'रिलेटिव्ह'मध्ये राहणे चांगले वाटते की 'रियल'मध्ये?

**प्रश्नकर्ता :** 'रियल'मध्येच चांगले वाटते, दादा! पण दोन्हीतही राहावेच लागते ना? निश्चयाने आम्हाला समजते की सगळे निर्दोषच आहेत, पण व्यवहारात कित्येक वेळा दुसऱ्या बाजूलाही पाहावे लागते ना?

**दादाश्री :** नाही, व्यवहार असे सांगत नाही की समोरच्याचे दोष पाहा. व्यवहारात तर 'मी' पण राहतोच ना? तरीही मला जग निर्दोष दिसते.

जगात कोणी दोषी नाहीच. दोषी दिसतात ती आपलीच चूक आहे. तरी पण ही सर्व कोर्टे, वकील, सरकार, हे सर्व दोषी असेच म्हणतात ना?

**प्रश्नकर्ता :** आम्ही काय मानायला हवे? व्यवहाराने तर दोषी आहेतच ना?

**दादाश्री :** व्यवहाराने कोणीही दोषी नाही.

शुद्ध व्यवहाराने कोणीही दोषी नाही. निश्चयाने तर सर्व शुद्धात्मा झाले आहेत, म्हणून त्यांच्यात दोष असूच शकत नाही ना?

आणि जर दोषी असते तर महावीरांना कोणीतरी दोषी दिसले

असते, पण भगवंतांना कोणीच दोषी दिसला नाही. एवढे मोठे मोठे ढेकूण चावत होते, पण तरी ते त्यांना दोषी दिसले नाहीत.

## दोषदर्शन, उपयोगाने

**प्रश्नकर्ता :** आठवण करून मागील दोष दिसू शकतात का?

**दादाश्री :** मागील दोष, खरे तर उपयोगानेच दिसतात. आठवण करून दिसत नाहीत. आठवण करण्यासाठी तर डोके खाजवावे लागते. आवरणे येतात, म्हणून आठवण करावी लागते ना? या नगीनभाईबरोबर कटकट झाली असेल तर, नगीनभाईचे प्रतिक्रमण केले की नगीनभाई हजर होतीलच. फक्त तसा उपयोग ठेवायचा आहे. आपल्या मार्गात आठवण करणे असे काही नसतेच. आठवण करणे हे 'मेमरी'(स्मृती)च्या आधीन आहे.

**प्रश्नकर्ता :** 'मेमरी' म्हणजेच बुद्धीच्या आधीन आहे असे म्हणायचे का?

**दादाश्री :** 'मेमरी' म्हणजे जर आवरण जाड असेल तर एक तासभर आठवत नाही, जणू काही एखादा मोठा ढग समोर आला आहे, आणि कधी कधी पाच मिनिटातच दिसते, कधी दोन मिनिटातही दिसते. आठवणीचा असा अनुभव तुम्हाला आला आहे की नाही!

**प्रश्नकर्ता :** हो, आला आहे.

**दादाश्री :** कधी कधी तर कितीतरी तासानंतरही आठवत नाही. आणि नियम असा आहे की एकाग्रतेमुळे आवरणे तुटतात. जे आवरण अर्ध्या तासाचे असेल ते एकाग्रतेमुळे फक्त पाच मिनिटातच संपते.



# [ 15 ]

## उपयोगसहित असेल तरच 'जागृती' उपयोगरहित ते 'मेकॅनिकल'

**प्रश्नकर्ता :** 'मेकॅनिकल' आणि 'जागृतीपूर्वक' या दोघांतील फरक स्पष्ट करून सांगा.

**दादाश्री :** सर्व जग झोपेत चालत आहे. याला 'मेकॅनिकल' (भौतिकमध्ये गुंतलेले) म्हणतात. भावनिद्रा असे म्हणतात. ह्या सर्व भावनिद्रावाल्यांना 'मेकॅनिकल' म्हटले जाईल. प्रत्येक व्यक्ती स्वत:च्या व्यापारात नफा-तोट्याबद्दल जागृत असते की नाही? म्हणजेच जेव्हा व्यवसाय करतो तेव्हा त्यात तो पूर्ण जागृत असतो आणि बसमध्ये बसताना तो जागृत असतो की नसतो? तेव्हा तो 'मेकॅनिकल' नसतो. जागृतीपूर्वक असतो. जग याला जागृतीपूर्वक म्हणते. पण खरे म्हणजे हेही 'मेकॅनिकल'च आहे.

फॉरेनच्या बहुतेक सर्व माणसांना 'मेकॅनिकल'च म्हणता येईल. ही जनावरे-तिर्यंच, या सर्वांना 'मेकॅनिकल'च म्हणायचे ना?

**प्रश्नकर्ता :** देवी-देवतांनाही 'मेकॅनिकल' म्हणायचे का?

**दादाश्री :** देवी-देवतांना 'मेकॅनिकल' म्हणत नाहीत. त्यांना जागृती तर असते. काही देवी-देवता असे असतात की त्यांना आपण मेकॅनिकल राहतो याची जाणीव असते. म्हणून ते त्या स्थितीला कंटाळतात आणि असे नको असे त्यांना वाटते. सर्वच देवी देवता असे नसतात. त्यातील कित्येक तर असे असतात की ते धुंदीतच फिरत राहतात. त्यांना 'मेकॅनिकल' म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** अनेक जण भजने म्हणतात तेव्हा ते शब्द बोलतात, पण त्यांचे भाव वेगळ्याच ठिकाणी असतात, त्याला काय म्हणावे?

**दादाश्री :** ते सर्व 'मेकॅनिकल' म्हटले जाते. 'मेकॅनिकल' म्हणजे उपयोगरहित आणि जर उपयोगसहित कार्य झाले तर तिला जागृती म्हणतात.

उपयोग दोन प्रकारचे असतात : एक शुभ उपयोग, आणि दुसरा शुद्ध उपयोग. जगात शुद्ध उपयोग नसतो, पण शुभाशुभ उपयोग असतो आणि कित्येकांचा अशुद्ध उपयोग पण असतो. अशुद्ध उपयोग आणि अशुभ उपयोगाला उपयोग असे मानले जात नाही. शुभ उपयोग आणि शुद्ध उपयोगालाच उपयोग मानले जाते. इतर (अशुद्ध आणि अशुभ) उपयोगाला तर फक्त ओळखण्यापुरतेच उपयोग म्हटले जाते की तो कुठल्याप्रकारचा उपयोग आहे. अशुभ उपयोग आणि अशुद्ध उपयोग, हे सर्व 'मेकॅनिकल' आहेत आणि शुभ उपयोगात अंशतः जागृती असते. या जन्माचे आणि पुढील जन्माचे हित कशात आहे याबद्दल जागृती असते.

स्वतःच्या घराच्या बाबतीत, व्यवसायाच्या बाबतीत किंवा इतर अशा बाबतीत जागृती असते पण ती जागृती फक्त त्या गोष्टींपुरतीच मर्यादित असते. इतर सर्व बाबतीत 'निद्रा' असते. अशा जागृतीला पण 'मेकॅनिकल'च म्हणतात.

'मेकॅनिकल' केव्हा सुटते? स्वतःचे हित आणि अहित या दोन्ही गोष्टी निरंतर जागृतीत असतील तर 'मेकॅनिकल' सुटते.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, हित आणि अहित, दोन्हीही भौतिकमध्येच येतात ना?

**दादाश्री :** तसे नाही, शुभमार्गातही जागृती असते. पण केव्हा? तर या जन्मात आणि पुढील जन्मात लाभकारी होईल असे शुभ असेल तर त्याला जागृती म्हटले जाते. नाहीतर तो दान देत असेल, सेवा करत असेल पण त्याला पुढील जागृती नसते. सर्व कृती जागृतीपूर्वक करत असेल तरच पुढील जन्माचे हित होईल. नाहीतर ते सर्व झोपेतच जाईल.

हे दान दिले, ते सर्व झोपेत गेले! जागृतीपूर्वक चार आणे पण दिले तरी खूप झाले! दान देतात आणि आतमध्ये कीर्तीची इच्छा असते तर ते सगळे झोपेतच जाते. पुढील जन्माच्या हितासाठी इथे जे दान दिले जाते, त्याला तो जागा आहे असे म्हणतात. हिताहिताचे भान म्हणजे 'स्वत:चे हित कशात आहे आणि कशात नाही' या प्रकारे जागृती राहणे! पुढील जन्माचा ठावठिकाणा नाही आणि इथे दान देत असेल, तर त्याला जागृत कसे म्हणायचे?

म्हणजेच एकेक शब्द जर समजला, अर्थ समजला फुल डेफिनेशन (पूर्ण व्याख्या) समजली, तर वीतरागांचे शब्द असे आहेत की कल्याण होऊन जाईल!

## शुद्ध उपयोगाचा अभ्यास (सराव)

स्वरूप ज्ञानाच्या प्राप्तीनंतर तुम्हाला काय करायचे आहे?

तर तुम्हाला आता उपयोग ठेवायचा आहे. आतापर्यंत आत्म्याचा 'डायरेक्ट' शुद्ध उपयोग नव्हताच. प्रकृती जसे नाचवत होती तसे तुम्ही नाचत होतात आणि म्हणत होता 'मी नाचलो! मी दान केले, मी असे केले, तसे केले, एवढी सेवा केली!' आता तुम्हाला आत्मा प्राप्त झाला आहे, म्हणून तुम्ही आता उपयोगात राहायचे आहे. आता तुम्ही पुरुष झाला आहात आणि तुमची प्रकृती वेगळी झाली आहे. प्रकृती तिचे काम केल्याशिवाय राहणार नाही, ती सोडणार नाही. आणि तुम्हा पुरुषाला, पुरुषार्थात राहायचे आहे. म्हणजेच पुरुषाने पुरुषार्थ करायचा आहे. 'ज्ञानी पुरुषां'नी आज्ञा दिली आहे त्या आज्ञेत राहायचे आहे. उपयोगात राहायचे आहे.

उपयोग म्हणजे काय? आता बाहेर पडलात आणि जर गाढवे जात असतील, कुत्रे जात असतील, मांजर जात असेल आणि आपण पाहिलेच नाही, असेच चालत राहिलो तर आपला उपयोग वाया गेला असे म्हटले जाईल. आणि जर तेव्हा उपयोग ठेवून (गाढवात, कुत्र्यांत) आत्मा पाहत पाहत चाललो तर त्याला शुद्ध उपयोग म्हटले जाईल.

असा शुद्ध उपयोग जर कोणी एक तास ठेवला तर त्याला इंद्राचा अवतार मिळेल, इतकी मौल्यवान आहे ही गोष्ट!

**प्रश्नकर्ता :** शुद्ध उपयोग व्यवहारात, व्यवसायात राहू शकतो का?

**दादाश्री :** व्यवहाराचा आणि शुद्ध उपयोगाचा काहीही संबंध नाही. व्यापार करत असेल किंवा इतर काहीही करत असेल पण स्वरूपाचे ज्ञान प्राप्त झाल्यानंतर, स्वतः पुरुष झाल्यावर शुद्ध उपयोगात राहू शकतो. स्वरूप ज्ञान प्राप्त होण्यापूर्वी शुद्ध उपयोग राहू शकत नाही. मात्र तुम्ही आता शुद्ध उपयोग ठेवू शकता.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे गाढवाला परमात्म्याप्रमाणे पाहावे, परमात्मा मानावे...

**दादाश्री :** नाही, नाही. परमात्मा मानायचे नाही, आत बसले आहेत ते परमात्मा आहेत आणि बाहेर बसला आहे तो गाढव आहे. त्या गाढवावर पोते ठेवून आणि आत बसलेल्या परमात्म्याला पाहून चालावे.

पत्नीमध्ये परमात्मा पाहून व्यवहार करा. नाहीतर पत्नीबरोबर लग्न केलेल्यांनी काय संन्यासी बनायचे? ह्या तरुण मुलांनी काय संन्यासी बनायचे? नाही, नाही, संन्यासी बनायचेच नाही. आतमधील परमात्मा पाहा. परमात्मा काय म्हणतात? माझे दर्शन घ्या. मला काहीच त्रास नाही. माझी काहीच हरकत नाही. व्यवहार, व्यवहारात राहील, त्यात तुम्ही मला पाहा, शुद्ध उपयोग राखा.

**प्रश्नकर्ता :** पॅकिंगला त्रास होतो, त्याचे काय?

**दादाश्री :** तसा त्रास कोणालाच होत नाही. गाढवावर पोती ठेवली तरी त्याला त्रास होत नाही, आणि पोती ठेवली नाही तरी त्याला त्रास होत नाही. गाढवाला तर आम्ही खूप चांगल्या प्रकारे ओळखतो. आम्ही कॉन्ट्रॅक्टरचा व्यवसाय करतो, त्यामुळे आमच्याकडे दोनशे-दोनशे गाढवे कामाला असतात. असे असे कान पाडतात, तेव्हा आम्हाला कळते

की त्यांनी खूप वजन उचलेले आहे, तरी पण ती आपल्या मस्तीतच आहेत. त्यांची मस्ती त्यांनाच समजते. तुम्हाला ती कशी समजणार?

## उपयोग जागृती

**प्रश्नकर्ता :** हा जो रेशमाचा किडा आहे, तो मेहनत करून कोश बनवतो आणि मग स्वतःच त्यात अडकतो! मग बाहेर पडण्यासाठी त्या कोशाची माया कापावी लागते. आता त्याचे तर किती तरी लेअर्स (थर) असतात? मग ते सर्व...

**दादाश्री :** लेअर्स वगैरे काही नाहीत, फक्त भीतीच आहे. मी तुम्हाला ज्ञान दिले आहे ना! म्हणून आता तुम्ही शुद्धात्मा झाला आहात. म्हणून आता ही 'मन-वचन-काया' आणि 'चंदुभाई'च्या नावाची जी जी माया आहे, ती सर्व 'व्यवस्थित शक्ती'च्या ताब्यात आहे. आतून 'व्यवस्थित' प्रेरणा देईल. म्हणून तुम्ही तर 'मी शुद्धात्मा आहे' यातच राहा. आणि या 'चंदुभाई'ना काय होत आहे, चंदुभाई काय करत आहेत, ते तुम्ही 'पाहत' राहा. बस एवढे झाले तर 'तुम्ही' पूर्ण झालात. दोघेही आपले आपले काम करत राहतील. 'चंदुभाई' 'चंदुभाई'चे काम करतील. त्यात तुम्ही हस्तक्षेप करत नसाल तर तुम्ही कोशातून बाहेर पडले आहात. एकच दिवस जरी 'तुम्ही' हस्तक्षेप केला नाही तर तुम्हाला समजून येईल की 'अहाहा! मी कोशातून बाहेर आलो.'

एकच दिवस रविवारी तुम्ही हा प्रयोग करून तर पाहा. तुम्ही जो पाच (इंद्रियांच्या) घोड्यांचा लगाम पकडून ठेवला आहे तो सोडून 'माझ्या' हातात द्या! मग तुम्ही निवांत रथात बसा आणि म्हणा 'दादा, घ्या आता, मी तर निवांत बसलो आहे, तुम्हाला जसे चालवायचे असेल तसे चालवा!' मग पाहा तुमचा रथ कोणत्याच खड्ड्यात पडणार नाही. इथे तर तुम्हाला चालवता येत नाही तरी तुम्ही चालवायला जाता म्हणून उतार आला की तुम्ही लगाम सैल सोडता आणि चढ आला की ओढत बसता. हे सगळे एकदम विरोधाभासी आहे. नाहीतर मी तुम्हाला जो आत्मा दिला आहे ना, त्यामुळे तुम्ही आता कोशातून बाहेर आलेलेच आहात.

पण आता तुम्हाला उपयोग सेट करावा लागेल. अर्थात तुम्हाला आत्मा दिला आहे पण आत्म्याचा उपयोग असा आहे की स्लिप होण्याचा (घसरण्याचा) उपयोग तर सहजपणे राहतो. म्हणूनच उपयोग 'सेट' करायचा आहे. त्यासाठी स्वत:ला जागृती ठेवावी लागेल, पुरुषार्थ करावा लागेल. कारण आता स्वत: पुरुष झाला आहे!

आता 'स्लिप' होण्याचा उपयोग कशाला म्हणतात? एक मिलमालक शेठ होते. ते माझ्याबरोबर जेवायला बसले. त्यांची बायको समोर येऊन बसली. मी विचारले 'तुम्ही अशा समोर येऊन का बसला आहात?' तेव्हा त्या म्हणाल्या, 'ते नीट जेवत नाहीत. आज आपण आला आहात म्हणून तरी त्यांनी नीट जेवावे, म्हणून मी बसली आहे!'

तेव्हा शेठजी म्हणाले, 'ऊठ, ऊठ, तू एकदम बेअक्कल आहेस.' तेव्हा मी समजून गेलो की 'शेठ कसे असतील?' मी शेठला म्हटले 'शेठानी तुमच्या हितासाठीच सांगत आहेत. तुम्ही नीटपणे जेवाल तर तुमचे स्वास्थ्य चांगले राहील. उलट त्यांनाच का बेअक्कल म्हणता?' तेव्हा शेठ म्हणाले 'तिचे म्हणणे बरोबर आहे. मी जेव्हा जेवायला बसतो तेव्हा माझे लक्ष मिलमध्येच असते, मी तिथे सेक्रेटरीशी बोलत असतो आणि इथे शरीर खात असते.' याला स्लिप झालेला (घसरलेला) उपयोग म्हणतात. मी शेठजींना सांगितले 'शेठजी, इथे तुमचा उपयोग 'स्लिप' झाला. त्यामुळे काय होईल हे माहित आहे का तुम्हाला? जेवताना जर 'चित्त' गैरहजर असेल तर 'हार्टफेल'ची निमित्ते तयार होतील. जेवताना कधीही चित्त गैरहजर ठेवू नये.' तेव्हा शेठजी म्हणाले 'जेवताना माझे चित्त गैरहजरच असते. मला काही तरी मार्ग दाखवा.' मग मी त्यांना 'चित्त कसे हजर राहू शकते?' ते सांगितले. समजा त्या शेठजींना पैसे मोजायला दिले तर तेव्हा काय होईल?

**प्रश्नकर्ता :** ते जेवण करायचे पण विसरून जातील.

**दादाश्री :** त्यावेळी तर त्यांचा उपयोग पैसे मोजण्यातच असतो. एका वाण्याच्या मुलाला नोकरीत सहाशे रुपये पगार होता. त्याला मी विचारले, 'जर तुला हा पगार एक एक रुपयाच्या नोटात दिला तर काय

करशील?' तेव्हा तो म्हणाला 'मी मोजून घेईन.' अरे, सहाशे नोटा मोजायला तर कितीतरी वेळ लागेल? याचा शेवट कधी येईल? एवढ्यात तर एखादा शिकारी येऊन झटकन् पैसे हिसकावून जाईल. आणि हे रुपये मोजण्यात तू उपयोग ठेवलास तर तुझा किती वेळ वाया जाईल? फार फार तर त्यात पाच रुपये कमी असतील. आणखी काय असेल? आणि देणाराही कमी नोटा देणारच नाही ना? कारण सगळे जण मोजूनच घेतात हे त्यांच्या लक्षातच असते. आपल्यासारखा पुण्यशाली तर क्वचितच कोणी असेल की जो न मोजता घेईल! म्हणून आपले तर असेच (काम) होऊन जाते! यासाठी वेळ वाया का घायवायचा? तेव्हा तो म्हणाला 'पाच पाच पैसे असतील तरी पण मी मोजूनच घेईन!' धन्य अशा लोकांची! अशा प्रकारे उपयोग स्लिप होतो, वाया जातो.

जर उपयोग शुद्धात्म्यात असेल तर तो सर्व ठिकाणी मदत करील. खाताना, पिताना, व्यवसाय करताना सर्वत्र त्याची मदतच होईल. कारण (प्रतिष्ठित) आत्मा यात दुसरे काही करत नाही, फक्त दखलच करत राहतो.

दखल म्हणजे काय? मला जर कोणी विचारले की दही कसे बनवायचे? मला शिकवा, मला बनवायचे आहे. तर मग ती त्याला पद्धत सांगेन. दूध गरम करून थंड कर. मग त्यात एक चमचा दही घालून ढवळ. मग झाकण ठेवून आरामात झोपून जा, नंतर परत काही करू नकोस. आता हा माणूस रात्री दोन वाजता 'लघवी'साठी उठला असेल तर तेव्हा स्वयंपाकघरात जाऊन दह्यात बोट घालून हलवून पाहील की दही बनत आहे की नाही? याला दखल करणे म्हणतात. आणि मग सकाळी दह्यात गडबड होते. याच प्रकारे संसारात गडबड करून लोक जगतात! आत्म्याचा उपयोग हटू न देणे (चालूच ठेवणे) यालाच उपयोग जागृती म्हणतात.

उपयोग कशाला म्हणतात? समजा दीड मैल दोन्हीकडे समुद्र आहे आणि मध्ये एकच माणूस जाऊ शकेल एवढा अरुंद पूल आहे. त्या पूलावरून जर तुम्हाला चालायला सांगितले तर त्यावेळी तुम्ही जी जागृती राखता, त्याला उपयोग म्हणतात. अशा वेळी जर त्याला बँकेचा

विचार आला की आता एवढी रक्कम शिल्लक आहे आणि एवढी बँकेत भरायची आहे, तर तो लगेचच त्या विचाराला बाजूला सारून जागृतीला पुलावर चालण्यासाठी 'कॉन्सन्ट्रेट' करतो (लक्ष केंद्रित करतो).

शास्त्रकारांनी सांगितले आहे की खाताना, पिताना उपयोग ठेवा, प्रत्येक काम करताना उपयोगात राहा. उपयोग अर्थात जेवताना इतर काहीही नसावे. चित्ताला हजर ठेवणे म्हणजे उपयोग. दोन्ही बाजूला समुद्र असेल, तर चित्ताला हजर ठेवतो की नाही? लहान मुले देखील खेळ बाजूला टाकून जागृत होतात. ती पण खूप हुशार असतात.

कोणत्याही देहधारीला उपयोग नसणे हे शक्यच नाही. तुम्ही त्यांना पैसे मोजताना पाहा. त्यावेळी जर बायको आली, मुलगी आली तर त्यांना डोळे पाहतात पण त्याला त्या दिसत नाहीत मग बायको म्हणते 'तुम्ही पैसे मोजत होतात तेव्हाच आम्ही आलो होतो, तरी पण आम्ही तुम्हाला दिसलो नाही?' तेव्हा तो म्हणतो, 'माझे लक्ष नव्हते!' डोळे पाहतात तरी दिसत नाहीत याला म्हणायचे उपयोग.

आताही माझा उपयोग शुद्धात्म्यात आहे. तुमच्या सोबत मी बोलत असेन किंवा इतर काही करत असेन, पण आमचा उपयोगात उपयोग असतो! ही मन-वचन-काया त्यांचे त्यांचे काम करत असतात तेव्हा देखील उपयोगात उपयोग राहू शकतो.

तुम्हाला तर जितका जमेल तितका ठीक. नाही जमला तर काय सूरसागरात (बडोद्याचा एक मोठा तलाव) उडी मारायची? नाही, आपले काम सूरसागर तलाव शोधण्याचे नाही.

आत्मा आणि ही प्रकृती दोन्ही वेगळे आहेत, स्वभावानेच वेगळे आहेत. सर्व प्रकारे वेगळे आहेत. संसारात आत्मा अजिबात उपयोगात येत नाही. फक्त आत्म्याचा प्रकाश उपयोगात येतो. तो प्रकाश नसेल तर ही प्रकृती अजिबात चालणार नाही. हा प्रकाश आहे, म्हणून तर ही सर्व प्रकृती चालू आहे. पण आत्मा यात काहीच करत नाही.



# [ 16 ]

## गोष्ट सरळ समजून घ्या ना!

**प्रश्नकर्ता :** चारित्र्य कशाला म्हणतात?

**दादाश्री :** 'ज्ञाता-द्रष्टा' राहिले तेवढाच भाग चारित्र्य म्हटला जातो. 'चंदुभाई'ला तुम्ही पाहत राहा, 'चंदुभाई'चे मन काय करत आहे, त्याच्या मनात काय काय विचार येत आहेत, चंदुभाई काय काय बोलत आहे! ते सर्व 'तुम्ही' पाहतच राहा. बाहेर कोण कोण भेटतात! ते सर्व स्थूल संयोग. मग मनाचे सूक्ष्म संयोग, आणि वाणीचे संयोग, त्या सर्वांना तुम्ही पाहत राहा. तो तुमच्या आत्म्याचा स्वभाव आहे आणि त्यालाच चारित्र्य म्हणतात! त्यामध्ये पाहणे-जाणणे आणि परमानंदात राहणे असते आणि जगाच्या भ्रांतीचा स्वभाव आहे पाहणे-जाणणे आणि दु:खानंदात राहणे. दु:ख आणि आनंद, दु:ख आणि आनंद या दोघांचे मिश्रण!

**प्रश्नकर्ता :** राग-द्वेष कसे जातील?

**दादाश्री :** जोपर्यंत 'देहाध्यास' आहे तोपर्यंत राग-द्वेष आहेत, 'देहाध्यास' संपला की राग-द्वेष संपले!

'देहाध्यास' म्हणजे हा देह तो मी आहे, ही वाणी मी बोलतो, हे मन माझे आहे, हा देहाध्यास. तुमचे हे सर्व आता संपले आहे, म्हणजेच देहाध्यास गेला आणि 'मी शुद्धात्मा आहे' हे भान राहिले की मग वीतराग म्हटले जाते. तरी पण जे राग-द्वेष दिसतात, ते तर होतच

राहतील. त्याला भगवंतानी चारित्र्यमोह असे म्हटले आहे. मूळ मोह, दृष्टीमोह संपला. जो सतत उलट चालत होता तो आता सरळ चालू लागला. दृष्टी सरळ झाली, पण पूर्वीचे जे परिणाम आहेत, तो मोह, परिणामी मोह तर अजून येईल. त्याला वर्तन मोह म्हणतात. लोक तुम्हाला दाखवतात देखील की तुमच्यात हा मोह भरलेला आहे, आणि तुम्हाला 'हो' असे कबूल पण करावे लागते.

समजा आज येथे भगवंत स्वत: आले असतील आणि त्यांना कोणी विचारील हे 'महात्मा' सारखी बटाट्याची भाजी का मागत असतात? त्यांचा मोह अजून संपला नाही का?

त्यावर भगवंत त्याला काय म्हणतील हे माहिती आहे का? भगवंत म्हणतील "हा मोह आहे, पण तो चारित्र्यमोह आहे, 'डिस्चार्ज' मोह आहे. त्यांची अशी इच्छा नसते पण हे समोर आलेले आहे म्हणून हा सर्व मोह उत्पन्न होत आहे आणि खाऊन झाल्यानंतर त्यांना असे काहीच राहत नाही!" खाण्यात जरा विशेष झाले, तो 'चारित्र्यमोह' आहे. आणि जर फक्त भुकेसाठीच जेवला तर त्याला चारित्र्यमोह म्हणत नाहीत. भुकेसाठी जेवण्यापूर्वी जर म्हणाला 'भाजी आणा, चटणी आणा.' तर आपल्याला समजते ना की त्याला या गोष्टींचा मोह आहे. आणि खाताना जर वरण थोडे शिल्लक राहिले तर तो पण चारित्र्यमोह आहे. आपण जर त्यांना विचारले की वरण का नाही खाल्ले? तर ते म्हणतील 'नाही, आवडले नाही.' हा पण एक प्रकारचा मोहच आहे ना? जेवण थोडेसे टाकले तर तोही मोह आणि जास्त जेवला तर तोही मोहच.

आणि ज्याला राग-द्वेष नाही, कसलाही मोह नाही, तो तर जे समोर येईल ते गुपचूप खातो. दुसरी भानगडच नाही, तर त्याला मोह म्हणत नाहीत. पण या मोहाला काहीच महत्त्व नाही. हा मोह अगदी लाखो मणांचा असेल, तरी पण तो निकाली मोह असल्यामुळे त्याची काहीच किंमत नाही. दर्शनमोह गेल्यावर जो उरतो तो चारित्र्यमोह! त्याला काही महत्त्वच नाही. तो 'डिस्चार्ज मोह' आहे. आणि ज्यांचा दर्शनमोह अजून गेलेला नाही असे मोठे त्यागी असतील आणि त्यांनी

जर थोडी जास्त भाजी मागितली तर तो खूप मोठा मोह आहे. 'अहो, आम्ही रोजच जास्त भाजी मागतो, पण आम्हाला काही मिळत नाही आणि यांना एकाच दिवसात एकदम एवढे सगळे मिळते?'

तेव्हा आम्ही म्हणू, 'हो एकाच दिवसात भयंकर दोष लागतात.' कारण हा खरोखरच मोह आहे, म्हणून एकाच दिवसात सर्व त्यागाचे फळ नष्ट होते, आणि स्वरूपज्ञानी 'महात्म्यांना' अगदी कितीही मोह का असेना, त्यांचे काही बिघडत नाही. ही गोष्ट समजायलाच हवी. चारित्र्यमोह ही खूप खूप सूक्ष्म गोष्ट आहे.

शरीराच्या पोषणाला आवश्यक एवढेच खावे. तर त्याबद्दल लोक असे म्हणत नाही की या भाईंनी मोह केला. पण त्यात मात्र अनेक प्रकारच्या चटण्या, लोणची, आमरस असे सर्व घेतले तर जग म्हणते 'तुम्हाला मोह आहे!' अरे, मला देखील म्हणतात ना? मी आंबा, चटणी, लोणचे खातो, तेव्हा मलाही म्हणतात. पण तो वर्तन मोह आहे, त्याचा आम्ही निकाल करत आहोत. निकाल केला म्हणून मग परत उत्पन्न होणार नाही. पूर्वीचा जो 'डिस्चार्ज' स्वरूपात होता, तो आता जात आहे.

**प्रश्नकर्ता :** लोक हे मान्य करणार नाहीत.

**दादाश्री :** लोकांना हे समजतच नाही, ते तर त्याला मोह आहे असेच समजतात. महावीर भगवंत हा मोहच पाहत असत. कपडे घालून फिरणे हा पण मोह आणि नग्न फिरणे हा सुद्धा मोहच आहे. दोन्हीही मोहच आहेत. पण ते 'डिस्चार्ज' मोह आहेत. पूर्वी 'मी चंदुभाई आहे' असे मानून उलटच चालत होता, तो आता सरळ झाला आहे. त्याची दृष्टी आता पूर्णपणे सुधारली आहे. म्हणून आता आत नवीन मोहांचा गठ्ठा निर्माण होणार नाही. परंतु जो जुना मोह आहे, त्याचे परिणाम येत आहेत. ते भोगल्याशिवाय तर गत्यंतरच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे दृष्टीमोहातून चारित्र्यमोह निर्माण झाला असे म्हणायचे का?

**दादाश्री :** दृष्टीमोह आणि चारित्र्यमोह हे दोन्ही मोह एकत्र येतात त्याला 'अज्ञानमोह' म्हटले जाते. सर्व जग या अज्ञानमोहातच अडकले आहे ना? या पैकी एक झोपला तर दुसऱ्याचे निराकरण होईल (या पैकी एक संपला तर दुसराही संपेल) असे आहे. हा दृष्टीमोह गेला की झाले, मग चारित्र्यमोहाची किंमत चार आणे पण नाही.

**प्रश्नकर्ता :** पण क्रमिक मार्गात या चारित्र्यमोहाला एखादी प्रतिज्ञा करून, अहंकार करून घालवतात ना?

**दादाश्री :** दृष्टीमोह जायला हवा, तरच जो उरेल त्याला चारित्र्यमोह मानले जाईल. अर्थात चारित्र्यमोह कधी मानले जाईल? दर्शनमोह संपल्यावर मोहाचे विभाजन होते. त्यातला एक भाग संपतो आणि दुसरा जो उरतो तो चारित्र्यमोह आहे 'डिस्चार्ज'मोह आहे. जर स्वरूपाचे भान झाले तर 'चार्जमोह' संपतो. तो 'चार्जमोह'च हानीकारक आहे. 'चार्जमोह' म्हणजे दर्शनमोह.

**प्रश्नकर्ता :** परंतु लोक तर डिस्चार्ज मोहालाच घालविण्यासाठी खटाटोप करतात ना?

**दादाश्री :** नाही. त्या लोकांना 'डिस्चार्ज'मोह तर समजतच नाही. जग तर यालाच 'मोह' समजते. 'डिस्चार्ज'मोह काढण्यासाठी दुसरा मोह उभा करतात, त्याचेच नाव 'क्रमिक मार्ग'. आणि आम्हाला वेगळेच सांगायचे आहे. आम्ही म्हणतो की या कटकटीत पडताच कशाला? सरळ गोष्ट समजून घ्या ना? सरळ समजून घेतलेत तर निराकरण होईल. तेव्हा ते म्हणतात की जर सरळ समजावणारा कोणी असेल तरच सरळ समजेल ना? सरळ समजावणारे नसतातच ना! मग काय? नाहीतर ज्ञान तर होतेच ना, परंतु ज्ञानी नसतात मग ते कसे शक्य होईल?

तुम्ही लाडू-पुऱ्या वगैरे सर्व खाता, तर काय मी तुम्हाला रागावतो? कारण मला माहीत आहे की तुम्ही तुमच्या मोहाचा निकाल करत आहात.

**प्रश्नकर्ता :** नाही तरी तुम्ही कुठे कोणाला रागावता?

**दादाश्री :** हे रागावण्यासारखे नाहीच. सगळेच निकाल करत आहेत. तिथे कसले रागावणे? दर्शनमोह असेल आणि कोणी उलटा चालत असेल तर मात्र रागावावे लागेल.

**प्रश्नकर्ता :** एखाद्याचा डिस्चार्जमोह पाहून अशी प्रेरणा घेतली की मी त्याच्याहून जास्त चांगले करीन, अशा मोहात पडला तर त्याला कसला मोह म्हणायचा?

**दादाश्री :** तो पण डिस्चार्जमोहच आहे. आपल्याला असे दिसते की याने काहीतरी नवीन केले आहे, पण तो तसे करत नसतो. तो जे काही नवीन करतो तो पण डिस्चार्जमोहच आहे. हा आमचा 'सायंटिफिक' शोध आहे. जर समजलात तर निराकरण होईल असे आहे. एकाच जन्मात कोटी-कोटी जन्मांच्या परिणामांचा नाश होईल, असे आहे.

**प्रश्नकर्ता :** पण ह्या डिस्चार्जमोहाचा अंत कधी येईल?

**दादाश्री :** जोपर्यंत हे शरीर आहे, तोपर्यंत डिस्चार्ज मोह राहणारच. आणि तुम्ही माझ्या आज्ञांचे पालन केले आहे त्यामुळे दुसरा मोह उत्पन्न केला आहे, तो एक जन्मभर तुम्हाला उपयोगी पडेल.



## [ 17 ]

## कर्मफळ - लोकभाषेत आणि ज्ञानींच्या भाषेत

**प्रश्नकर्ता :** सर्व काही इथल्या इथेच भोगायचे आहे, असे म्हणतात. ते काय आहे?

**दादाश्री :** हो, भोगायचे तर इथल्या इथेच आहे, पण ते या जगाच्या भाषेप्रमाणे. अलौकिक भाषेत याचा अर्थ काय आहे?

मागील जन्मात अहंकाराचे, मानाचे कर्म बांधले असते, म्हणून या जन्मात त्यांच्या इमारती बांधल्या जातात, त्यामुळे मग तो मानी बनतो. कशामुळे मानी बनतो? कर्मांच्या हिशोबामुळे तो मानी बनतो. आणि मानी बनला तर त्याला या जगातील लोक काय म्हणतात की, 'हा कर्म बांधत आहे, हा असा मान बाळगून सर्वत्र फिरत आहे.' जगातील लोक याला कर्म म्हणतात. परंतु प्रत्यक्षात भगवंतांच्या भाषेत हे कर्माचे फळ आले आहे. फळ म्हणजे मान बाळगायचा नसेल तरी बाळगावाच लागतो, होऊनच जातो!

आणि जगातील लोक जे म्हणतात की हा क्रोध करतो, मान करतो, अहंकार करतो, त्याचे फळ तर इथल्या इथेच भोगावे लागते. मानाचे फळ इथे कशाप्रकारे येते की अपयश येते, अपकीर्ती पसरते. आणि ते इथेच भोगावे लागते. मान करतो, त्यावेळी त्याच्या मनात हे चुकीचे होत आहे, असे होता कामा नये, आपल्याला निर्मानी होण्याची

गरज आहे, असे भाव असतील तर मग तो नवीन कर्म बांधतो. त्यामुळे मग पुढील जन्मात तो निर्मानी बनतो.

कर्माची थिअरी (सिद्धांत) ही अशी आहे! चुकीचे कृत्य होताना जर आतील भाव बदलले तर नवीन कर्म त्या प्रकारचे बांधले जाते. आणि जर चुकीचे केल्यावर खुश झाला आणि 'असेच करायला हवे.' असे भाव झाले तर मग नवीन कर्म बळकट होते, निकाचित होते. मग ते भोगावेच लागेल.

हे पूर्ण विज्ञान समजून घेण्यासारखे आहे. वीतरागींचे विज्ञान खूप गुह्य आहे.

## परिणामात समता

आपल्या 'अक्रम'चा सिद्धांत काय आहे की जर पैसे पडत असतील तर प्रथम ते पडणे बंद करावे आणि मग जे खाली पडले आहेत ते गोळा करावे. जग फक्त गोळा करत राहते. अरे बाबा, प्रथम जे पडत आहेत ते तरी थांबव, नाहीतर निकाल होणारच नाही.

आत्म्याशिवाय बाकी सर्व काय आहे? व्यवहार आहे. हा व्यवहार पराश्रित आहे. तुमच्या हातात काहीच नाही. लोक पराश्रितला स्वाश्रित मानतात. एकाने मानले, दुसऱ्याने मानले म्हणून स्वतःही तसेच मानले. मग त्यासंबंधी काही विचारच येत नाहीत. एकदाका रोग घुसला तर मग तो निघणार कसा? नंतर मग हा संसार रोग वाढत जाऊन 'क्रॉनिक' (असाध्य, जुनाट रोग) झाला. रोग जेव्हा 'क्रॉनिक' झाला नव्हता तेव्हा निघाला नाही. मग आता तो 'क्रॉनिक' झाल्यावर कसा काय निघेल? हे विज्ञान मिळेल, तर सुटेल.

तुमचा जेवढाही व्यवहार आहे, तो सर्व जर पूर्ण केला तर मग तुम्हाला व्यवहारासंबंधी जास्त अडचणी येणार नाहीत. आतमध्ये जशी भावना असेल त्यानुसार सर्व आधीच तयार असेल! 'विहार लेक' वर फिरायला गेलो होतो, तेव्हा माझ्या मनात नवीनच विचार आला की ही शंभर माणसे, पन्नास पुरुष आणि पन्नास स्त्रिया, जर सर्व मिळून माताजींचा

गरबा करतील तर किती चांगले! फक्त असा विचारच आला आणि वळून पाहिले तर ते सगळे जण त्याप्रमाणे गोळा झाले होते आणि गरबा करूही लागले होते! मी तर कोणाला काहीच सांगितले नव्हते, तरी पण झाले! म्हणजे असे घडत असते! तुमचे विचार वाया जात नाहीत, बोलणे वाया जात नाही. सध्या लोकांचे कसे आहे? काहीच फळत नाहीत. बोलणे पण सफळ होत नाही, विचारही सफळ होत नाहीत आणि वर्तन पण सफळ होत नाही. तीनवेळा वसूलीला जातो, फेऱ्या मारतो पण देणेकरी भेटतच नाही, आणि जर भेटला तर उलट तोच खवळतो!

हा मार्ग तर असा आहे की तो घर बसल्या तुम्हाला पैसे परत करायला येईल. पाच-सात वेळा वसूलीला जाऊन देखील तो भेटत नाही आणि शेवटी जेव्हा भेटतो तेव्हा म्हणतो एक महिन्यानंतर या. त्यावेळी जर तुमचे परिणाम बदलले नाहीत तर घर बसल्या पैसे येतील.

तुमचे परिणाम बदलतात ना? 'हा बेअक्कल आहे, हा नालायक आहे, खेप वाया गेली.' वगैरे तुम्ही बोलता. म्हणजेच तुमचे परिणाम बदलतात. नंतर जेव्हा तुम्ही परत त्याच्याकडे जाता तेव्हा तो तुम्हाला शिव्या देतो. आमचे (दादाजींचे) परिणाम बदलत नाहीत, मग काय काळजी? परिणाम बदलले तर तो बिघडणार नसेल तरी बिघडेल.

## वाघ हिंसक आहे की बिलीफ हिंसक?

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ असाच की आपणच बिघडवतो?

**दादाश्री :** आपले सर्व आपणच बिघडवतो. आपल्याला जेवढ्या अडचणी येतात त्या सर्व आपणच बिघडवल्यामुळे आहेत. एखादा वाकडा असेल तर त्याला सुधारण्याचा मार्ग कोणता? तर समोरच्याने जरी कितीही दु:ख दिले, तरी पण त्याच्याबद्दल उलट विचार येता कामा नये, हा त्याला सुधारण्याचा मार्ग! यामुळे आपलेही सुधारते आणि त्याचेही सुधारते! पण जगातील लोकांना उलट विचार आल्याशिवाय राहत नाही. आणि आम्ही तर 'समभावाने निकाल' करायला सांगितले आहे. 'समभावाने निकाल' म्हणजे त्याच्याबद्दल कोणताही विचार न करणे!

जर वाघाचे प्रतिक्रमण केले तर वाघ पण आपण सांगितल्याप्रमणे काम करील. वाघ आणि माणसात काही फरक नाही. फरक तुमच्या स्पंदनांचा आहे. त्याचा परिणाम होतो. जोपर्यंत तुमच्या मनात 'वाघ हिंसक आहे' असा विचार असतो तोपर्यंत वाघ हिंसकच राहतो आणि 'वाघ शुद्धात्मा आहे' असा विचार आला तर तो 'शुद्धात्माच आहे.' सर्व काही शक्य आहे.

हा चेंडू फेकल्यानंतर (काही वेळाने) आपोआप स्वभावानेच त्याचे परिणाम बंद होतील. हा सहज स्वभाव आहे. तिथे जगातील लोकांची मेहनत वाया गेली! कारण जग परिणाम बंद करू पाहते आणि कारणे चालूच राहतात! त्यामुळे मग झाडातून 'बी' आणि 'बी' मधून झाड बनणे चालूच राहते. पाने कापून काहीही निष्पन्न होणार नाही. त्याला तर मुळासकट उपटून टाकले तरच काम होईल. आम्ही तर त्याच्या मुख्य मुळाशी थोडेसे औषध टाकतो, मग पूर्ण वृक्ष सुकतो.

ह्या जगाला संसारवृक्ष म्हणतात. एका बाजूला कडू फळे येतात आणि एका बाजूला गोड फळे येतात, आणि ती फळे परत आपल्यालाच खावी लागतात.

समजा कधी आंब्याच्या झाडावर माकडे आली, आणि त्यांनी आंबे तोडले तर मालकाचे परिणाम कुठपर्यंत बिघडतात? परिणाम इतके बिघडतात, की मागचा पुढचा कसलाही विचार न करताच तो म्हणतो 'हे आंब्याचे झाड कापून टाकलेलेच बरे!' आता हे तर भगवंतांच्या साक्षीने बोलणे झाले, ते काय व्यर्थ थोडेच जाईल? परिणाम बिघडले नाहीत तर काहीही होणार नाही. सगळे शांत होईल. बंद होईल!

## भाव आणि इच्छा यांची उत्पत्ती

**प्रश्नकर्ता :** भाव आणि इच्छा यात काय फरक आहे?

**दादाश्री :** जगातील लोक जे दिसतात त्यांना भाव म्हणतात. पण भाव तर कोणालाच दिसत नाहीत. स्वत:लाही कळत नाही की कोणता भाव केला?

**प्रश्नकर्ता :** हे ज्ञान मिळाल्यानंतर आम्हाला खूप सारे भाव होतात, तर त्यामुळे कर्मे 'चार्ज' होणार नाही का?

**दादाश्री :** तुम्हाला भाव होतीलच कसे? 'तुम्ही' जर परत 'चंदुभाई' झालात तर भाव होतील. जर 'चंदुभाई' झालात, तर तेव्हा अहंकार असेल, आणि त्यानंतर भाव होतील. 'मी कर्ता आहे' असे भान असेल तरच भाव होतील.

**प्रश्नकर्ता :** आणि या इच्छा होतात, तो कर्तेपणा नाही का?

**दादाश्री :** नाही, आता आपल्या सर्व इच्छा मावळत्या इच्छा म्हटल्या जातात. इच्छा तर मलाही होतात! बारा वाजले असतील तर मी पण स्वयंपाकघराकडे पाहायला जातो, आणि तेव्हा तुम्हाला समजतेच ना, की दादाजींना काही तरी इच्छा आहे! पण ती मावळती इच्छा आहे. थोड्या वेळाने त्या सर्व इच्छा मावळतील. त्यांना उगवत्या इच्छा म्हणत नाहीत. त्या सर्व निकाली बाबी आहेत.

**प्रश्नकर्ता :** काम करत असताना जर मध्येच इच्छा उत्पन्न झाली तर त्या प्रत्येक वेळी कोणती 'टेस्ट' (कसोटी) लावावी की ती 'डिस्चार्ज' इच्छा आहे की 'चार्ज' इच्छा आहे हे कळेल?

**दादाश्री :** तुम्ही 'चंदुभाई' झालात तरच 'चार्ज' होईल. यात गोंधळून जाण्याची गरजच नाही. हे तर विज्ञान आहे! आपले 'अक्रम विज्ञान' काय सांगते की, सैद्धांतिक बोलावे म्हणजे मग काथ्याकूट करावा लागणार नाही. पुन्हा पुन्हा काथ्याकूट करणे याला काय अर्थ आहे?

लोकांनी असेच मानले आहे की आत्म्याला इच्छा होत असतात. मग नंतर परत असेही म्हणतात की माझ्या इच्छा बंद झाल्या. इच्छा हा जर आत्म्याचा गुण असेल, तर कोणाच्याच इच्छा कधीच बंद होणार नाहीत ना! पण हा तर विशेष परिणाम आहे. असे असूनही आत्मा वीतरागच असतो! लोकांना ते माहीतच नाही. ते तर असेच म्हणतात

की माझा आत्माच बिघडला आहे, माझा आत्मा पापी आहे, रागी-द्वेषी आहे. आणि काही जण आत्म्याला शुद्धच म्हणतात. मग त्यांना दुसऱ्या प्रकारे नुकसान होते. आत्मा शुद्धच आहे म्हणून आता आपल्याला काहीच करायचे नाही (असे त्यांना वाटते). अरे, मग देवळात का जातोस? पुस्तके का वाचतोस? अर्थात हे दोघेही भरकटले गेले आहेत. आत्मा तसा नाही. ही खूप सूक्ष्म गोष्ट आहे. म्हणूनच सर्व शास्त्रे सांगतात की आत्मज्ञान जाणा! आत्मा स्वत:च परमात्मा आहे!

## रेकॉर्डच्या शिव्यांमुळे तुम्हाला राग येतो का?

**प्रश्नकर्ता :** ही मन-वचन-काया पर आहे आणि पराधीन आहे, म्हणून हे सर्व 'व्यवस्थित'च्या आधीन झाले ना?

**दादाश्री :** हो, 'व्यवस्थित'च्या आधीन आहे म्हणजे आत्म्याच्या आधीन नाही, असे आम्हाला सांगायचे आहे. 'पर' म्हणजे तुझे नाही आणि 'पराधीन' म्हणजे तुझ्या हातात काहीच नाही. इथे तू ठरवशील तसे होऊ शकणार नाही.

कोणी शिवी दिली, तर ते पराधीन (पर+आधीन) आहे. आम्ही म्हणतो की ती 'रेकॉर्ड' आहे त्याचे कारण समोरच्या व्यक्तीला शिव्या देण्याची शक्तीच नाही, तो तर 'व्यवस्थित शक्ती'च्या ताब्यात आहे! म्हणजेच प्रत्यक्षात ती 'रेकॉर्ड'च आहे. आणि जर तुम्ही हे समजून घेतले तर तुम्हाला राग येईल का? 'रेकॉर्ड' जर 'चंदुभाई वाईट आहे, चंदुभाई वाईट आहे.' असे बोलत (वाजत) असेल तर तुम्हाला राग येईल का? पण तुमच्या मनाला तर असेच वाटते की 'तो' बोलला, म्हणून तुम्हाला राग येतो! प्रत्यक्षात तो बोलतच नाही. ती रेकॉर्ड बोलत आहे आणि तो तर जे तुमचे आहे तेच तुम्हाला परत करत आहे.

निसर्गाची किती उत्तम व्यवस्था आहे! हे सर्व नीट समजून घेण्याची गरज आहे. अक्रम विज्ञानाने सर्व स्पष्टीकरणे खूप चांगली दिली आहेत. ही तर 'व्यवस्थित शक्ती'ची एकदम नवीनच गोष्ट आहे!

## अकर्म दशेचे विज्ञान

**प्रश्नकर्ता :** कुठलेही चुकीचे कृत्य केले तर कर्मबंधन होईलच, असे मी मानतो.

**दादाश्री :** तर मग चांगल्या कर्मांचे बंधन नसते का?

**प्रश्नकर्ता :** चांगल्या आणि वाईट दोन्हींमुळे कर्मे बांधली जातात ना?

**दादाश्री :** अरे! आता या क्षणीदेखील तुम्ही कर्म बांधत आहात! आता तुम्ही खूप उच्च प्रकारचे पुण्यकर्म बांधत आहात! परंतु कर्मबंधन होणारच नाही, असा दिवसच येत नाही ना? त्याचे कारण काय असेल?

**प्रश्नकर्ता :** चांगले किंवा वाईट काही ना काही तर करतच असू ना?

**दादाश्री :** हो, पण कर्मेच बांधली जाणार नाहीत असा मार्ग नसेल का? महावीर भगवंत कर्मबंधने न होता कसे सुटले असतील? हा देह आहे तर कर्मे तर होतच राहतील. जेवावे लागते, संडासला जावे लागते, सगळे काही करावे लागतेच ना?

**प्रश्नकर्ता :** हो, पण जी कर्मे बांधली असतील त्यांची फळे तर भोगावीच लागतील ना?

**दादाश्री :** कर्मे बांधली तर मग पुढचा जन्म होणारच! म्हणजेच कर्मे बांधली की पुढच्या जन्मात जावेच लागते! पण महावीर भगवंतांना पुढील जन्मात जावे लागले नाही. म्हणजेच कर्म केले तरी पण कर्मबंधन होणार नाही, असा काही तरी मार्ग असेलच ना?

**प्रश्नकर्ता :** असेल.

**दादाश्री :** कर्मे बांधलीच जाऊ नयेत अशी इच्छा तुम्हाला होते का? कर्मे करूनही कर्मबंधने होणार नाहीत असे विज्ञान असते. ते विज्ञान जाणलेत तर मुक्त व्हाल.

## कर्मे बाधक नसतात...

**प्रश्नकर्ता :** आपल्या कर्मांच्या फळामुळे हा जन्म मिळतो ना?

**दादाश्री :** हो, पूर्ण आयुष्य कर्मांची फळे भोगायची आहेत. आणि यातून जर परत राग-द्वेष केलेत तर नवी कर्मे उत्पन्न होतात! जर राग-द्वेष केले नाहीत तर मग काहीच होणार नाही. कर्म आहे त्याला हरकत नाही, शरीर आहे म्हणून कर्मे होणारच. पण राग-द्वेष करतात त्याला हरकत आहे. वीतरागी म्हणतात की तुम्ही वीतराग व्हा. या जगात तुम्ही जी काही कामे करता, त्यात त्या कामाला किंमत (महत्त्व) नसते. पण त्याच्या मागे जर राग-द्वेष असतील तरच पुढच्या जन्माचा हिशोब बांधला जातो. जर राग-द्वेष होत नसतील तर काहीच जवाबदारी नाही! हे पूर्ण शरीर, जन्मापासून मृत्युपर्यंत सर्व अनिवार्य आहे. त्यात जे राग-द्वेष होतात, तेवढाच हिशोब बांधला जातो. म्हणून वीतरागी काय म्हणतात की वीतराग होऊन इथून निघून जा.

आम्हाला जर कोणी शिव्या दिल्या तर आम्हाला कळते की हे लोक अंबालाल पटेलला, पुद्‌गलाला शिव्या देत आहेत. आत्म्याला तर ते जाणूच शकत नाहीत, ओळखूच शकत नाहीत ना! म्हणून 'आम्ही' (शिव्या) स्वीकारत नाही. 'आम्हाला' 'स्पर्श'च होत नाही, आम्ही वीतराग राहतो! आम्हाला त्याच्यावर राग-द्वेष होत नाहीत. म्हणून एक अवतार किंवा दोन अवतारात हे सर्व संपुष्टात येईल.

वीतराग एवढेच सांगू इच्छितात की कर्मे बाधक नसतात. तुमचे अज्ञान हेच बाधक आहे! शरीर आहे तोपर्यंत कर्मे तर होतच राहतील, पण अज्ञान जाईल तेव्हा कर्मबंधने होणे बंद होईल.



## [ 18 ]

## सहज प्रकृती

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानींची सहज प्रकृती' असे कशाला म्हणतात?

**दादाश्री :** विचार येतात, पण त्यांचा परिणाम होत नाही, तर अशा प्रकृतीला सहज म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** प्रकृती सहज कशा प्रकारे होईल आणि कधी होईल?

**दादाश्री :** चारित्र्य मोहात जर हस्तक्षेप केला नाही तर प्रकृती सहज होत जाते. 'दरअसल' (मूळ) आत्मा तर सहज आहेच, पण प्रकृती देखील सहज झाली तर मोक्ष होईल.

पुरुषांपेक्षा स्त्रिया जास्त सहज असतात आणि येथील स्त्रियांपेक्षा परदेशातील लोक अधिक सरळ असतात आणि त्याहूनही अधिक सहज हे पक्षु-पक्षी, जनावरे असतात.

**प्रश्नकर्ता :** या सगळ्यांची सहज दशा ज्ञानामुळे आहे की अज्ञानामुळे.

**दादाश्री :** त्यांची सहजता अज्ञानामुळे आहे. या गायी-म्हशींची सहजता कशी असते? गाय उड्या मारील, शिंगे मारायला धावेल, तरी पण ती सहज आहे. सहज म्हणजे जो प्रकृती स्वभाव आहे, त्यात तन्मयाकार राहणे, हस्तक्षेप न करणे! पण ते अज्ञानामुळे सहज आहेत!

गायीच्या वासराला जर पकडायला गेलो तर तिच्या डोळ्यात खूप दु:ख असल्यासारखी आग दिसते, पण तरीदेखील ती सहज आहे. या सहज प्रकृतीत आतील मशीन जशी फिरत राहते, तशीच ती पण फिरतच राहते, त्या मशीनप्रमाणे. स्वत:च्या हिताहिताचे तिला अजिबात भान नसते. मशीनने जर आत हित दाखवले तर हित करते, अहित दाखवले तर अहित करते. एखाद्याचे शेत दिसले की त्या शेतात घुसते.

**प्रश्नकर्ता :** त्यात त्या (गायी) काही भाव करत नाहीत ना?

**दादाश्री :** त्यांना तर काही निकाल करायचा नसतोच ना? त्यांचा स्वभावच तसा असतो, सहज स्वभाव! त्यांचा पिल्लू चार-सहा महिने झाल्यानंतर निघून जातो. तर तेव्हा त्यांना काही त्रास होत नाही, ते त्यांच्या पिल्लांची काळजी सहा महिनेच घेतात, आणि आपले लोक तर...

**प्रश्नकर्ता :** मरेपर्यंत घेतात.

**दादाश्री :** नाही, सात पिढ्यांपर्यंत घेतात! गाय स्वत:च्या पिल्लांची काळजी सहा महिन्यांपर्यंत घेते. परदेशी लोक अठरा वर्षांचा होईपर्यंत घेतात. आणि हिंदुस्तानातील लोक तर सात पिढ्यांपर्यंत काळजी घेतात.

अर्थात सहजपणा असा असतो की त्यात अजिबात जागृती नसते. आतून जे कर्म उदयास येते त्या उदयानुसार भटकणे, यालाच सहज दशा म्हणतात. हा भोवरा फिरतो, वर जातो, खाली येतो, किती वेळा असा पडू लागतो, एक इंच उडी पण मारतो, तेव्हा आपल्याला वाटते 'अरे, हा पडला, पडला.' पण तेवढ्यात तो परत फिरू लागतो, याला सहजपणा म्हणतात.

## 'असहज'ची ओळख

सहज प्रकृती म्हणजे जसे गुंडाळले गेले असेल तसाच मग उलगडल्यावर फिरत राहतो, दुसरी कसलीच कटकट नाही.

आणि ज्ञानदशेतील सहजपणा, यात जर आत्मा या सर्व गोष्टींचा

ज्ञाता-द्रष्टा राहिला तरच तो सहज होऊ शकेल. आणि जर त्यात हस्तक्षेप केला तर परत सगळे बिघडून जाईल. 'असे झाले तर चांगले, असे नाही झाले तर चांगले.' असा हस्तक्षेप करू लागला तर मग असहज होईल.

शेठच्या दुकानाचे दिवाळे निघणार असेल, तरी पण जर कोणी भिक्षुक आला तर शेठानी त्याला साडी वगैरे देते, पण शेठ मात्र एक दमडीसुद्धा देत नाही. त्याला बिचाऱ्याला आत 'आता काय होणार, आता काय होणार' अशी काळजी वाटत राहते. याउलट शेठानी आरामात साडी-बिडी देते. याला सहज प्रकृती म्हणतात. आतमध्ये जसा विचार येतो तसे करून ती मोकळी होते. आणि जर शेठच्या मनात विचार आला की चला, दोन हजार रुपये दान करू या, तर तो लगेच मनात म्हणतो आता तर दिवाळे निघायची वेळ आली आहे, आता काय देणार? जाऊ दे! असे म्हणून तो हा विचार उडवून टाकतो.

सहज (व्यक्ती) तर मनात जसा विचार येतो तसे करून टाकते आणि तसे केले नाही तरी (प्रतिष्ठित) आत्म्याची जर दखल नसेल, तर ते सहज आहे.

ज्याला हे 'ज्ञान' दिले असेल, त्याला गाडीत चढल्यावर कुठे जागा आहे आणि कुठे नाही, असा विचार येतो. तिथे सहज राहता येत नाही, तो आत दखल (हस्तक्षेप) करतो. तरीदेखील या 'ज्ञाना'तच राहिलात', 'आज्ञेत' राहिलात तर प्रकृती सहज होईल. मग कसेही असो, लोकांना शंभर शिव्याही देत असेल तरीपण ती प्रकृती सहज आहे, कारण आमच्या आज्ञेत राहिला, त्यामुळे 'स्वत:'ची दखल थांबली, आणि तेव्हापासूनच प्रकृती सहज होऊ लागते. तुम्ही जेव्हा 'आपली' ही सामायिक करत असता, तेव्हाही प्रकृती एकदम सहज असते!

क्रमिक मार्गात शेवटपर्यंत सहज दशा होऊ शकत नाही. तिथे तर, 'याचा त्याग करू, त्याचा त्याग करू, असे करायला हवे, असे करायला नको.' हा त्रास शेवटपर्यंत चालू राहतो.

## सहज ➔असहज ➔सहज

हिंदुस्तानातील लोक असहज आहेत, म्हणून त्यांना चिंता अधिक असते. क्रोध-मान-माया-लोभ वाढले आहेत, म्हणून चिंता वाढली आहे. नाही तर कोणी मोक्षाला जातील असे नाहीत. उलट ते म्हणतील 'आम्हाला काही मोक्षाला जायचे नाही, इथेच खूप चांगले आहे.' या परदेशी लोकांना जर म्हटले 'चला मोक्षाला' तर ते म्हणतील 'नको, नको, आम्हाला मोक्षाची गरजच नाही!'

**प्रश्नकर्ता :** म्हणजे ते सहजतेतून असहजतेत जातात, असेच ना? मग ती असहजता टोकाला पोहोचते, त्यानंतर मग ते मोक्षाकडे वळतात का?

**दादाश्री :** हो, असहजतेत टोकाला जातात. त्यानंतर मग तीव्र दुःख पाहतात-अनुभवतात, तेव्हा मग मोक्षाला जायचा निश्चय करतात. बुद्धी, आंतरिक बुद्धी खूप वाढायला हवी. परदेशी लोकांना फक्त बाह्यबुद्धी असते, ती फक्त भौतिक गोष्टीच दाखवते. नियम काय आहे की जसजशी आंतरिक बुद्धी वाढते, तसतशी तराजूच्या दुसऱ्या पारड्यात आगआग उत्पन्न होते!

**प्रश्नकर्ता :** टोकाच्या असहजतेत पोहोचल्यावर मग सहजतेत येण्यासाठी ते काय करतात?

**दादाश्री :** यात सुख नाही कळल्यावर मग मार्ग शोधतात. पत्नीत सुख नाही, मुलाबाळांत सुख नाही. पैशातही सुख नाही, अशी त्यांची भावना बदलते! आणि हे परदेशी लोक तर पत्नीत सुख नाही, मुलाबाळांत सुख नाही, पैशात सुख नाही, असे कधी बोलणारच नाहीत ना! जेव्हा त्या प्रकारची तीव्र आग-आग होते तेव्हाच ते म्हणतात की आता इथून पळा, आणि अशी जागा शोधा की जिथून मुक्त होता येईल. आपले तीर्थंकर मुक्त झाले आहेत तिकडे चला, आपल्याला हे आता सहनच होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे त्यावेळी त्यांचे भाव बदलायला हवेत. होय ना?

**दादाश्री :** भाव बदलल्याशिवाय तर निराकरण होतच नाही. लोक जिनालयात जातात, साधू महाराजांकडे जातात, तर भाव बदलल्याशिवाय असे कोणी जाईल का?

आजकाल लोकात असहजता कमी झाली आहे, पण मोह वाढला आहे. म्हणून त्यांना कसली पर्वाच नसते.

चंचलता म्हणजेच असहजता. हे परदेशी लोक बागेत बसतील तर अर्धा-अर्धा तास अगदी निवांत, न हलता बसू शकतात. याउलट आपले लोक धर्माच्या जागी पण सतत हलत असतात. कारण आंतरिक चंचलता आहे.

परदेशी लोकांची चंचलता पाव आणि लोणी यात असते. आणि आपल्या लोकांची चंचलता सात पिढ्यांच्या चिंतेत असते!

(प्रतिष्ठित) आत्मा सहज होईल, मग देह सहज होईल. आणि त्यानंतर मग माझ्यासारखे मुक्त हास्य उत्पन्न होईल.

## अप्रयत्न दशा

प्रयत्न केल्यानेच सगळे उलट होत असते. प्रयत्न न करता व्हायला हवे, सहज व्हायला हवे. प्रयत्न केले म्हणून सहज राहिले नाही. सहजपणा निघून गेला.

सहजभावात बुद्धीचा उपयोग होत नसतो. सकाळी उठल्यावर दात घासता, चहा पिता, नाश्ता करता, हे सर्व सहजपणे होत राहते. यात मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार याचा उपयोग करावा लागत नाही. आणि ज्यात यांचा उपयोग करावा लागतो त्या सर्व गोष्टी असहज म्हटल्या जातात.

तुम्हाला एखादी वस्तू हवी असेल आणि समोर जर एखादी व्यक्ती भेटली आणि म्हणाली की, 'घ्या ही वस्तू', तर त्याला सहजपणे मिळाले असे म्हणता येईल.

## सहज म्हणजे अप्रयत्न दशा

**प्रश्नकर्ता :** मोक्ष पण जर सहजपणे येत असेल तर मग त्यासाठी प्रयत्न करण्याची काय गरज?

**दादाश्री :** प्रयत्न कोणी करतच नाही. हे तर फक्त अहंकारच करतात की 'मी प्रयत्न केले.'

**प्रश्नकर्ता :** मी इथे आलो आहे, तर ते प्रयत्न करूनच आलो आहे ना?

**दादाश्री :** ते तर तुम्ही तसे मानता की मी हा प्रयत्न करत आहे. तुम्ही येथे सहजपणेच आला आहात. मी हे जाणतो आणि तुम्ही हे जाणत नाही. तुमचा 'इगोइजम' (अहंकार) तुम्हाला असे दाखवतो की 'मी होतो म्हणून झाले.' खरे तर सर्व क्रिया स्वाभाविकपणेच घडत असतात.

**प्रश्नकर्ता :** तर मग करण्यासारखे काही राहतच नाही, असे आहे का?

**दादाश्री :** करण्यासारखेही काही राहत नाही आणि न करण्यासारखेही काही राहत नाही. जग फक्त जाणण्यायोग्य आहे.

**प्रश्नकर्ता :** जाणायचे कसे?

**दादाश्री :** 'हे काय घडत आहे' ते 'पाहत' राहायचे आणि 'जाणत' राहायचे.

## प्रकृतीचे पृथःकरण

**प्रश्नकर्ता :** प्रकृतीचे 'ॲनॅलिसिस' (पृथःकरण) कसे करावे ते समजावून सांगा.

**दादाश्री :** सकाळी उठल्याबरोबरच आतमध्ये कोणीतरी चहासाठी आरडाओरडा करत आहे, हे समजते की नाही? ती प्रकृती आहे. ती

आणखी काय मागते? तर 'थोडा नाश्ता आणि थोडा चिवडा द्या.' ते पण समजतेच ना? या प्रकारे दिवसभर प्रकृतीकडे पाहत राहिलात तर प्रकृतीचे 'ॲनॅलिसिस' होऊन जाईल. प्रकृतीपासून दूर राहून सगळे पाहिले पाहिजे! हे सर्व कोणी आपल्या मर्जीने करत नाही, प्रकृती करविते.

**प्रश्नकर्ता :** हे तर स्थूल झाले. परंतु आत जे चालले असते ते कसे पाहायचे?

**दादाश्री :** ही इच्छा कोणाला झाली, ते आपण पाहायचे. ही इच्छा 'माझी' आहे की प्रकृतीची ते आपण पाहायचे. कारण आतमध्ये दोनच गोष्टी आहेत.

**प्रश्नकर्ता :** वेगळे होऊन 'पाहणे' याचा सराव करावा लागेल का?

**दादाश्री :** एकच दिवस जरी केलेत तरी हे सर्व जमेल असे आहे. हे सर्व फक्त एक दिवस करायची गरज आहे. इतर सर्व दिवशी त्याचेच पुनरावर्तन होत असते.

म्हणून आम्ही एक रविवार लगाम सोडून द्यायचा प्रयोग करायला सांगतो. त्यामुळे 'आपण हा लगाम पकडला आहे, म्हणूनच हे सगळे (नीट) चालू आहे' असे जे आपल्याला मनात वाटत असते ते निघून जाईल.

**प्रश्नकर्ता :** लगाम पकडला असे म्हणालात, म्हणजे तो अहंकार झाला ना?

**दादाश्री :** हो, पण तो डिस्चार्ज अहंकार आहे. अहंकाराला आपण ओळखले पाहिजे आणि हे सर्व कोणत्या आधारामुळे चालू आहे हे पण जाणून घेतले पाहिजे. तरी पण अजून हे सगळे माझ्यामुळे चालू आहे, असा उलट (चुकीचा) भाव मनात येतोच! म्हणून जर असा प्रयोग केला तर तो बाहेर निघून जाईल.

आता हा मुलगा जर आपल्याला म्हणाला की 'मी तुझा बाप आहे' तर त्या क्षणी आपल्याला असेच वाटते की 'तोच बोलत आहे' आणि आपल्याला राग येतो. मुलगा कधी काय बोलेल, ते काय सांगता येत नाही. अर्थात वाणी ही रेकॉर्ड आहे, ती बोलणाऱ्याचीही शक्ती नाही, आणि आपलीही शक्ती नाही. ही तर परकी वस्तू फेकली जात आहे, अशी जागृती राहायला हवी.

याच प्रकारे पुढे जात जात जेव्हा मी नगीनभाईबद्दल बोलेन तेव्हा माझ्या मनात नगीनभाई 'शुद्धात्मा' आहेत, ही जाणीव राहिली पाहिजे. एखादे पुस्तक वाचत असताना त्यात 'मंगला देवींनी असे केले, आणि मंगलादेवींनी तसे केले', असे वाचताना मंगलादेवींचा आत्मा दिसला पाहिजे.

या प्रकारे जेवढे जमेल तेवढे करा. असे नाही की आजच्या आजच सर्व पूर्ण व्हायला हवे. यात 'क्लास' आणायचा नाही, पण 'पोसिबल' (शक्य) करायचेच आहे. हळूहळू सगळ्यांबरोबर शुद्ध प्रेमस्वरूप व्हायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** शुद्ध प्रेमस्वरूप म्हणजे कसे राहायला हवे?

**दादाश्री :** एखादा माणूस आता शिवी देऊन गेला आणि नंतर तो परत तुमच्याकडे आला, तरी तुमचे प्रेम जाता कामा नये, त्याला शुद्ध प्रेम म्हणतात. फुले वाहिली तरी वाढत नाही. वाढते-कमी होते ही सर्व आसक्ती आहे. याउलट जे वाढत नाही आणि कमी होत नाही ते शुद्ध प्रेम असते.

## प्रकृतीवर कंट्रोल कोण करते?

**प्रश्नकर्ता :** प्रकृतीवर कंट्रोल राहत नाही. पण शुद्धात्माभाव बरोबर राहतो.

**दादाश्री :** कंट्रोल करण्याचे काम तर पोलिसाला सोपवावे! प्रकृतीवर कंट्रोल करायचा नसतो. कंट्रोल करणे हे शुभाशुभ मार्गात

असते, तुमच्या प्रकृतीवर आता कंट्रोल कोण आणणार? तुम्ही मालकच नाहीत. तुम्ही आता 'चंदुभाई' नाहीत आणि जे सर्व करत आहे ती तर 'व्यवस्थित शक्ती' करत आहे. तर आता तुम्ही त्याला कंट्रोल कसे करणार?

**प्रश्नकर्ता :** जे दोष दिसत आहेत ते निघून जातील ना?

**दादाश्री :** जे दिसू लागले आहेत ते तर गेलेच समजा! जगाला स्वत:चे दोष दिसतच नाहीत. इतरांचे दोषच दिसतात. तुम्हाला तुमचे दोष दिसतात ना?

**प्रश्नकर्ता :** स्वत:चे दोष दिसतात, परंतु ते टाळता येत नाहीत.

**दादाश्री :** नाही, असे काही करूच नका. आपल्याला असे करायचेच नाही. हे विज्ञान आहे. तुम्ही तर 'चंदुभाई' काय करत आहेत हे पाहत राहा. बस, तुम्हाला एवढेच करायचे आहे. तुम्हाला दुसरे कोणतेच काम नाही. तुम्ही 'चंदुभाई'चे उपरी आहात. 'चंदुभाई' तर 'व्यवस्थित'च्या ताब्यात आहे. 'व्यवस्थित' प्रेरणा देते आणि चंदुभाई भोवऱ्यासारखा फिरतो! आणि चंदुभाईकडून जर खूप मोठी चूक झाली तर तुम्ही चंदुभाईला सांगावे, चंदुभाई असे कराल तर चालणार नाही. एवढेच तुम्ही सांगा!

## प्रकृतीचे सतावणे

**प्रश्नकर्ता :** मोक्ष अनुभवात येतो पण प्रकृती आपला स्वभाव सोडत नाही. त्यामुळे वीट येतो.

**दादाश्री :** प्रकृती आपला स्वभाव सोडणारच नाही ना? घरासमोर सरकारने चारीबाजूंची गटारे उघडली तर? गटार स्वत:चा गुण तर दाखवणारच ना?

**प्रश्नकर्ता :** हो, दाखवणार.

**दादाश्री :** त्यावेळी तुम्हाला कोणत्या दृष्टीत राहावे लागेल?

**प्रश्नकर्ता :** ज्ञाता-द्रष्टा.

**दादाश्री :** ऐषोआराम करायला गेलात तर तुम्हाला वास येईल, म्हणून ज्ञाता-द्रष्टाच रहा. प्रकृतीत जर गटारे-बिटारे आली तर तेव्हा जागृत राहावे.

**प्रश्नकर्ता :** 'आम्ही' 'शेजाऱ्याला' 'पाहात' राहिलो आणि त्याला योग्यमार्गावर वळवण्याचा प्रयत्न केला नाही, तर ते कसे चालेल? त्याला दंभ म्हटले जाईल ना?

**दादाश्री :** आपल्याला वळवण्याचा अधिकारच नाही. दखल (ढवळाढवळ) करायची नाही. त्याला कोण चालवते, ते तुम्हाला माहीत आहे का? आपण त्याला चालवत पण नाही आणि वळवत पण नाही. तो 'व्यवस्थित'च्या ताब्यात आहे. मग 'दखल' करण्यात काय अर्थ आहे? जो आपला 'धर्म' नाही, त्यात दखल करायला गेलात तर परधर्म उत्पन्न होईल.

**प्रश्नकर्ता :** या जन्मातच ज्ञानामुळे आमचे 'चुकीचे' वर्तन बंद होईल की नाही?

**दादाश्री :** बंद होऊही शकते! 'ज्ञानी पुरुषां'च्या सांगण्यानुसार वागलात तर पाच-दहा वर्षात होऊ शकेल. अरे, एका वर्षात देखील होऊ शकेल! 'ज्ञानी पुरुषां'ना तर तिन्ही लोकांचे नाथ असे म्हटले जाते. तिथे काय होऊ शकत नाही? काही बाकी राहील का?

या दादांजवळ बसून सर्व काही समजून घ्यावे लागेल. सत्संगासाठी वेळ काढावा लागेल.

*'अमे केवळज्ञान प्यासी,*
*दादाने काजे आ भव देशुं अमे ज गाळी...'* - नवनीत

(आम्ही केवळज्ञानासाठी तहानलेलो आहोत, हा जन्म आम्ही दादांसाठीच घालवू...)

ह्यांना कसली तृषा आहे?

केवळज्ञानाचीच तृषा आहे. आमच्यात आता इतर कुठलीही तृषा राहिली नाही. तेव्हा आपण त्याला सांगावे, 'आतमध्ये तृषा आहे, तिची खोलवर तपासणी तरी कर.' मग तो म्हणेल, ती तर प्रकृतीमध्ये आहे, माझ्यात नाही. प्रकृतीमध्ये तर कोणाची चार आणे असते, कोणाची आठ आणे तर कोणाची बारा आणे असते, तर काय बारा आणे असलेल्याला भगवंत शिक्षा करतील? नाही, ते तर म्हणतील 'नाही रे बाबा, तुझी जेवढी कमतरता राहिली आहे तेवढी तू पुरी कर.'

आता प्रकृती आहे तोपर्यंत तिच्या सर्व कमतरता पूर्ण होतच जातील, जर ढवळाढवळ केली नाही तर प्रकृती स्वत:च्या कमतरता पूर्ण करणारच आहे. प्रकृती स्वत:च्या कमतरता स्वत:च पूर्ण करत असते. आता जर यात 'मी करतो' असे म्हटले तर मात्र ढवळाढवळ होईल!

'ज्ञान' घेतलेले नसेल तर प्रकृतीचे दिवसभर उलटच चालू असते. आणि 'ज्ञान' घेतल्यानंतर मात्र सरळ चालत राहते. 'तू समोरच्याला खडेबोल सुनावले तरी पण आतून म्हणेल, 'नाही, असे करू नये. सुनावण्याचा विचार आला त्याबद्दल प्रतिक्रमण कर.' आणि ज्ञानापूर्वी तर तू सुनावूनही द्यायचास आणि वर अजून जास्त सुनावायला हवे होते असेही म्हणायचास.

म्हणजेच आता आत जे चालू आहे ते समकित बळ आहे! जबरदस्त समकित बळ आहे. ते रात्रं-दिवस सतत काम करत असते.

**प्रश्नकर्ता :** ते सर्व काम प्रज्ञा करते?

**दादाश्री :** हो, ते प्रज्ञा काम करत असते. प्रज्ञा मोक्षाला नेण्यासाठी काम करत असते, ओढून-ताणून पण मोक्षाला घेऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, प्रकृतीचा फोर्स कित्येकवेळा खूप येतो.

**दादाश्री :** यात तर प्रकृती जितकी भारी तितका फोर्स जास्त असतो.

**प्रश्नकर्ता :** पण त्याच वेळी 'ज्ञान' पण तेवढेच जोरदार चालत असते.

**दादाश्री :** हो, 'ज्ञान' पण जोरदार चालते. हे 'अक्रम विज्ञान' आहे, त्यामुळे कसेही करून, मारून-लढून देखील जाग्यावर आणील!

## करारांतून मुक्त

**दादाश्री :** 'मी कर्ता आहे' असे आता तुम्हाला वाटते का?

**प्रश्नकर्ता :** स्वप्नातही नाही.

**दादाश्री :** अहो, काय सांगता? कर्तेपणा गेला म्हणजे ममता गेली, आपली स्वतःची ममता गेली, पण पूर्वी जे करार केले आहेत त्यामुळे समोरच्यांची ममता अजून शिल्लक आहे. समोरच्या व्यक्तींबरोबर जे करार केले होते, ते करार पूर्ण तर करावेच लागतीलच ना? त्या व्यक्तीने जर सोडून दिले तर हरकत नाही, परंतु हिशोब चुकता केल्याशिवाय कोण कसे सोडील?

असा 'रियल मार्ग' क्वचितच असतो. तिथे संपूर्ण पद प्राप्त होते. तिथे स्वातंत्र्य, सच्ची आझादी मिळते. परमेश्वर पण उपरी (वरिष्ठ, बॉस) नाही, असे स्वातंत्र्य मिळते. बायको उपरी असली तरी हरकत नाही, पण परमेश्वर मात्र उपरी असताच कामा नये! बायको तर ती जिवंत असेपर्यंतच उपरी राहील पण परमेश्वर तर कायमच उपरी बनून राहील ना?

**प्रश्नकर्ता :** मोक्ष झाला नाही तर मग परत यावे लागेल ना?

**दादाश्री :** यावे लागले तरी एक-दोन जन्मांपुरतेच! पण मुख्य गोष्ट काय आहे की आपल्या बाजूचे करार पूर्ण व्हायला हवेत. त्यांच्या बाजूचे करार बाकी राहिले तरी चालेल, त्यांच्या बाजूचे करार ते पूर्ण करतील. परंतु तुमच्या बाजूचे, बायको-मुलांचे हिशोब तर चुकवावेच लागतील ना?

हा सारा आपला करारी माल आहे, त्यात तुमचा शुद्ध उपयोग निघून जात नाही. जसजसा ह्या मालाचा समभावाने निकाल होत जाईल, तसातसा तुमचा संयम वाढत जाईल. संयमालाच पुरुषार्थ म्हटले आहे.

जसजसा संयम वाढेल, तसातसा त्याचा निकाल पण लवकर लवकर होत जाईल. 'ऑटोमॅटिक' (आपोआप) सर्व काही होत होत 'केवळज्ञाना'पर्यंत पोहोचाल.

'तुम्हाला' काहीही करायचे नाही. तुम्ही फक्त निश्चय करायचा आहे की 'मला दादांच्या आज्ञा पाळायच्या आहेत.' आणि जरी पाळता आल्या नाहीत तरी त्याची काळजी करत बसायचे नाही. तुम्हाला तुमची सासू सारखे रागावत असेल तर त्या दिसण्यापूर्वीच तुम्ही मनातल्या मनात 'मला दादांच्या आज्ञा पाळायच्या आहेत आणि यांच्याबरोबर 'समभावाने निकाल' करायचाच आहे.' असा दृढ निश्चय करायचा आहे. मग जरी समभावाने निकाल झाला नाही तरी तुमच्यावर जोखीम राहणार नाही. तुम्हाला आज्ञा पाळण्याचा अधिकार आहे, त्यासाठी निश्चय करण्याचा अधिकार आहे, त्याच्या परिणामाचे तुम्ही अधिकारी नाही. मला आज्ञा पाळायच्याच आहेत, असा तुमचा निश्चय मात्र असला पाहिजे. मग त्या पाळल्या गेल्या नाहीत तर त्याबद्दल तुम्ही खेद करत बसायचे नाही. पण मी सांगितल्याप्रमाणे प्रतिक्रमण करायला हवे. अतिक्रमण केले म्हणून प्रतिक्रमण करा. हा इतका सरळ, साधा आणि सुगम मार्ग आहे, तो नीट समजून घ्यायचा आहे!



# [ 19 ]

## दु:ख देऊन मोक्षाला जाता येत नाही

**प्रश्नकर्ता :** मनुष्य म्हणून आपला धर्म काय आहे?

**दादाश्री :** कोणत्या प्रकारे आपल्या मन-वचन-कायेने या जगातील लोकांना मदत करता येईल (असा प्रयत्न करणे) हा आपला धर्म आहे. लोकांची काही कामे करून द्यावीत, वाणीने कोणाला चांगली समज द्यावी, बुद्धीने समजवावे, कोणाला दु:ख होणार नाही असे वागावे, हा आपला धर्म आहे. कोणत्याही जीवाला दु:ख होऊ नये, यात जर सर्व जीवांबद्दल हे शक्य होत नसेल तर निदान माणसांच्या बाबतीत तरी असे करण्याची आपली प्रतिज्ञा असली पाहिजे. आणि जर माणसांसाठी अशी प्रतिज्ञा यापूर्वीच केली असेल तर मग ही प्रतिज्ञा सर्वच जीवांसाठी केली पाहिजे की मन-वचन-कायेने कोणालाही दु:ख होऊ नये. एवढाच धर्म समजायला हवा.

इथे तर लग्न करून सासरी जाते तेव्हा सासू तिला दु:ख देते आणि ती सासूला दु:ख देते. मग त्या नरक गतीची कर्मे बांधतात. सासूला पण वाटते की मुलगा गमवायचा असेल तरच त्याचे लग्न करावे.

तुमच्या सर्व मनोकामना पूर्ण झाल्या आहेत का?

**प्रश्नकर्ता :** आपले ज्ञान घेतल्यानंतर असे वाटते की जसा गंगेचा पवित्र झरा वाहत असतो, तसेच आपण सुद्धा वाहत राहावे.

**दादाश्री :** हो, वाहत राहावे. कोणावर परिणाम होणार नाही, कोणाला दु:ख होणार नाही, अशा प्रकारे. कोणालाही दु:ख देऊन आपण मोक्षाला जाऊ शकत नाही, असे होऊच शकत नाही. आपल्याकडून जर कोणाला दु:ख दिले गेले असेल तर तो आपण जिथून वाहत असू तिथे येऊन दोरखंड टाकून आपल्याला पकडेल आणि म्हणेल थांबा, आणि जर सर्वांना सुख दिले असेल तर सर्वजण जाऊ देतील. चहा-पाणी पाजले तरी जाऊ देतील, पान-सुपारी दिली तरी जाऊ देतील, अहो, एखादी लवंग जरी दिली तरी जाऊ देतील. लोकांना आशा वाटते की काहीतरी मिळेल. लोकांनी आशा ठेवली नाही तर तुम्हाला मेहेरबान कसे म्हणावे? मोक्षाला जाणाऱ्यांना मेहेरबान म्हणतात. म्हणजेच आपण मेहेरबानी दाखवत दाखवत जावे.

**प्रश्नकर्ता :** लोकांना आशा वाटते. पण आपल्याला आशा बाळगण्याची काय गरज?

**दादाश्री :** आपण आशा बाळगू नये. त्यांना पान-सुपारी किंवा असे काही तरी देऊन चालू लागावे. नाहीतर हे लोक परत उलट बोलून थांबवतील. म्हणून आपण त्यांना समजावून-उमजावून आपले (मोक्षाचे) काम करून घ्यावे. लोक असेच मोक्षाला जाऊ देणार नाहीत. लोक म्हणतील 'इथे काय दु:ख आहे की तिकडे चालला आहात? इथे आमच्याबरोबरच मजा करा ना!'

**प्रश्नकर्ता :** पण आपण लोकांचे ऐकू तर ना?

**दादाश्री :** ऐकले नाहीत तरी ते उलट वागतील. त्यांना चारही दिशा मोकळ्या आहेत पण तुम्हाला एकच दिशा मोकळी आहे. म्हणून त्यांना काय? ते उलट वागू शकतात, पण तुम्हाला मात्र तसे करायचे नाही.

सगळ्यांना राजी (खुश) ठेवायचे आहे. राजी करून निघून जायचे आहे. एखादा तुमच्यासमोर टक लावून पाहत असेल तर त्याला 'काय साहेब, काय म्हणता?' असे म्हटलात तर तो पुढे जाऊ देईल. तो टक

लावून पाहत असेल आणि तुम्ही काहीच बोलला नाहीत तर तो मनात म्हणेल हा तर फारच 'आकडू' आहे. मग तो धुमाकूळ घालेल.

**प्रश्नकर्ता :** आपण जर समोरच्याला राजी करायचा प्रयत्न केला तर त्याच्याबद्दल आपल्या मनात राग (मोह, आसक्ती) निर्माण होणार नाही का?

**दादाश्री :** तसे राजी करायचे नाही. पोलिसाला कसे राजी ठेवता? पोलीसाबद्दल राग निर्माण होतो का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** राजी ठेवणे, ते सुद्धा सगळ्यांनाच राजी ठेवण्याची गरज नाही. आपल्या वाटेत जर कोणी आडवे आले तर त्याला आंजारून-गोंजारून आपले काम पार पाडायचे आहे. लोकांना तर आडवे यायला वेळच लागत नाही. त्यातल्या एखाद्याचा जर तुम्हाला धक्का लागला तर त्याबद्दल तक्रार करायला जाऊ नका, पण त्याला समजावून-उमजावून काम उरकून घेण्यासारखे आहे.

## कर्तव्य बजावा पण सावध राहून

**प्रश्नकर्ता :** नोकरीच्या कारणामुळे जर कोणाबरोबर कषाय झाले, किंवा करावे लागले, तर त्यामुळे आत्म्यावर काही परिणाम होतो का?

**दादाश्री :** नाही, पण नंतर पश्चात्ताप होतो ना?

**प्रश्नकर्ता :** कर्तव्य बजावण्यासाठी जर कषाय करावे लागले तर काय करावे?

**दादाश्री :** तुमचे म्हणणे बरोबर आहे. कर्तव्य बजावताना देखील पूर्णपणे संयम राखणे, इतका संयम ठेवणे जमत नाही. तरीही जर कोणाला खूप दुःख झाले असेल तर मनात असे वाटले पाहिजे की अरे, आपल्याकडून असे झाले नाही तर चांगले.

**प्रश्नकर्ता :** पण कर्तव्य तर पार पाडावेच लागते ना? हे पोलिस काय करतात?

**दादाश्री :** कर्तव्य तर पार पाडावेच लागते, त्याशिवाय चालणारच नाही. दोन–चार चोर फिरत असतील तर पोलिसांना त्यांना पकडावेच लागेल, त्याशिवाय चालणारच नाही. तो व्यवहार आहे. पण त्यात दोन भाव असतात, एक म्हणजे कर्तव्य बजावताना क्रौर्य असता कामा नये. पूर्वी जसा क्रूर भाव असे तसा आता राहता कामा नये. आपला आत्मा (प्रतिष्ठित आत्मा) बिघडणार नाही असे वागले पाहिजे. कर्तव्य तर पार पाडावेच लागेल. गुरखा असेल तर त्यालाही कर्तव्य पार पाडावेच लागते पण त्याचवेळी मनात 'आपल्या वाट्याला असे काम नाही आले तर बरे', असा पश्चात्ताप वाटायला हवा.



# [ 20 ]

## अनादिचा अध्यास

**प्रश्नकर्ता :** जेव्हा जेव्हा आम्ही आमच्या व्यवहारात आणि आचरणात येतो तेव्हा तेव्हा 'मी शुद्धात्मा आहे' की 'मी चंदुभाई आहे' हे समजतच नाही.

**दादाश्री :** हे समजून घ्यायची आवश्यकता आहे. तुम्ही 'चंदुभाई' पण आहात आणि 'शुद्धात्मा' पण आहात. 'रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंट'ने तुम्ही 'चंदुभाई' आहात आणि 'रियल व्ह्यू पॉइंट'ने तुम्ही 'शुद्धात्मा' आहात. 'रिलेटिव्ह' सर्व विनाशी आहे. विनाशी भागात तुम्ही चंदुभाई आहात! विनाशी व्यवहार चंदुभाईचा आहे आणि अविनाशी तुमचा (शुद्धात्म्याचा) आहे. आता 'ज्ञान' प्राप्तीनंतर तुमची जागृती अविनाशीत असते.

समजण्यात जर थोडी उणीव असेल तर कधी कधी कोणाकडून अशी चूक होते. सगळ्यांकडून होत नाही.

तुम्ही फक्त चंदुभाईच नाहीत. तुम्ही कुठे नोकरी करत असाल तर तिथे तुम्ही त्याचे नोकर आहात. म्हणून तुम्हाला नोकराची सर्व कर्तव्ये पार पाडावीत. कायमसाठी तर कोणी नोकर नसतोच ना.

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमणे इतकी जास्त असतात की एक काम पूर्ण व्हायच्या आत दुसरे तयारच असते. तिथे जर प्रतिक्रमण करू लागलो तर अतिक्रमणाचा जोर एवढा असतो की प्रतिक्रमण 'पेन्डिंग' (स्थगित) ठेवावे लागते.

**दादाश्री :** अतिक्रमणे तर ढीगभर होत राहतात. त्या सर्व ढिगांचा जर समभावाने निकाल केलात की मग हळूहळू त्यांचा जोर कमी होईल. हे सर्व तर पुद्‌गल आहे. पुद्‌गल म्हणजे पूर्वी जे पूरण केले आहे ते आता गलन होत आहे. (चार्ज झालेले ते आता डिस्चार्ज होत आहे) त्याचा समभावाने निकाल करा.

म्हणजे तुम्ही काही अपेक्षेने चंदुभाई आहात, आणि काही अपेक्षेने शेठजी पण आहात, काही अपेक्षेने सासरे पण आहात, पण तुम्हाला तुमची लिमिट माहीतच असते ना की कोणत्या अपेक्षेने तुम्ही सासरे आहात? नाही तर त्याला वाटेल तुम्ही कायमसाठी त्याचे सासरे आहात. तेव्हा तुम्ही म्हणाल 'नाही, कायमचा सासरा थोडेच कोणी असतो?'

तुम्ही तर 'शुद्धात्मा' आहात आणि 'चंदुभाई' हे तर *वळगण* (वेढा, बंधन) आहे. पण अनादिकाळापासून हाच अध्यास आहे, म्हणून प्रत्येक वेळी तुम्ही तिकडे खेचले जाता. डॉक्टरने सांगितले असेल की उजव्या हाताचा उपयोग करू नका, तरी पण तुमचा उजवा हातच ताटात जातो! पण 'ही' जागृती अशी आहे की लगेच ही चूक झाली असे लक्षात येते. आत्मा हीच जागृती आहे. आत्मा हेच ज्ञान आहे. पण पूर्वीची अजागृती येते आणि अजागृतीमुळे काही काळ मारा खावा लागतो.

**प्रश्नकर्ता :** हा मुलगा माझा आहे, ही मुलगी माझी आहे, असे वाटते पण नंतर त्याला असेही वाटते की 'मी शुद्धात्मा आहे आणि हे तर माझे नाही, माझे नाही.'

**दादाश्री :** आत गुणाकार होतो, मग लगेच त्याचा भागाकार करून टाकावा. आतमध्ये अनेक प्रकारचे 'कारक' आहेत, फक्त एक-दोनच नाहीत. ही सर्व तर माया आहे. म्हणून ती आपल्याला तऱ्हेतऱ्हेच्या गोष्टी दाखवेल, पण आपण त्या सर्व ओळखल्या पाहिजेत. 'हा माझा हितेच्छु आहे, हा शत्रु आहे', या प्रकारे सर्वांना ओळखता आले पाहिजेत.

**प्रश्नकर्ता :** आमच्या आत तर चांगल्या-वाईट अनेक प्रकारच्या टोळ्या एकत्र आहेत. ते तर रोजचेच आहे.

**दादाश्री :** कोणताही भाव आपल्या आत उत्पन्न झाला आणि त्यामुळे जर वादळ उठले तर आपण तिथे थांबावे. वादळ उठले की लगेच कळते की आपण चुकीच्या मार्गाने चाललो आहोत. तर तेव्हा जिथे होतो तिथून लगेचच 'मी शुद्धात्मा आहे' असे म्हणून पळून जावे. निराकूळतेतून थोडी जरी व्याकूळता उत्पन्न झाली तर समजावे की 'ही आपली जागा नाही' म्हणून लगेच तिथून पळून जावे.

**प्रश्नकर्ता :** माझ्याकडून हीच चूक होते. जेव्हा आकूळता–व्याकूळता होते तेव्हा मी पळून जात नाही, उलट समोर बसून राहतो.

**दादाश्री :** सध्या बसण्यासारखे नाही. पुढे गेल्यावर बसा. अजून पूर्णपणे शक्ती आलेली नाही, शक्ती आल्याशिवाय बसाल तर मार खाल. 'आपला' प्रदेश तर निराकूळतेचा! जिथे किंचितही आकुळता–व्याकुळता आहे, तिथे कर्मबंधने होतील. निराकूळतेने कर्मे बांधली जाणार नाहीत. व्याकूळ होऊन या संसारात कोणताच फायदा होणार नाही. आणि जे घडले ते तर 'व्यवस्थित' आहे. म्हणून निराकूळतेत राहिले पाहिजे. जोपर्यंत शुद्ध उपयोग राहील, तोपर्यंत निराकूळता राहील.

आमची बुद्धी लहानपणी अशी होती. समोरच्याबद्दल त्वरित अभिप्राय बनवत असे. कोणाच्याही बाबतीत लगेच अभिप्राय तयार करून मोकळी. म्हणून तुमचे काय होत असेल हे मी समजू शकतो.

खरे तर कोणाबद्दलही अभिप्राय बाळगावे असे हे जग नाहीच मुळी. कोणाबद्दलही अभिप्राय बाळगणे हेच आपले बंधन आहे आणि कोणाबद्दलही कसलेच अभिप्राय नसणे म्हणजेच आपला मोक्ष. आपले कोणाशी काय देणेघेणे? ते त्यांची कर्मे भोगत आहेत, आपण आपली कर्मे भोगत आहोत. सगळेच आपली आपली कर्मे भोगत आहेत. त्यात कोणाचेच काही देणेघेणे नाही. म्हणून कोणाबद्दल अभिप्राय बनविण्याची गरजच नाही.

**प्रश्नकर्ता :** पण आमचे अभिप्राय कुठे बनतात? तर व्यवहारात बनत असतात. हे तर असे होते की मला माहीत पण नसते आणि (कोणीतरी) म्हणतो 'मी या चंदुभाईला तुम्हाला 5000 रुपये द्यायला

सांगितले होते, ते त्याने तुम्हाला दिले ना?' पण तेव्हा माझ्या नावाने तो असे खोटे बोलून आला आहे हे मला माहीतच नसते. म्हणून मग अभिप्राय बनते की हा खोटे बोलत आहे, खोटारडा आहे.

**दादाश्री :** भगवंतांनी तर इथपर्यंत सांगितले आहे की समजा काल एखाद्याने तुमच्या खिशातून शंभर रुपये पळवले आणि तुम्हाला अंदाजाने किंवा आसपासचे वातावरण पाहून ते कळले. आणि मग परत दुसऱ्या दिवशी जरी ती व्यक्ती आली तरी पाहताक्षणीच तिच्यावर शंका घेणे हा गुन्हा आहे.

**प्रश्नकर्ता :** आणि जर तो खोटारडा आहे असा अभिप्राय राहिला तर तो पण गुन्हा आहे का?

**दादाश्री :** शंका केली, की लगेच गुन्हा उत्पन्न झाला. भगवंत काय म्हणतात, काल त्याच्या कर्मोदयामुळे तो चोर होता, आणि आज कदाचित तो चोर नसेलही, हे सर्व तर उदयानुसार घडत असते.

**प्रश्नकर्ता :** पण मग आम्ही कसे वागावे? आम्ही अभिप्राय ठेवला नाही तर कदाचित त्याला सवयच लागेल. त्याला वाटेल की 'हे तर काहीच बोलत नाहीत, बरे आहे, मग तर रोज रोज असे करत जायला हरकत नाही.'

**दादाश्री :** नाही, तुम्ही तर अभिप्राय न बनवता सावध राहायला हवे. तुम्ही जर पैसे खिशात ठेवत असाल आणि तुम्हाला कळले की त्याने खिशातले पैसे पळवले आहेत, तर कोणाबद्दल अभिप्राय बनू नये यासाठी तुम्ही पैसे ठेवायची जागा बदला.

**प्रश्नकर्ता :** तसे नाही, हे तर एखाद्याचा कोणी देणेकरी असतो, तेव्हा तो त्या देणेकऱ्याला असे म्हणतो की 'मी तर चंदुभाईंना पैसे द्यायला सांगितले होते आणि त्यांनी तुम्हाला पैसे पाठवून दिले आहेत.' तेव्हा वाटते 'अरे, मी तुला भेटलो नाही, तू मला भेटला नाहीस आणि इतके खोटे कसे बोलतोस?' माझ्यासोबत असे घडत असते, तर तेव्हा कसे वागावे?

**दादाश्री :** हो, तो असे खोटेही बोलतो, पण तो असे का बोलतो? इतर कोणाचे नाही आणि तुमचेच नाव का घेतले? म्हणजेच कुठल्या ना कुठल्याप्रकारे तुम्ही गुन्हेगार आहात. तुमच्या कर्माचा उदय हाच तुमचा गुन्हा आहे.

**प्रश्नकर्ता :** पण अशा ठिकाणी मी कसे वागावे?

**दादाश्री :** राग-द्वेषामुळे हे जग उभे आहे. याचे मूळच राग-द्वेष आहे. राग-द्वेष का होतात? तर कोणाच्या व्यवहारात ढवळाढवळ केली की राग-द्वेष उत्पन्न होतात. तो घरातून काही चोरून घेऊन गेला असेल, तरी पण जर तुम्ही त्याला चोर मानलेत तर तुमच्यात राग-द्वेष उत्पन्न झाला. कारण 'हा चोर आहे' असे तुम्ही मानता आणि ते तर लौकिक ज्ञान आहे. पण अलौकिक ज्ञान तसे नाही. अलौकिकमध्ये तर फक्त एवढेच म्हणतात की हा तर तुझ्याच कर्माचा उदय आहे. तुझ्या कर्माचा उदय आणि त्याच्या कर्माचा उदय एकत्र आला म्हणून तो घेऊन गेला. त्यात तू 'हा चोर आहे' असा अभिप्राय का बनवत आहेस?

आम्ही तर तुम्हाला सांगतो की सावधपणे चाला, पिसाळलेला कुत्रा घरात शिरेल असे वाटले तर ताबडतोब आपला दरवाजा बंद करून घ्या. परंतु जर तुम्ही असे म्हणाल की हा तर पिसाळलेलाच आहे, तर याला अभिप्राय बनवला असे म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** अहो दादा, कुत्रा घरात शिरेल म्हणून दरवाजा बंद करण्याऐवजी मी तर उलट माझी ताकद दाखवतो. आणि दरवाजा बंद करताना दरवाज्याचीही फजिती करतो आणि कुत्र्याचीही फजिती करतो!

**दादाश्री :** हे सर्व लौकिक ज्ञान आहे. भगवंतांचे अलौकिक ज्ञान तर म्हणते की कोणावर आरोप पण करू नका, आणि कोणाबद्दल अभिप्राय पण बनवू नका. कोणासाठी कसलेही भाव करूच नका. 'जग निर्दोषच आहे!' असे समजाल तर सुटाल. जगातील सर्व जीव निर्दोषच आहेत आणि केवळ मीच एकटा दोषी आहे, माझ्या दोषांमुळेच मी बंधनात आहे, अशी दृष्टी निर्माण झाली तरच मुक्त होता येईल.

भगवंतांनी जग निर्दोष पाहिले, मला पण कोणी दोषी दिसत नाही. कोणी हार घालो किंवा कोणी शिव्या देवो, तरी कोणीही दोषी नाही, जग निर्दोषच आहे. मायावी दृष्टीमुळेच सर्व दोषी दिसतात. हा केवळ दृष्टीचाच दोष आहे.

दानशूर व्यक्ती दान देतात, तर लोक म्हणतात 'हे तर दान देत आहेत. हे सर्व किती चांगले आहेत?' यावर भगवंत म्हणतात, यात तू कशाला खुश होतोस? तो स्वतःच्या कर्मांचा उदय भोगत आहे. आणि दान घेणारे पण स्वतःच्या कर्मांचा उदय भोगत आहेत. तू उगाचच याबद्दल बोलून या भानगडीत का पडतोस? चोरी करणारे चोरी करत आहेत. तेही त्यांच्या कर्मांचा उदय भोगत आहेत. पूर्ण जग आपापल्या कर्मांनाच भोगत असते.

आम्ही तुम्हाला जेव्हापासून पाहिले, ओळखले तेव्हापासून आमचा अभिप्राय कधीही बदलला नाही. मग तुम्ही असे फिरा (वागा) किंवा तसे फिरा, ते सर्व तुमच्या कर्माच्या उदयाधीन आहे.

जोपर्यंत स्वतःचे दोष दिसत नाहीत आणि दुसऱ्यांचेच दोष दिसत राहतात, अशी दृष्टी जोपर्यंत आहे तोपर्यंत संसार उत्पन्न होतच राहील. आणि जेव्हा इतरांचा एक पण दोष दिसणार नाही आणि स्वतःचे सर्व दोष दिसतील, तेव्हा समजावे की आता मोक्षाला जाण्याची तयारी सुरू झाली. बस, फक्त एवढाच दृष्टीबदल आहे.

दुसऱ्यांचे दोष दिसणे, ही आपल्या दृष्टीचीच चूक आहे. कारण हे सर्वच जीव स्वतःच्या सत्तेत नाहीत, परसत्तेत आहेत. स्वतःच्या कर्मांच्या आधीन आहेत. निरंतर कर्मेच भोगत आहेत! यात कोणाचाच दोष नसतो. ज्याला हे समजेल तो मोक्षाला जाईल. नाही तर जो वकिलांसारखे समजत असेल तर तो इथल्या इथेच राहील. येथील न्याय तपासत बसला तर इथेच राहील.



## [ 21 ]

## चिकट 'फाइल्स्'मध्ये समभाव

**प्रश्नकर्ता :** संसारातील सर्वात मोठे कार्य या फाइल्स्चा 'समभावाने निकाल' करणे हेच आहे ना?

**दादाश्री :** हो, या 'फाइल्स्'चीच भानगड आहे. या फाइल्स्मुळेच तुम्ही अडकून राहिले आहात. या फाइल्स्नीच तुम्हाला अडवले आहे. दुसरे कोणीही अडवणारे नाही. इतर सर्व ठिकाणी तर तुम्ही वीतरागच आहात.

**प्रश्नकर्ता :** 'समभावाने निकाल करावा' असे भाव तर खूप असतात तरी पण तसे होत नाही, तर काय करावे?

**दादाश्री :** हो, तसे होते. पण त्याची जबाबदारी आपली नाही. जरी समभावाने निकाल झाला नाही तरी पण आपण आपला समभावाने निकाल करण्याचा भाव कधीच बदलता कामा नये, असे आपण ठामपणे ठरवले पाहिजे. जाऊ दे, मला आता समभावाने निकाल करायचा नाही, असे मनात येता कामा नये. मला समभावाने निकाल करायचाच आहे, हा भाव आपण कधीच सोडता कामा नये. समभावाने निकाल न होणे, हे 'व्यवस्थित'च्या आधीन आहे.

**प्रश्नकर्ता :** आज जरी निकाल झाला नाही, तरी उद्या किंवा परवा होईलच ना?

**दादाश्री :** ऐंशी टक्के निकाल तर आपोआपच होत असतो. फक्त दहा-पंधरा टक्केच होत नाही. तेही जर फाइल खूपच चिकट असेल तरच.

पण त्यातही आपण गुन्हेगार नाही, 'व्यवस्थित' गुन्हेगार आहे. आपण तर 'समभावाने निकाल' करायचाच आहे, असे ठाम ठरवलेलेच आहे. आपले सर्व प्रयत्न 'समभावाने निकाल' करण्यासाठीच असले पाहिजेत.

आजकाल तर प्रत्येकालाच चिकट फाइल असते. चिकट फाइल जर सोबत आणली नसती तर वर्षानुवर्षे ज्ञानींजवळ बसून राहण्याची गरजच पडली नसती.

**प्रश्नकर्ता :** दादा, असे काही तरी करा की एकदम सर्व फाइल्स् पूर्ण होतील.

**दादाश्री :** त्याचे असे आहे की आत्म्याची जी शक्ती आहे ती जोपर्यंत प्रकट होत नाही तोपर्यंत पूर्ण कार्य होत नाही. आता मी जर हे केले तर तुमची शक्ती प्रकट होणार नाही. शक्ती तर तुम्हालाच प्रकट करावी लागेल ना? आवरणे तर तोडावीच लागतील ना? आणि तुम्ही निश्चय केला आहे की 'या फाइल्स्चा निकाल करायचाच आहे' तेव्हापासूनच आवरणे तुटू लागतील. त्यासाठी तुम्हाला काहीच मेहनत करावी लागणार नाही. तुम्ही फक्त तसा भावच करायचा आहे. समोरची फाइल जरी वाकडी चालली तरी पण तुम्ही मात्र फाइल्स्चा 'समभावाने निकाल' करा.

आपल्याला तर आत्म्याला निरालंब करायचे आहे. निरालंब झाला नाही तर अवलंबन राहील आणि अवलंबन असेल तोपर्यंत 'ॲब्सॉल्यूट' होऊ शकणार नाही. निरालंब आत्मा हाच 'ॲब्सॉल्यूट' आत्मा आहे. तर तिथपर्यंत तुम्हाला पोहोचायचे आहे. जरी या जन्मात ते शक्य झाले नाही, तरी हरकत नाही. पुढच्या जन्मात तर तसे होणारच आहे, म्हणून या जन्मात तर तुम्हाला आज्ञापालन करून फाइल्स्चा 'समभावाने निकाल'च करायचा आहे. ही मोठी आज्ञा आहे. आणि चिकट फाइल्स् अशा किती असतील? त्या काही चारशे-पाचशे असतील? दोन-चारच असतील आणि खरी मजा तर अशा चिकट फाइल्स् असतात तिथेच येते ना?

**प्रश्नकर्ता :** खूप वेळा चिकट फाइल्स्चा निकाल करणे फार अवघड जाते, ताप येतो!

**दादाश्री :** तो सर्व कमकुवतपणा निघून जाईल. कमकुवतपणा जेवढा जाईल, तितके बळ तुमच्यात उत्पन्न होईल. पूर्वी होते त्याच्यापेक्षा जास्त बळ तुम्हाला जाणवू लागेल.

आम्ही एका गावात 'कॉन्ट्रक्ट'चे काम करायला गेलो होतो. तिथे पूल बांधायचा होता, 1939 साली. तेव्हा मी 30-31 वर्षाचा होतो. त्या गावातील एक वाणी संपूर्ण दिवस व्यापार करायचा, पण रात्री जुगार खेळायचा आणि पैसे गमवायचा. रात्री तो उशीरा घरी येत असे आणि मग त्याची बायको त्याला खूप मारहाण करीत असे. गावातील लोक मला सांगू लागले 'चला शेठ, तिथे पाहाण्यासारखे आहे.' मी विचारले, 'अरे, काय पाहण्यासारखे आहे?' तेव्हा लोक म्हणाले 'तुम्ही या तर खरे.' मग आम्ही तिथे गेलो. तिथे जाऊन पाहिले तर दरवाजा आतून बंद केलेला होता. आतमध्ये त्याची बायको त्याला काठीने मारत होती, तेव्हा तो वाणी म्हणत होता, 'हे घे, अजून घे, अजून घे, अजून घे.' हे तर नवीनच! हे आम्ही नवीनच शास्त्र शिकलो! गाववाले मला म्हणाले, बायको रोज याला अशी मारते आणि तो म्हणतो, 'हे घे, अजून घे.' म्हणजे हा शेठ पण हुशारच आहे ना? ही तर दुनिया आहे. दुनियेत तऱ्हेतऱ्हेचे रंग असतात. त्या शेठजींनी तर अब्रू वाचवली ना? पण तुम्हाला मात्र अशी अब्रू वाचवण्याची गरज नाही. तुमची अब्रू तर आहेच. तुम्ही फक्त 'समभावाने निकाल' करत राहा.

एका वकिलाने आपल्या अशीलाला म्हटले, 'इथून जाता की नाही? नाहीतर तुमच्या अंगावर कुत्रा सोडीन!' याचे नाव वकील, LL.B! हल्ली तर अशील पण असेच असतात.

या जगाचा काहीच ठाव-ठिकाणा नाही. म्हणून तर याला आम्ही 'पोलम्पोल' (सावळागोंधळ) म्हणतो. गुन्हेगार सुटतो आणि निर्दोष पकडला जातो, याला पोलम्पोल म्हणणार नाही तर काय म्हणणार? या जगातील व्यवहारानुसार हे जग पोलम्पोल आहे आणि निसर्गाच्या नियमानुसार हे सगळे एकदम नियमात आहे. लोकांना या मागील हिशोब समजत नाही. हा जो दिसतो तो हिशोब आहे का? नाही, नाही. निसर्ग

म्हणतो, की जो पूर्वीचा हिशोब होता तो आता आला आहे आणि आताचा हिशोब नंतर येईल. म्हणून आपण आपल्या चुकीबद्दल शिक्षा भोगून घ्यावी. जो आता दु:ख भोगत आहे, ते त्याच्या स्वत:चा चुकीमुळे आहे. इतर कोणाची चूक नाही.

**प्रश्नकर्ता :** या ज्या 'चिकट फाइल्स्' आहेत, तर ती पण आपलीच चूक म्हणायची ना?

**दादाश्री :** हो, ती तुम्हीच (राग-द्वेषामुळे) चिकट केली आहे, म्हणून आता तुम्हाला त्याचा चिकटपणा घालवायचा आहे. भोळ्या माणसाच्या सर्व फाइल्स् भोळ्या असतात (चिकट नसतात).

**प्रश्नकर्ता :** ज्यांच्या फाइल्स् चिकट असतात, ते लुच्चे असतात का?

**दादाश्री :** नाही, त्यांना लुच्चे म्हणता येणार नाही. ते लोक अहंकारामुळे फाइल्स् जास्त चिकट करत राहतात. आणि भोळी माणसे 'जाऊ दे, ठीक आहे' असे म्हणून सोडून देतात. त्यांना अहंकाराशी काहीच देणेघेणे नसते.

## वाणीत गोडवा हा 'कॉजेस्'चा परिणाम

सर्व दोष वाणीचेच आहेत. वाणी सुधारली नाही, गोड झाली नाही तर ती पुढे फळ देत नाही. देहाचे दोष तर ठीक आहे, त्यांना भगवंतांनी 'लेट गो' केले आहे (चालवून घेतले आहे). पण वाणी तर दुसऱ्यांना दु:ख देते ना?

वाणीत गोडवा आला की गाडी सुटली. ती मधुर होत होत अंतिम अवतारात एवढी मधुर होते की त्या वाणीची कोणत्याही फळाशी तुलना करता येणार नाही, एवढी ती मधुर असते. आणि काही लोक तर असे बोलतात की जणू रेडे रेकत आहेत असे वाटते. म्हणजे ती पण वाणी आहे आणि तीर्थंकरांची पण वाणी आहे!

**प्रश्नकर्ता :** अशी स्याद्वाद प्रकारची वाणी प्राप्त होवो, अशी

मधुर वाणी प्राप्त होवो असे जर भाव केले तर ते भावच तशी वाणीची रेकॉर्ड तयार करतील ना?

**दादाश्री :** नाही, तसे नाही. त्यासाठी माझ्या वाणीने कोणालाही दु:ख न होवो, आणि सुखच होवो, अशी भावपूर्वक मागणी तुम्ही दररोज केली पाहिजे. तरी पण फक्त मागणी केल्याने काही होत नाही, तर तशी वाणी उत्पन्न होण्यासाठी तशी कारणे पण करावी लागतील. मग त्यापासून तसे फळ येईल. वाणी हे फळ आहे. सुख देणारी वाणी निघत असेल तर ती गोड होत जाते आणि दु:ख देणारी वाणी कडू होत जाते. मग हा बोलला आणि रेडा रेकला, दोन्ही सारखेच वाटते!

## थट्टा-मस्करी केल्यामुळे वचनबळ नाहीसे होते

**प्रश्नकर्ता :** वचनबळ कशा प्रकारे उत्पन्न होते?

**दादाश्री :** एकही शब्द थट्टा-मस्करी करण्यासाठी वापरला नसेल, एकही शब्द स्वार्थासाठी किंवा कोणाला लुबाडण्यासाठी वापरला नसेल, शब्दांचा दुरुपयोग केला नसेल, स्वत:चा मान वाढवण्यासाठी शब्द वापरले नसतील, तरच वचनबळ उत्पन्न होते.

**प्रश्नकर्ता :** स्वत:च्या मानासाठी आणि स्वत:च्या स्वार्थासाठी हे बरोबर आहे, पण थट्टा-मस्करीला काय हरकत आहे?

**दादाश्री :** थट्टा-मस्करी करणे हे तर एकदम चुकीचे आहे, त्यापेक्षा तर मान दिलेले बरे! ही तर भगवंतांची मस्करी उडवली असे म्हटले जाईल. तुम्हाला असे वाटते की हा माणूस गाढवासारखा आहे, पण तो तर परमात्मा आहे. 'आफ्टर ऑल' (शेवटी) तो कोण आहे, याची चौकशी करा. 'आफ्टर ऑल' तो परमात्माच आहे ना?

मला थट्टा-मस्करी करायची खूप सवय होती. पण थट्टा तशी खूप नुकसानकारक नाही, पण समोरच्या माणसावर परिणाम तर होतोच ना? आपली बुद्धी जास्त विकसित आहे, त्याचा दुरुपयोग कशात झाला? तर कमी बुद्धीवाल्या माणसाची मस्करी करण्यात! ही जोखीम जेव्हा

माझ्या लक्षात आली तेव्हापासून माझे थट्टा-मस्करी करणे बंद झाले. थट्टा-मस्करी कधी करायची असते का? थट्टा-मस्करी तर फार मोठी जोखीम आहे, कोणाचीही थट्टा-मस्करी करता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** पण जास्त बुद्धीवाल्याची मस्करी करण्यात काय हरकत आहे?

**दादाश्री :** नाही, पण कमी बुद्धीवाला स्वाभाविकपणेच थट्टा-मस्करी करत नाही ना?

कोणी परमात्मा असे-असे (फेंगडे) चालत असतील तर ते पाहून आपल्या इथे लोक हसतात. अरे, तू थट्टा करत आहेस? आतील परमात्म्याला हे सर्व बरोबर समजते! एका परमात्म्याची अशी दशा झाली त्याची तू थट्टा करत आहेस? मग तुझी पण तशी दशा होईल! तसा नियमच आहे! म्हणून दक्षता घ्या.

**प्रश्नकर्ता :** माझ्याकडून मोठ्या लोकांची थट्टा-मस्करी केली जाते.

**दादाश्री :** असे आहे की थट्टा-मस्करी करणे हा गुन्हा आहे, हे तर तुम्हाला आता समजले. पण मी तर लहान वयापासून हे जाणत होतो, तरी पण 8-10 वर्षे थट्टा-मस्करी करणे चालूच राहिले. पण तुमची ही सवय मात्र लवकरच मोडेल.

कोणालाच दु:ख होणार नाही आणि सगळ्यांनाच आनंद होईल अशी थट्टा करायला हरकत नाही. त्याला निर्दोष गंमत म्हणतात. ती तर आम्ही आता सुद्धा करतो, कारण मूळ स्वभाव जात नाही ना? पण त्यात निर्दोषपणाच असतो!

## ज्ञानींची Flexibility

**प्रश्नकर्ता :** दादाजी एवढ्या लहान लहान मुलांबरोबर तुमचे कसे काय जमते?

**दादाश्री :** आम्ही 'काउन्टर पुलीं'चे सेट जवळ ठेवतो. इतके

सर्व सेट ठेवतो की एखादी व्यक्ती आली की लगेचच त्याला योग्य अशी 'काउन्टर पुली' आम्ही सेट करतो. जर एखादा लहान मुलगा येऊन मला नमस्कार करू लागला तर मला त्याच्याबरोबर बोलावे लागते. मुले आम्हाला कधीच घाबरत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** तुमच्या बरोबरीचा कोणी आला तर तुम्ही काय करता ?

**दादाश्री :** आमच्या बरोबरीचा कोणी नसतोच. हे बेजोड पद आहे. शास्त्रकारांनीच याला बेजोड म्हटले आहे.

आम्हाला ट्रेनमध्ये कोणी भेटला आणि जर तो मला 'ज्ञानी' म्हणून ओळखत नसेल, तर मग मी लगेच 'मी पॅसेंजर आहे' अशी पुली टाकतो.

माझ्या बरोबरीचा कोणी आला तर मी त्याचा शिष्य होईन. मी तर पूर्वीपासूनच ठरवले आहे की प्रत्येकाचे शिष्य बनायचे. त्यामुळे त्याला अडचण वाटणार नाही. जो शिष्य बनतो तोच आपला गुरु बनेल, म्हणून सावध राहा. गुरुपणा करू नका. जर आम्ही त्या व्यक्तीचा शिष्य बनलो तर आम्हाला काय फायदा होतो ? आम्ही त्याचेच गुरु बनलेलो असतो ! म्हणून जर त्याला अडचण आली तर त्याला विचारायला आमच्याकडे यावे लागते.

**प्रश्नकर्ता :** हे समजले नाही, दादा !

**दादाश्री :** आम्ही शिष्य बनलो, त्यामुळे संबंध स्थापित झाला. म्हणून परत तो आमच्याकडे शिष्य बनून येईल. आम्ही जर त्याचे शिष्य बनलो नसतो तर तो आमच्याकडे आलाच नसता आणि त्याने लाभ घेतलाच नसता.

## संसार-पारस्परिक संबंध

व्यावहारिक संबंध च्युत स्वभावाचे असतात आणि तुम्ही तर अच्युत आहात. सांसारिक संबंध केव्हा सुटतील याचा काय नेम ?

**प्रश्नकर्ता :** हो, बरोबर आहे, असा अनुभवही आला आहे.

**दादाश्री :** तुला पण अनुभव आला? तुझी आई सुद्धा च्युत स्वभावाचीच आहे का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** प्रत्येकाशी असे 'च्युत' होणारे संबंधच असतात. पण हे आपण मनात समजायचे, व्यवहारात तर असेच बोलायचे की 'आई, मला तुझ्याशिवाय करमत नाही!'

आई पण म्हणते, 'बाळा, मला तुझ्याशिवाय करमत नाही!' आणि आतमध्ये समजते की हे संबंध 'च्युत' स्वभावाचे आहेत. हे सर्व 'ड्रॅमॅटिक' (नाटकीय) आहे. तुम्ही आतमध्ये स्वतःला 'मी शुद्धात्मा आहे' असे जाणा आणि बाहेर ह्या 'चंदुभाई'च्या नावाचे नाटक करा. या नाटकात राग-द्वेष नसतात. नाटकात हाणामारी करतात, लढाई करतात पण राग-द्वेष होत नाही. हे जे नाटक चालले आहे त्याची 'रिहर्सल' तर तू करूनच आलेला आहेस. म्हणूनच हे सर्व 'व्यवस्थित' आहे असे आम्ही म्हणतो. नाही तर हे सर्व केव्हाच बदलून टाकले असते ना?

या जगात लोक नाटक करत नाहीत. जर कोणी कलेक्टर झाला असेल तर तो घरी सरळपणे बसेल, पण ऑफिसच्या खुर्चीवर मात्र आडमुठा होऊन जातो. आपण त्याच्या घरी गेलो तर 'या बसा' असे म्हणेल पण ऑफिसच्या खुर्चीवर बसलेला असेल तर मात्र मान वर करून बघणार सुद्धा नाही! अरे, खुर्ची काय तुला चावते का? ती काय तुला वेडा करते का? 'मी, मी' असे करत राहतो. अरे, असा कोण लागलास तू? घरात तर तुझी बायको तुला खडसावत असते!

काही तरी समजून घ्यायला हवे ना? सर्वांबरोबर पारस्परिक संबंध आहेत. जग म्हणजे काय? एकमेकांबद्दल सद्भावना! कलेक्टर असो, किंवा नोकर असो, एकमेकांबद्दल सद्भावना असली पाहिजे. आणि हेल्पिंग नेचर, ऑब्लाइजिंग नेचर (मदत करणारा, परोपकारी स्वभाव) असला पाहिजे!



## [ 22 ]

## तुम्हाला दुःख आहेच कुठे?

या जगात तुम्हाला दुःख आहेच कुठे? दुःख तर हॉस्पिटलमध्ये आहे. तिथे पाय उंचावर टांगून ठेवलेला आहे! भयंकर भाजलेले लोक आहेत, त्यांना दुःख आहे. तुमच्यावर असे कुठले दुःख कोसळले आहे? उगाचच विनाकारण आरडाओरडा करत राहता! यांना तर सहा महिने तुरुंगात टाकले पाहिजे! तुम्ही तर चांगल्या गोष्टींना वाईट म्हणता, मग वाईट गोष्टींना तुम्ही काय म्हणाल? हॉस्पिटलमध्ये दुःख आहे, त्याला दुःख म्हणा पण जिथे दुःख नाहीच तिथे दुःख आहे असे कसे म्हणता येईल? आम्ही आमच्या संपूर्ण आयुष्यात कधीच दुःख आहे असे बोललो नाही. असे कधी बोलतात का? तुम्ही काय मूर्ख आहात? दोन आणे, चार आणे, आठ आणे, बारा आणे, सगळे सारखेच का?

दुःख तर हॉस्पिटलमध्ये असलेल्यांना आहे. या बंगल्यात, पलंगांवर झोपलेत त्यांना नाही. पाय टांगलेल्यांना, भाजलेल्यांना एकदा हॉस्पिटलमध्ये जाऊन बघून या, मग तुम्हाला कळेल की तुम्हाला दुःख नाहीच. तुम्हाला निसर्गाबद्दल आनंद वाटेल की अहाहा! निसर्गाने मला किती छान 'प्लेस' (स्थान) दिली आहे. पण लोकांना याची जाणीवच नाही ना? ते तर चांगल्यालाही वाईट म्हणतात आणि अशक्तांनाही वाईट म्हणतात. सतत दोष काढणे, फक्त एवढेच काम! याला माणुसकी कसे म्हणणार? त्रास कशाला म्हणायचे याला काही लिमिट असावी की नाही? 'आज मला भूकच लागली नाही, आज मला हा त्रास होत आहे.' हा कसला वेडेपणा?

माझा पाय फ्रॅक्चर झाला होता तेव्हा माझ्या पायाला लटकवलेले वजन पाहून काही लोक म्हणत, 'अहो, देवाने तुम्हाला एवढे दुःख का बरे दिले? आता देव असे काही नाहीच!'

अहो भाऊ, मला कुठे दुःख दिले आहे? ते तर तुम्हाला तसे वाटते. याला दुःख म्हणतच नाहीत. दुःख तर इथे असे भोक पाडून खावे लागत असेल, इथे भोक पाडून लघवी करावी लागत असेल तर त्याला दुःख म्हणतात. ही लहान मुले असतात, त्यांना बिचाऱ्यांना खूप दुःख होत असते. त्यांना दुःख होते तेव्हा ती रडतात, पण त्यांना 'मला इथे दुखत आहे' असे बोलून सांगताही येत नाही. आणि हे अभागी लोक जेवताना नऊ पोळ्या खातात आणि तरी पण म्हणतात 'मी दुःखी आहे!' या लोकांबद्दल काय बोलणार? दुःखाची व्याख्या असायला हवी की नको? आणि सुखाचीही व्याख्या असायला हवी की सुख कशाला म्हणतात?

संसारात अपार सुख आहे पण लोकांना ते उपभोगता येत नाही! किती सुखे आहेत? खीर पण मिळते, त्याबरोबर मालपुआ पण मिळतो, आणि तोसुद्धा अस्सल साजूक तुपाचा! घारी (एका प्रकारची मिठाई) मिळते, डाळ, भात, भाजी मिळते, तरी हे सर्व दुःखीच! माणूस सोडून इतर जनावरांना विचारा, 'दुःख आहे का?' याच प्रकारे माणसात पण खालच्या जातीच्या लोकांना विचारून या बघू?

**प्रश्नकर्ता :** पण तुम्ही तर म्हणता की घारी खावी पण त्यात तन्मयाकार होऊ नये.

**दादाश्री :** ती तुमच्यासाठी सांगितलेली गोष्ट आहे. तुम्हाला जसे राज्य करायचे जमेल तसे तुम्ही करा! किती तरी सुखे समोर येऊन उभी आहेत, परंतु लोक मात्र दुःखाची रडगाणी गात राहतात.

या जगात रडण्या-भाकण्यासारखे काहीच नाही. फक्त एखादी वीस-एकवीस वर्षाची तरुणी असेल आणि तिला मूल-बाळ नसेल आणि ती विधवा झाली असेल तर तिच्यासाठी रडणे-भाकणे ठीक आहे. नाही तर या जगात रडारड म्हणजेच क्लेश करण्यासारखे काही नाहीच मुळी!

तरी पण दिवसभर क्लेश, क्लेश आणि क्लेशच! अहो, काय शिकलात? हे कसले शिक्षण? याला शिकवण म्हणताच येणार नाही ना? 'थिअरी ऑफ रिलेटिव्हिटी' समजायला हवी ना?

सासवांना विचाराल तर म्हणतील 'माझी सून वाईट आहे.' त्याच प्रकारे सुनांना विचाराल तर त्या म्हणतील 'माझी सासू वाईट आहे.' जगातील सर्व सासवा वाईट आणि सर्व सुना वाईट? अहो, हे कसे शक्य आहे?

ही जनावरे देखील काही मर्यादेपर्यंत दु:खांना 'रिस्पोन्स' देत नाहीत (झुगारून देतात) आणि माणसे मात्र लहान लहान दु:खे कुरवाळतात, हा केवढा मोठा मूर्खपणा आहे.

या लोकांचा दृष्टीकोन 100 टक्के चुकीचा आहे.

**प्रश्नकर्ता :** सगळे 100 टक्के चुकीचे आहेत, असे कसे म्हणू शकतो?

**दादाश्री :** कारण उघड्या डोळ्यांनी आंधळे आहेत. उघड्या डोळ्यांनी आंधळे म्हणजे स्वत:च्या हिताहिताचे भानच नाही. काय बोलले तर हितकर, काय केले तर हितकर, काय जाणले तर हितकर हे माहीतच नाही. प्रत्येक गोष्टीची नक्कल करण्यात लोक तरबेज झाले आहेत! सर्व काही बदलले आहे. (पूर्वी) आपल्या हिंदुस्तानातील लोक कशाचीच नक्कल करत नसत. उलट सर्व जग आपली नक्कल करत असे. आता आधुनिक जमाना आला आहे, त्याला माझी हरकत नाही. हे (नवीन) युग आहे, हे युग या युगाप्रमाणेच चालणार हे मला समजते. मी युगापासून वेगळा राहत नाही. पण हे हिताचे केले की अहिताचे केले ते मला समजते. या लोकांनी संपूर्ण अहित केले आहे.

मला जरी कितीही ताप आला असेल, पण घरच्यांना ते कधीच कळले नाही. त्यात काय सांगायचे? त्यांनाही ताप येतोच ना? मग कशाला सांगायचे? ते तर विसरून जातील बिचारे! 'मी तर अनंत शक्तीवाला आहे.' मग मी या लोकांना का बरे सांगू?

हे लोक 'ताप आहे, ताप आहे' असे ओरडून थर्मामीटर आणून लावतात! 100 डिग्री, 101 डिग्री, 102 डिग्री असे मोजत बसतात! अहो, हे तर फक्त ताप मोजण्याचे साधन आहे. हे काही साध्य नाही.

मला दुःख आहे असे तुम्ही म्हणता का? दुःख तर 'रिलेटिव्ह'मध्ये होते 'रियल'मध्ये नव्हते. आणि ते आरोपित होते. जिथे तुम्ही नाहीत तिथे दुःख मानले गेले आहे, 'रॉंग बिलीफ'मुळे! 25 टक्के होते, पण तुम्ही म्हटले की 'मला हे दुःख झाले', असे म्हटल्यावर ते दुःख 100 टक्के झाले!

**प्रश्नकर्ता :** 'मी' शरीराबरोबर तन्मयाकार झाला. म्हणून मला 25 टक्केच्या ऐवजी 100 टक्के दुःख असल्यासारखे वाटते.

**दादाश्री :** सर्व जगच 'मीच चंदुभाई आहे' असेच समजते. आणि हा तर असा वेगळा व्यवहार, तो तुम्ही आता शिकलात!

**प्रश्नकर्ता :** पण 'दुःख चंदुभाईला आहे असे जर म्हटले' तर दुःख 25 टक्केचे 25 टक्केच राहील ना?

**दादाश्री :** हो, मग वाढणार नाही. नाहीतर 100 टक्के होऊन जाते. लोकांना याची जाणीवच नाही. म्हणून तर उलट ते दुःखांना वाढवतात. स्वतःच्या दुःखांचे वर्णन करून उलट ते दुःखे वाढवतात!

लोक चिंता करतात ना? चिंता करण्याला पण काही मर्यादा असते. सगळेच काही 'ज्ञानी' नसतात की त्यांना चिंता होणारच नाही. तेव्हा याला काही नियम असावा की नसावा? कधीपर्यंत चिंता कराल? चिंता म्हणजे 'मी आता काय करू?' असे चिंतवन करत राहणे.

लोक तर देवाला बरे-वाईट बोलतात, निसर्गाला बरे-वाईट बोलतात! मग न्याय असे काही राहिलेच नाही.

अडीच वर्षाचा मुलगा गेला तरी रडतात, आणि 22 वर्षाचा विवाहित मुलगा गेला तरी रडतात आणि पासष्ठ वर्षाचा म्हातारा मेला तरी रडतात. मग यात तुला काय समजले? कधी रडायचे आणि कधी रडायचे नाही, हे त्याला समजतच नाही.

**प्रश्नकर्ता :** या प्रकारे बुद्धीचा वापर कधी केलाच नाही.

**दादाश्री :** तो जर केला नाही तर जगात सुखी कसा होऊ शकेल? माणसांना, जनावरांना सुखच आहे. माणसांना दु:ख कसे बरे असेल? फक्त एवढेच आहे की सुख भोगायचे कसे हेच माहीत नाही.

ही गोष्ट सर्व मानसशास्त्रज्ञांना समजावून सांगायची आहे. आणि याहूनही पुढची गोष्ट आहे. हा 'बुडबुडा' आहे, तोपर्यंतच काम होऊ शकेल. एकदा बुडबुडा फुटला की संपले!

## सहीशिवाय मृत्यूही नाही

आम्ही यात्रेला जाणार होतो, चारला गाडीत बसणार होतो, या सर्व गोष्टी चार चार महिने अगोदरपासूनच सर्वांना माहीत होत्या. मग मरतानाच का नाही म्हणत मला जायचे आहे? तसे तर अगदी मृत्यू येईपर्यंत म्हणत नाही. मनात शेवटपर्यंत आशा असते की एखादे असे औषध येईल आणि ते आपल्याला लागू पडेल! आणि जर रात्री परत आत खूप वेदना झाल्या तर तोच म्हणतो, यापेक्षा सुटलो तर बरे! मृत्यूदेखील सही केल्याशिवाय येत नाही! इन्कमटॅक्सवाले प्रत्येक गोष्टीत प्रथम सही करायला लावतात, तसेच मरण्यापूर्वी पण प्रथम सही होते आणि त्यानंतरच मरता येते.

**प्रश्नकर्ता :** सही केली नाही तर मृत्यू येणार नाही का?

**दादाश्री :** हो, सही केली नाही तर मृत्यू येणार नाही. हे सगळे जण सही करत असतील की नाही?

**प्रश्नकर्ता :** जे अपघातात मरतात, ते कसे सही करणार?

**दादाश्री :** त्यांनीही सही केलेली असते. सही केल्याशिवाय मरता येत नाही. त्याशिवाय मरण्याचा अधिकारच नाही. मृत्यू तर तुमच्याच मालकीचा आहे. त्यात दुसऱ्या कोणाचीच ढवळाढवळ नसते. आणि एकदा तुमची सही झाली की मग तुमचे काही चालत नाही.

**प्रश्नकर्ता :** सही या जन्मी केलेली असते की मागील जन्मी?

**दादाश्री :** याच जन्मी केलेली असते. मागील जन्मात त्यांची योजना बनलेली असते, परंतु रूपकात याच जन्मी येते.

मी आणि माझ्या मामाचा मुलगा रावजीभाई, आम्ही एक दिवस बाहेर झोपलो होतो. आतून माझी आई म्हणाली, 'हे भगवंता, आता सुटले तर खूप बरे होईल!' मी रावजीभाईंना म्हटले 'हे पाहा आता आईने सही केली.' कारण आतमध्ये प्रचंड यातना होत असतात, त्या सहन होत नाहीत. तेव्हा माणूस अशी भावना करतो की अरे, आता सुटलो तर बरे! तो सही करून टाकतो.

**प्रश्नकर्ता :** बेशुद्धीत सही करतो.

**दादाश्री :** नाही. बेशुद्धीत नाही, पूर्ण शुद्धीवर असताना सही करतो. मग दुसऱ्या दिवशी सकाळी विचारले की 'तुमचा इथून जाण्याचा विचार आहे की काय?' तर म्हणेल 'नाही रे बाबा, माझे शरीर चांगले आहे.'

**प्रश्नकर्ता :** जन्म होताच ताबडतोब मरतात, ते कसे?

**दादाश्री :** त्या सर्वांचे भाव तर आत होऊनच जातात. आत त्यांचा हिशोब होऊनच जातो. हिशोब झाल्याशिवाय मृत्यू होतच नाही. अचानकच काही होत नाही. अर्थात हे सगळे 'इन्सिडन्टस्' आहेत, 'ॲक्सिडन्टस्' नसतात.

'हार्ट ॲटॅक' येतो तेव्हा खूप वेदना होतात, त्या क्षणी सहज असा भाव निर्माण होतो की आता यातून सुटलो तर बरे! आणि नंतर आतमध्ये जरा बरे वाटले तर म्हणतो, 'डॉक्टर मला बरे करा, डॉक्टर मला ठीक करा.' अरे, पण तेव्हा तर तू सही केली होती, त्याचे काय? मरण्यापूर्वीच का विचार करत नाही?

'मला उद्या अहमदाबादला जायचे आहे' असे ठरवतो, किंवा 'मला यात्रेला जायचे आहे' असे चार महिन्यापूर्वीच ठरवतो, पण मृत्यूबाबत तर कोणी काहीच ठरवत नाही, आणि त्याचा विचार जरी

आला तरी तो विचार बदलून टाकतो, की 'नाही, नाही, असे काही नाही. हे तर फक्त विचार येत आहेत, माझे शरीर तर एकदम चांगले आहे. अजून पन्नास वर्षे जगू शकेन असे आहे.'

एरवी जो निष्पक्षपाती असेल त्याला तर सर्व कळते. बाड-बिस्तरे बांधले जात असतील तर समजणारच ना की हे जाण्याची तयारी करत आहेत! आतमध्ये बाड-बिस्तरे गुंडाळले जात आहेत ते आपल्याला दिसतेसुद्धा, तरी पण आपण त्याकडे लक्ष दिले नाही, तर ती आपलीच चूक म्हणायची ना? आणि पूर्वी तर काही लोक इतके सरळकर्मी होते की, ते सांगत असत की 'पाच दिवसानंतर एकादशीच्या दिवशी मी देह सोडणार आहे.' आणि त्याप्रमाणे घडतही असे! मग काय दुसऱ्यांसाठी वेगळे नियम असतील का? नियम तर जसे आहेत तसेच आहेत. हा तर त्यांचा मोह आहे. मृत्यूजवळ आला तर घरची माणसे सांगतात 'काका, आता मंत्र म्हणा' तरी पण तो मंत्र म्हणत नाही. उलट काका काय म्हणतात? 'ह्याला तर अक्कलच नाही ना?' पाहा, हा मोठा अक्कलवाला! बाजारात विकायला गेलो तर कोणी चार आणे पण देणार नाही! काकांचा जीव मुलीच्या लग्नात अडकलेला असतो, मनात विचार करत असतात की ही (बिन लग्नाची) राहिली आहे.

जे निष्पक्षपाती झालेले असतील, त्यांना मृत्यूबद्दल का नाही कळणार? मृत्यूची त्याला भीती वाटते. बाहेरगावी जाण्यात, यात्रेला जाण्यात त्याला भीती वाटत नाही. कारण त्याच्या मनात असते की मी परत येईन. 'अरे, पण परत येईल की नाही, याचा काय भरवसा?'

आम्ही तर स्टीमरच्या कानात सांगतो, 'तुला जेव्हा बुडायचे असेल तेव्हा तू बूड. आमची तशी इच्छा नाही.' स्टीमरला तर फायद्यासाठी पाण्यात सोडले आहे, पण ते पाणी आहे, त्यामुळे स्टीमर कधी तरी बुडूही शकते. तसेच या देहालाही सांगावे, 'तुला जायचे असेल तेव्हा जा! माझी इच्छा नाही!' कारण नियम इतका चांगला आहे की कोणालाच सोडणार नाही. इथे कोणाला कुणाची दया येईल असे नाही. तर मग विनाकारण 'हे देवा, मला वाचव' अशी दया

का मागता? देव कसे काय वाचवू शकेल? देव स्वतःच वाचले नव्हते ना? ज्यांनी इथे जन्म घेतला होता, ते सर्व देव वाचले नव्हतेच ना? श्रीकृष्ण भगवंत तर असे पाय एकावर एक ठेवून झोपले होते, तेव्हा त्या शिकाऱ्याला हरिण-बिरिण आहे असे वाटले आणि त्याने बाण मारला! मृत्यू कोणालाच सोडत नाही. कारण ते आपले स्वरूप नाही. आपल्या स्वरूपाचे तर कोणी नावही घेणार नाही. जर तुम्ही 'शुद्धात्मा' आहात तर कोणी नाव घेणारा नाही, तर 'तुम्ही' परमात्माच आहात! पण इथे कोणाचा सासरा व्हायचे असेल तर मात्र ते कठीण आहे!

**प्रश्नकर्ता :** देह जेव्हा सुटायचा असेल तेव्हा सुटू दे, आमची इच्छा नाही, असे म्हणण्याचा आशय काय आहे?

**दादाश्री :** देहाबद्दल तिरस्कार वाटू नये म्हणून म्हणतो की आमची इच्छा नाही!

**प्रश्नकर्ता :** ही दोन वाक्ये म्हणणारा कोण आहे?

**दादाश्री :** जो मृत्युपलीकडे आहे, त्याचीच असणार ना?

**प्रश्नकर्ता :** त्याला प्रतिष्ठित आत्मा म्हणतात का?

**दादाश्री :** नाही. प्रतिष्ठित आत्मा तर मर्त्य (मरणारा) आहे, हे सर्व प्रज्ञेचे काम आहे. प्रतिष्ठित आत्मा तर मरणार आहे, तो असे बोलणारच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** ज्याच्यात प्रज्ञा उत्पन्न झाली नसेल, सगळ्यांच्यात तर प्रज्ञा उत्पन्न झालेली नसते ना? तरी पण असे बोलत असेल, तर कोण बोलते?

**दादाश्री :** तो मरणाऱ्यापासून वेगळाच असतो. मरणारा स्वतः असे कधीच म्हणत नाही की मी मरेन. तिथे बुद्धीचा काही भाग असे भाव असलेला असतो! स्थितप्रज्ञदशा म्हणतात ना, तो भाग, पण एखाद्यालाच असा विचार येतो, सगळ्यांना तर येत नाही ना!

## तुमचे बिघडवणारा कोण?

तुम्ही घाईत असाल, आणि 'लवकर लवकर जेवायला वाढ' असे तुम्ही म्हणता. त्यावेळी वरण काढताना जर पूर्ण पातेले सांडले तर काय अवस्था होईल? अशा वेळी जरा जागृत राहण्याची गरज आहे. कारण तुम्हाला खाण्यासाठीच बनवणाऱ्याने जेवण बनवले होते. म्हणजे यात बनवणाऱ्याची काहीच चूक नाही. तरी पण तुम्ही काय म्हणता? तू सांडलेस. अरे, त्याने नाही सांडले. त्याने तर तुमच्यासाठीच बनवले होते. सांडणारी शक्ती तर वेगळी आहे, पण सांडले त्याच्या माध्यमाने.

म्हणजेच या जगात तुमचे बिघडवू शकेल असे कोणीही नाही. या जगात कोणाकडेच दुसऱ्याचे बिघडवण्याची शक्ती नाही. या जगात तुमचे बिघडवू शकेल असा कोणी जन्मलेलाच नाही.

या साऱ्या नैसर्गिक शक्ती काम करत असतात. तरी पण लोक मला विचारतात की हे चोर कशाला आले असतील? या खिसेकापूंची काय गरज आहे? देवाने यांना का जन्म दिला असेल? अरे, ते नसतील तर तुमचे खिसे कोण रिकामे करील? देव स्व:त थोडेच येणार आहे? तुमचे चोरीचे पैसे कोण घेऊन जाणार? तुमचे धन चुकीचे असेल तर ते कोण घेऊन जाणार? म्हणून त्यांची पण गरज आहे. ते बिचारे निमित्त आहेत! या सर्वांची गरज आहे.

**प्रश्नकर्ता :** कोणाच्या घामाचा पैसा पण जातो.

**दादाश्री :** हा जो घामाचा पैसा जातो, त्यामागेही रहस्य आहे. ती या जन्मातील घामाची कमाई वाटते, पण हा सर्व पूर्वीचा हिशोब आहे. वही खात्यात हिशोब अजून बाकी आहेत म्हणून. नाहीतर आपले कोणी कधीच घेऊन जाऊ शकत नाही. अशी शक्ती कोणाकडेच नाही. आणि जर असा कोणी घेऊन गेला तर नक्कीच हा मागचा-पुढचा काहीतरी हिशोब आहे असे समजावे. इतके नियमबद्ध हे जग आहे. (हिशोब नसेल) तर सापही त्याला स्पर्श करणार नाही. सर्व अंगण सापांनी भरलेले असेल तरी एकही साप त्याला स्पर्श करणार नाही.

इतके नियमबद्ध हे जग आहे! खूप सुंदर आहे हे जग! संपूर्ण न्यायस्वरूप आहे, तरी पण लोकांना समजत नाही आणि ते स्वत:च्या भाषेत (स्वत:च्या मान्यतेनुसार) बोलतात, मग काय होणार?

## प्रिकॉशन म्हणजेच 'चंचलता'

**प्रश्नकर्ता :** जर पाऊस पडला तर असे करू, असे वाटले तर त्याला विकल्प म्हणायचे का? सहज भावाने विचार तर करावाच लागेल ना? विचार केल्यानंतर जे होईल ते ठीक आहे. पण असा विचार करणे याला ढवळाढवळ केली असे म्हणतात की विकल्प केला असे म्हणतात?

**दादाश्री :** ज्याने 'ज्ञान' घेतलेले नाही, त्याच्यासाठी हे सर्व विकल्पच म्हटले जातील. ज्याने 'ज्ञान' घेतले आहे आणि ज्याला समजले आहे, त्याला मग विकल्प राहणारच नाहीत. शुद्धात्म्यारूपाने 'आपण' अजिबात विचार करायचाच नसतो. आपोआप जे येतील ते विचार जाणायचे असतात.

**प्रश्नकर्ता :** त्याचा अर्थ असा झाला की काहीच 'प्रिकॉशन' (खबरदारी) घ्यायची गरज नाही?

**दादाश्री :** प्रिकॉशन कशी असणार? आपोआप जी होईल तीच 'प्रिकॉशन.' यात आता 'प्रिकॉशन' घेणारा राहिलाच कुठे?

दिवसाढवळ्या तुम्ही ठोकर खाता (चिंता, मतभेद, कषाय होतात)! त्यात 'प्रिकॉशन' घेणारे तुम्ही कोण? माणूस खरेच 'प्रिकॉशन' घेऊ शकतो का? त्याला तर शौचाला जाण्याचीही स्वतंत्र शक्ती नाही!

सगळे जगच 'प्रिकॉशन' घेते, तरी पण 'ॲक्सिडन्ट' होतातच ना? जिथे 'प्रिकॉशन' नसतात तिथे 'ॲक्सिडन्ट' होत नाहीत! 'प्रिकॉशन' घेणे ही एक प्रकारची चंचलता आहे. गरजेपेक्षा जास्त चंचलता आहे. त्याची गरजच नाही. जग आपोआप सहजपणे चालूच असते.

**प्रश्नकर्ता :** पण काळजी कर्ताभावाने नाही, पण 'ऑटोमॅटिक' तर होईलच ना?

**दादाश्री :** हो, ती तर आपोआपच होत असते.

**प्रश्नकर्ता :** कर्ताभावाने नाही, पण विचार सहजपणे आले तर मग विवेकबुद्धी वापरायला हवी, असेच ना?

**दादाश्री :** नाही, सगळे आपोआपच होते. 'तुम्ही' फक्त 'पाहत' राहायचे की काय होत आहे? सगळे आपोआपच होत असते! मग मध्ये तुम्ही कोण आहात हे मला सांगा बरे? तुम्ही 'चंदुभाई' आहात की 'शुद्धात्मा'?

**प्रश्नकर्ता :** दादा, तुम्ही म्हणता की मध्ये तुम्ही कोण? पण मन तर मध्ये आहेच ना?

**दादाश्री :** मनाला आम्ही थोडीच मनाई केली आहे? मनात तर आपोआप साहजिकपणे विचार येतच असतात! आणि कधीकधी विचार येत पण नाहीत!

त्याचे काय आहे की, अगदी अंतिम जन्मातही मन क्षणोक्षणी चालूच असते. फक्त तेव्हा गाठीवाले मन नसते. जसे उदय येतात. तसे ते असते.

ज्ञानानंतर तुम्ही 'शुद्धात्मा' आहात आणि व्यवहाराने 'चंदुभाई' आहात. तर 'मी चंदुभाई आहे, मी याचा मामा आहे, याचा काका आहे', याला व्यवहारात विकल्प म्हणतात, परंतु प्रत्यक्षात हे विकल्प नाहीत. हे तर 'डिस्चार्ज' स्वरूप आहे. तो स्वतःच जर तसे मानत असेल की 'मीच चंदुभाई आहे' तर मात्र तो विकल्प आहे! आणि 'ज्ञाना'नंतर 'मी शुद्धात्मा आहे' म्हणजेच तो निर्विकल्प होतो.



## [ 23 ]

## बुद्धिमान कसा असतो?

**प्रश्नकर्ता :** बुद्धिमान कोणाला म्हणतात?

**दादाश्री :** जो, आपल्या घरात, व्यवसायात, कुठेही कमीतकमी संघर्ष (वाद, भांडण) होईल अशा प्रकारे व्यवहार करतो, त्याला बुद्धिमान म्हणतात.

नाहीतर समोरच्याला खुश करण्यासाठी पांडित्य चालवत असेल, तर त्याला अतिशहाणपणा म्हणतात. बुद्धीने समोरच्याला मदत व्हायला हवी.

सकाळी चहा आणि मिठाई आली आणि आपण अगोदर मिठाई खाल्ली नंतर चहा प्यायलो आणि मग जर चहा अगोड आहे असे म्हणून आरडाओरडा केला तर त्याला बुद्धिमान कसे म्हणायचे? आणि कदाचित चहा अगोड आलाही असेल तरी पण त्यासाठी आरडाओरडा कशाला करायचा? चार आण्याच्या चहासाठी आरडाओरडा केल्यामुळे घरातील लोक बिचारे किती घाबरतात!

जो माणूस बुद्धीचा असा वापर करतो की ज्यामुळे कोणीही त्याला घाबरत नाही, अशा माणसाला बुद्धिमान म्हणतात. आणि जर एखाद्या व्यक्तीला दुसरा कोणी घाबरत असेल तर त्याला दुर्बुद्धी असलेला म्हणावे लागेल. त्यामुळे भयंकर पापे बांधली जातात. म्हणून बुद्धीचे भाग नीट समजायला हवेत ना?

आपल्याकडून घरात कोणाला मदत होत नसेल, कोणाचे मतभेद मिटत नसतील, तर अशा बुद्धीचा काय उपयोग?

आणि धंद्यातही तोटा होतो, पण तो स्वाभाविक आहे, पण धंद्यात दुरुस्ती करण्यात चूक होता कामा नये. तुम्हाला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** हो, बरोबर आहे.

**दादाश्री :** आम्ही तर इथे गोष्टी स्पष्ट करण्यासाठी बसलो आहोत. बरोबर आहे असे म्हणवून घेण्यासाठी नाही.

**प्रश्नकर्ता :** जर कधी घरात किंवा बाहेर कपट होत असेल तर त्यांना धमकी तर द्यावीच लागेल ना?

**दादाश्री :** तुमच्या धमकीने जर समोरच्या व्यक्तीचे कपट मिटणार असेल तर धमकावण्यास हरकत नाही, परंतु जर कपट कायम राहत असेल तर धमकावण्याला काहीच अर्थ नाही. तुम्हाला धमकावता येत नाही, 'यांना का धमकावले?' या कारणासाठी तुम्हाला तुरुंगात टाकावे लागेल.

**प्रश्नकर्ता :** धमकावायचे नाही, तर मग काय करायचे?

**दादाश्री :** तो कशा प्रकारे सुधारेल ते पाहायचे.

**प्रश्नकर्ता :** आपल्याबरोबर जर कोणी कपट केले तर स्वाभाविकपणेच त्याच्यावर राग येणार ना?

**दादाश्री :** पाच वेळा रागावून जर त्याचे कपट संपणार असेल तर ठीक आहे, आणि संपत नसेल तर तुम्हाला तुरुंगात टाकायला हवे. या औषधाने तो सुधारत नाही! उलट असे औषध पाजून तर तुम्ही त्याला मारून टाकत आहात.

**प्रश्नकर्ता :** तो माणूस तसाच वागतो. मग त्यासाठी कोणता उपाय करावा?

**दादाश्री :** हा तुमचा उपायच हानीकारक आहे. हा उपायच नाही. हा एक प्रकारचा अहंकार आहे. मी याला असे सुधारीन, तसे सुधारीन, हा अहंकार आहे. प्रथम 'तू स्वतः सुधार असे' आम्हाला सांगायचे

आहे. फक्त तुम्हीच बिघडलेले आहात. ते सर्व तर सुधारलेलेच आहेत! इथे तर तुम्ही सर्वांना घाबरवून त्रास देता, ते तुम्हाला शोभत नाही.

**प्रश्नकर्ता :** तर मग काय करू?

**दादाश्री :** स्वत:ला बदला. स्वत:ला असे बदला की कोणी कधीच तुमच्याबरोबर कपट करणारच नाही. माझ्याशी कोणीच कपट करत नाही. आपल्या मनात कपट असेल तरच समोरचा तुमच्याशी कपट करतो. आपल्या मनात कपट नसेल तर कोणी कपट करतच नाही! म्हणजे हा आपलाच फोटो आहे.

**प्रश्नकर्ता :** आपलाच काहीतरी हिशोब असेल, म्हणून समोरचा कपट करतो का?

**दादाश्री :** हिशोब तर आम्ही 'लेट गो' करतो (जाऊ देतो). हिशोबाचे निवारण होऊ शकेल असे नाही. माझा जो हिशोब आहे त्याचे पण निवारण होऊ शकत नाही.

तुम्ही काहीही बदलू शकत नाही. मग आरडाओरडा करण्यात काय अर्थ आहे? त्याचे कपट तर जसेच्या तसेच राहते. उलट तो जास्त कपट करतो. तुम्ही आरडाओरडा केला तर तो मनातल्या मनात म्हणेल या माणसाला काहीच समजत नाही आणि उगाचच आरडाओरडा करत असतो. असे करत तो स्वत:ची चूक वाढवतच जातो आणि तुम्हाला गिळून टाकतो.

**प्रश्नकर्ता :** मग यावर कोणता उपाय करावा?

**दादाश्री :** तो कपट करणारच नाही असा आपला प्रभाव पडला पाहिजे. आपल्याला हे दुसरे उपाय करण्याची गरज नाही. रागवता, त्याऐवजी मौन राहा ना. राग, हे हत्यार नाही.

**प्रश्नकर्ता :** कपट करून जर कोणी माल-सामान चोरत असेल तर काय आम्ही पाहत राहावे?

**दादाश्री :** त्यासाठी रागावणे हे (योग्य) हत्यार नाही. इतर काही

हत्याराचा उपयोग करा. त्याला जवळ बसवून समजावा, त्यावर विचार करण्यास सांगा, तर सर्व काही मार्गी लागेल.

**प्रश्नकर्ता :** डॉक्टरने सांगितले की 'तुम्हाला ब्लड प्रेशर' आहे. तर मग त्याने काही पदार्थ खाता कामा नयेत. तरी पण त्याने ऐकले नाही आणि ते पदार्थ खाल्ले, तर आम्हालाच डॉक्टरकडे पळावे लागेल ना?

**दादाश्री :** माझे म्हणणे आहे की त्या डॉक्टरलाही 'ब्लड प्रेशर' झालेले असते ना!

'ते कोणत्या आधारावर खातात' ते तुम्हाला माहीत नाही. तुम्ही एकदा सांगून पाहा की डॉक्टरने मिरची (तीखट) खायला मनाई केली आहे. मग जर तुमचा प्रभाव पडला तरी ठीक आणि नाही पडला तरी ठीक. इथे तर तुमचाही प्रभाव पडत नाही आणि डॉक्टरचाही प्रभाव नाही.

**प्रश्नकर्ता :** आम्ही मिरची खात राहिलो आणि दुसऱ्यांचे मिरची खाणे बंद केले तर त्याचा प्रभाव पडणार नाही ना?

**दादाश्री :** तसे मी करवीतच नाही. माझ्यात जितका त्याग वर्तत आहे तेवढाच त्याग मी तुम्हाला करायला सांगतो आणि तेसुद्धा तुमची इच्छा असेल तर, नाही तर मी सांगतो बाबा रे, लग्न कर. जा लग्न कर!

लोणचे खाऊ नका, मिरच्या खाऊ नका, अशी कटकट जर आपण करत राहिलो तर ते मनात चिडतात आणि म्हणतात की हा इथे कशाला आला?

तुमच्या मनात कधी असे येत असेल की मी नसलो तर काय होईल? तर मग 'तुम्ही नाहीच' असेच समजा ना! उगाच अहंकार करण्याऐवजी तसे माना.

'मिरची खाऊ नका' हे डॉक्टरांचे ज्ञान आपण हजर करावे (सांगावे). परंतु त्याचा स्वीकार करणे, न करणे ही त्याची मर्जी आहे.

मी जर कोणाला सांगितले की असे कर, तर तो काही तरी वेगळेच करील. म्हणून मी त्याला विचारतो 'असे करून काय फायदा होईल?' तर मग तो म्हणतो 'आता कधी मी असे करणार नाही.'

त्याऐवजी जर मी त्याला म्हणालो की 'तू असे का करतोस? तू असाच आहेस, तू तसाच आहेस.' तर तो (दोष) झाकून ठेवेल उघड करणार नाही.

**प्रश्नकर्ता :** असे कौशल्य एकदम थोडेच येते?

**दादाश्री :** नाही, पण असे जर कधी ऐकलेले असेल, तरच एखादेवेळी येऊ शकेल. 'ज्ञान' ऐकले असेल तर उपयोगी पडेल. मी माझ्या परीने कसा 'जगज्जेता' झालो आहे, ते मी तुम्हाला सांगतो. शेवटी जग जिंकावे तर लागेलच ना?

## दखल करू नका, 'पाहत' राहा

चालत्या गाडीत दखल (ढवळाढवळ) करू नका. ती आपोआपच चालत राहील. ती काही थांबणार नाही.

**प्रश्नकर्ता :** 'इन्टरफियर' केले असे म्हणतात, त्यालाच दखल असे म्हणतात का? दखलचा अर्थ हाच का?

**दादाश्री :** 'इन्टरफियर' तर होताच कामा नये. त्यालाच दखल म्हणतात. दखल होते तेव्हा गडबड होते. जे चालत आहे ते चालूच राहू द्यावे. आपली ही ट्रेन चालत असेल आणि त्यात काही खटक-खटक होत असेल तर त्यावेळी आपण साखळी ओढून आरडाओरडा केला पाहिजे का? नाही, तिला चालूच राहू द्यायला हवी.

**प्रश्नकर्ता :** इथे तर जरासा 'चूं चूं' आवाज येत असेल तरी पण खाली 'ऑईल' टाकायला जातात.

**दादाश्री :** हो, जातात. दखल करण्याची गरज नाही. काय चालले आहे, ते 'पाहत' राहावे. आणि आपण जर दखल केली तर आपली काय दशा होईल? जे होत आहे ते चालू द्यावे.

**प्रश्नकर्ता :** चुकीचे असेल तरी चालू द्यावे?

**दादाश्री :** काय बरोबर आणि काय चूक हे चालवणारे तुम्ही कोण? माणसात चालविण्याची शक्ती नाही. 'मी चुकीचे चालूच देणार नाही' असा तो खोटा अहंकार करतो, त्यामुळे उलट भांडणे होतात, ढवळाढवळ होते. कोणाकडून जर काही चूक होत असेल तर आपण त्याला समजावून सांगितले पाहिजे, नाही तर गप्प बसले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** पण आमच्यावर अन्याय होत असेल तर?

**दादाश्री :** अन्याय झाला तर निवांतपणे सहन करा! नाहीतरी तुम्ही जाणार कुठे? कोर्टात जाऊन वकील शोधा, वकील मिळतात ना?

**प्रश्नकर्ता :** वकील आणणे, याला दखल (ढवळाढवळ) केली असेच म्हटले जाईल ना?

**दादाश्री :** मग परत वकील तुम्हाला ओरडेल, 'बेअक्कल, मूर्ख लोक, साडे दहा वाजता आलात? अगोदर का नाही आलात?' तो अशा शिव्या देईल. म्हणूनच त्यापेक्षा सरळ राहून आपसातच मिटवून टाका ना.

दखल करण्यात काहीच अर्थ नाही. हा काळ विचित्र आहे. चांगल्या तऱ्हेने बोलताना मी कोणाला पाहिलेलेच नाही. असे बोलतात की आपले डोकेच दुखते. याला काय बोलणे म्हणतात का?

**प्रश्नकर्ता :** या हिशोबाने तर चांगले म्हणणे किंवा वाईट म्हणणे ती पण दखलच झाली ना?

**दादाश्री :** काही बोलूच नये. ते विचारतील तेवढीच उत्तरे द्या. लांब पाल्हाळ लावू नका. आपल्याला काय देणेघेणे? नाहीतर याचा अंतच येणार नाही.



## [ 24 ]

## अबला पुरुषार्थ कसा करील?

**प्रश्नकर्ता :** क्रोध आला तर तो दाबावा की बाहेर काढून टाकावा?

**दादाश्री :** क्रोध दाबून दाबला जाईल अशी गोष्ट नाही. आज दाबाल, उद्या दाबाल, स्प्रिंग खूप दाबून ठेवली तर काय होईल? एक दिवस ती पूर्ण उसळेल. सध्या तुम्ही क्रोध तात्पुरता दाबता ते ठीक आहे, परंतु कधीतरी त्यामुळे नुकसान होईल. भगवंतांनी सांगितले होते की क्रोधाचे विचारपूर्वक पृथ:करण करा. तसे तर विचारपूर्वक करण्यात खूप जन्म निघून जातील. विचार करण्यापूर्वीच क्रोध येऊन जातो. जर खूप जागृती असेल तरच क्रोध येत नाही, पण तशी जागृती आम्ही जेव्हा येथे 'ज्ञान' देतो तेव्हाच उत्पन्न होते. मग क्रोध-मान-माया लोभ आपापल्या बाउन्ड्रीत (मर्यादेत) येतात. जागृती उत्पन्न होते. म्हणून तुम्हाला क्रोध येण्यापूर्वीच जागृती येते आणि पृथ:करण होऊन कोण गुन्हेगार आहे हे सर्व समजून येते. खरोखर नक्की काय झाले ते समजते, ते समजले की मग क्रोध होतच नाही ना?

क्रोध करणे आणि भिंतीवर डोके आपटणे, ह्या दोन्ही गोष्टी सारख्याच आहेत. त्यात अजिबात फरक नाही. क्रोध-मान-माया-लोभ, या सर्व गोष्टी म्हणजे कमकुवतपणा आहेत. आणि हा कमकुवतपणा गेला तर परमात्मा प्रकट होतील. कमकुवतपणाच्या रूपात आवरण आहे.

शिवाय 'प्रिज्युडिस' (पूर्वग्रह) पण खूप असतात. एका व्यक्तीला तुम्ही जसे मानून बसता, तसाच तो तुम्हाला कायमचा वाटत राहतो. पण तो तसा कायमचा राहत नाही. क्षणोक्षणी परिवर्तन होत असते. सर्व जग हे परिवर्तनशील आहे. निरंतर परिवर्तन होतच असते.

हा कमकुवतपणा स्वतः घालवू पाहाल तर थोडा पण कमी होणार नाही, उलट आणखी वाढेल, म्हणूनच ज्यांचा कमकुवतपणा गेला आहे, त्यांच्याकडे जा, तर निराकरण होईल. संसाराचे निराकरण होतच नाही. सर्व जग सतत भटकत आहे. त्याचे कारण हेच आहे की तरणतारण पुरुष भेटावे लागतात. तुम्हाला पैलतीरी जायचे आहे हे नक्की आहे ना?

## गुंता नसलेला व्यवहार, तोच सरळ मोक्षमार्ग

**दादाश्री :** आता हा जो कमकुवतपणा आहे, हे जे क्रोध-मान-माया-लोभ, राग-द्वेष आहेत, ते काय काय काम करतात? कोणत्या भूमिका पार पाडतात?

**प्रश्नकर्ता :** हैराण करून टाकतात. राग येतो. नंतर जागृती येते की आपण ही चूक केली. मग त्यासाठी प्रतिक्रमण करण्याची गरज आहे का?

**दादाश्री :** तुमच्या रागामुळे समोरच्याला दुःख झाले असेल किंवा त्याचे काही नुकसान झाले असेल, तर तुम्ही चंदुभाईला सांगायला हवे की 'हे चंदुभाई, प्रतिक्रमण करा, माफी मागा.' समोरचा माणूस जर सरळ नसेल आणि आपण जर त्याच्या पाया पडलो तर तो उलट आपल्याला डोक्यावर मारील आणि म्हणेल बघा, आता कसा सरळ झाला!

मोठे आले सरळ करणारे! अशा लोकांबरोबर भानगड कमीच करून टाकली पाहिजे. पण त्याचा गुन्हा तर माफ करायलाच हवा. तो कितीही चांगल्या किंवा वाईट भावाने तुमच्याजवळ आला असेल तरी त्याच्याशी कसे वागायचे ते तुम्ही ठरवावे. समोरच्याची प्रकृती वाकडी असेल तर आपण त्याच्याशी डोकेफोड करायची नाही. तो जर प्रकृतीनेच

चोर असेल, दहा वर्षे तुम्ही त्याला चोरी करत असलेला पाहिला असेल आणि तो येऊन तुमच्या पाया पडला तर काय तुम्ही त्याच्यावर विश्वास ठेवायला हवा? विश्वास ठेवूच शकत नाही. चोरी करतो, त्याला आपण माफ करावे आणि म्हणावे 'तू जा आता, तू सुटलास, तुझ्याबद्दल माझ्या मनात आता काहीही नाही' पण त्याच्यावर विश्वास ठेवू नये, आणि परत त्याची संगतही ठेवू नये. आणि जर परत संगत ठेवली, आणि विश्वास ठेवला नाही तर तो मात्र गुन्हा आहे. खरे म्हणजे संगत ठेवूच नये आणि ठेवलीच तर मग त्याच्याबद्दल पूर्वग्रह ठेवता कामा नये. मग 'जे घडले ते ठीक' असे समजावे.

हे तर खूप सूक्ष्म 'सायन्स' आहे. अजूनपर्यंत असे 'सायन्स' प्रकट झालेले नाही. इथली प्रत्येक गोष्ट म्हणजे अगदी नवेच डिजाईन आहे, आणि साऱ्या जगाला उपयोगी पडेल असे आहे.

**प्रश्नकर्ता :** यामुळे सर्व व्यवहार सुधारेल का?

**दादाश्री :** हो, व्यवहार सुधारेल आणि लोकांचा 'मोक्षमार्ग' सरळ होईल. व्यवहार सुधारणे हाच सरळ 'मोक्षमार्ग' आहे. इथे तर लोक 'मोक्षमार्ग' मिळवायला जातात आणि व्यवहार बिघडवतात. दिवसेंदिवस व्यवहार जास्त गुंतागुंतीचे करतात.

बडोद्याहून अहमदाबाद उत्तर दिशेला 80 मैलावर आहे, असे म्हटले असेल पण लोक दक्षिण दिशेने चालू लागले तर किती मैल वाढतील? मग थेट कन्याकुमारीपर्यंत किती मैल होतील? गाडीचा वेग कितीही वाढवला तरी अहमदाबाद जवळ येईल की दूर जाईल?

**प्रश्नकर्ता :** दूर जाईल.

**दादाश्री :** याच प्रकारे लोकांनी व्यवहार गुंतागुंतीचे केले आहेत. तऱ्हेतऱ्हेचे जप-तप कशासाठी? म्हणून तर 'अखा भगत' यांनी ओरडून सांगितले की 'त्याग-तप हे सर्व वाकड्या गल्ल्या' आहेत. वाकड्या गल्लीत घुसलात की संपले सर्व. आता जर त्या वाकड्या गल्लीत

घुसलेल्यांना विचारले तर ते सांगतील, 'नाही, आम्ही तर मोक्षमार्गातच आहोत.' इथे जर भगवंत आले आणि आपण त्यांना विचारले, 'असे कसे साहेब? हे दोघे वेगळेवेगळे सांगत आहेत. यातील कोण बरोबर आहे?' तर भगवंत सांगतील, 'जे लोक याला वाकडी गल्ली म्हणतात तेही चुकीचे आहे आणि जे लोक हाच 'खरा मोक्षमार्ग आहे' असे म्हणतात, तेही चुकीचे आहे.'

भगवंतांच्या सांगण्याचा भावार्थ हा आहे की, बाबा, तो वाकड्या गल्लीत असला तरी तुला काय त्रास? तू तुझ्या परीने दर्शन घे ना? भगवंत खूप शहाणे होते. त्यांच्यात खूप शहाणपण असते, ते किंचितही चुकत नाहीत!

## कषायांमुळे कर्मबंधन

**प्रश्नकर्ता :** नावासाठी मोह का असतो?

**दादाश्री :** कीर्तीसाठी! त्यामुळेच तर आजपर्यंत मार खात आले आहोत ना? नावाचा मोह, त्याला कीर्ती म्हणतात. कीर्तीसाठी मार खाल्ला. आणि जेव्हा कीर्तीच्या पाठोपाठ अपकीर्ती येते, तेव्हा भयंकर दुःख होते. म्हणून आपल्याला कीर्ती आणि अपकीर्ती यापासून दूर राहायला हवे. नावाचा पण मोह असता कामा नये. स्वतःमध्येच अपार सुख आहे.

मान आणि क्रोध, हे दोन्ही द्वेष आहेत, माया आणि लोभ, हे राग आहेत. कपट रागात मोडते.

**प्रश्नकर्ता :** एखाद्याच्या भीतीमुळे कपट करावे लागले तर?

**दादाश्री :** त्याला हरकत नाही. ते दुसऱ्यांचे जास्त नुकसान करणारे नाही ना? कपट, याचा आधार ते 'दुसऱ्यांचे किती नुकसान करत आहे?' यावर असते. तुम्ही जर सत्संगाला जाण्यासाठी कपट कराल तर ते कपट मानले जाणार नाही, कारण कुसंग तर बाहेर भरपूर पडलेलाच आहे.

**प्रश्नकर्ता :** कपटाचे निमित्त आले म्हणूनच कपट करण्याचा भाव आला ना?

**दादाश्री :** नाही, असे नाही.

**प्रश्नकर्ता :** भावकर्माचे बंधन होण्यासाठी कपटाचे निमित्त येते का?

**दादाश्री :** फक्त कपटच नाही, त्यात क्रोध-मान-माया-लोभ चारही गोष्टी येतात. त्यामुळे त्याचे दर्शन आंधळे होते. आणि मग त्या दर्शनाच्या आधारे तो सर्व कामे करतो. जेव्हा आम्ही ज्ञान देतो तेव्हा आम्ही ते (आंधळे) दर्शन नष्ट करतो. कितीतरी पापे नष्ट झाल्यामुळे ते दर्शन नष्ट होते, आणि ते दर्शन नष्ट झाले म्हणजेच काम झाले!

क्रोध-मान-माया-लोभ, यामुळे हे जग चालू राहिले आहे, विषयांच्यामुळे नाही. संसाराचे 'रूट कॉझ' (मूळ कारण) क्रोध-मान-माया-लोभ हे आहेत.

**प्रश्नकर्ता :** क्रोध-मान-माया-लोभ येतात, तेव्हा जर स्वत: जागृत अवस्थेत असेल तर मग त्याचे कर्मबंध पडणार नाहीत ना?

**दादाश्री :** जागृती राहीलच कशी? तो स्वत:च आंधळा आहे, आणि त्याने दुसऱ्यांना आंधळे केले आहे. जोपर्यंत उजेड होत नाही, समकित होत नाही, तोपर्यंत जागृत आहे असे म्हणता येणार नाही ना? समकित झाल्यावरच काम होते. जोपर्यंत समकित होत नाही तोपर्यंत संयम पण नसतो. वीतरागींनी सांगितलेला संयम कुठेच नाही, हा तर लौकिक संयम आहे.

**प्रश्नकर्ता :** तो स-राग चारित्र्य आहे?

**दादाश्री :** स-राग चारित्र्य तर खूपच उच्च गोष्ट आहे, ज्ञानी स-राग चारित्र्यात असतात आणि जेव्हा ज्ञानी संपूर्ण वीतराग होतात, तेव्हा वीतराग चारित्र्य येते.

संयम कशाला म्हणतात? विषयांच्या संयमाला त्याग म्हणतात. भगवंतांनी फक्त कषायांच्या संयमाला संयम म्हटले आहे. कषायांच्या संयमानीच हे सर्व सुटते, असंयमामुळे तर बंधन आहे. विषय तर समकित

झाल्यावरही असतात, पण ते विषय गुणस्थानकात पुढे जाऊ देत नाहीत, तरी पण त्याला हरकत नाही असे म्हटलेले आहे. कारण त्यामुळे समकित निघून जात नाही.

## 'देखत भूली' टळली तर...

'अक्रम विज्ञान' काय म्हणते?

फर्स्ट क्लास हापूस आंबे पाहायला हरकत नाही, त्यांचा सुगंध तुम्हाला आला त्याला पण हरकत नाही, पण ते भोगायची इच्छा करू नका. ज्ञानी पण आंबे पाहतात, त्यांचा सुगंध घेतात. म्हणजे जे विषय भोगले जातात ते 'व्यवस्थित'च्या हिशोबानुसार भोगले जातात, ते तर 'व्यवस्थित'च आहे! पण विनाकारण बाहेर आकर्षण होणे याला काय अर्थ आहे? जे आंबे घरी येणारच नसतात, त्यांच्यासाठी पण आकर्षण होत असते. इतर सगळीकडे आकर्षण होणे यात जोखीम आहे. त्यामुळे कर्मबंधन होते.

पाहाण्यास हरकत नाही, पण भावाला हरकत आहे. तुम्हाला भोगायचे भाव उत्पन्न होतात त्याला हरकत आहे. पाहण्यास, खाण्यास, सुगंध घेण्यास काहीच हरकत नाही. संसारात 'खा, प्या, सर्व काही करा', पण त्याच्यावर आपले भाव उत्पन्न होता कामा नयेत.

म्हणून कृपाळूदेवांनी म्हटले आहे की, 'देखत भूली टळे (पाहण्यामुळे झालेली चूक टळली) तर सर्व दु:खांचा क्षय होईल.' पाहतो आणि विसरून जातो. यासाठी आपले हे 'ज्ञान' दिले आहे. त्यानंतर ही 'देखत भूली' बंद होते! आपण तर समोरच्या व्यक्तीत शुद्धात्माच पाहतो, मग आपल्याला दुसरा भाव का उत्पन्न होईल? नाही तर माणसांना कुत्र्यावर पण राग (मोह, आसक्ती) होतो, खूप सुंदर असेल तर त्याच्यावर राग होतो. आपण जर 'शुद्धात्मा' पाहिला तर राग होईल का? म्हणून आपण शुद्धात्मेच पाहायचे. ही 'देखत भूली' बंद होईल अशी नाहीच. आणि जर बंद झाली तर सर्व दु:खांचा क्षय होऊन जाईल. जर दिव्यचक्षु असतील तर ही 'देखत भूली' बंद होईल, नाहीतर कशी बंद होईल?

**प्रश्नकर्ता :** 'देखत भूली' टळली तर काय होईल?

**दादाश्री :** 'देखत भूली' टळली तर सर्व दु:खांचा क्षय होईल, मोक्ष होईल.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ राग पण होता कामा नये आणि विसरून जायला हवे?

**दादाश्री :** आपले हे ज्ञान असे आहे की राग होईल असे तर होतच नाही, परंतु जेव्हा आकर्षण होते तेव्हा त्याचा शुद्धात्मा पाहिला की मग आकर्षण होणार नाही. 'देखत भूली' म्हणजेच पाहिल्याबरोबरच चूक करणे! जोपर्यंत पाहिलेच नाही तोपर्यंत चूक होतच नाही. जोपर्यंत तुम्ही खोलीत बसलेले असता, तोपर्यंत काहीच होत नाही. परंतु लग्नसमारंभाला गेलात की मग परत चुका सुरू होतात. तिथे तुम्ही शुद्धात्मा पाहत राहिलात तर दुसरा कुठला भाव उत्पन्न होत नाही आणि पूर्वकर्माच्या धक्क्यांमुळे जर भाव उत्पन्न झालाच तर त्यासाठी प्रतिक्रमण करणे हाच उपाय आहे. जोपर्यंत इथे घरी बसला होतात तोपर्यंत मनात कोणतेच वाईट विचार आले नव्हते, परंतु कुठे लग्नाला गेलात की 'विषयविकाराचे' विचार उत्पन्न होतात, संयोग मिळाला की विचार उत्पन्न होतात. ही 'देखत भूली' फक्त दिव्यचक्षु मिळाले की मगच दूर होऊ शकेल अशी आहे. दिव्यचक्षूंशिवाय ती टळू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे संयोग टाळायला हवेत असे म्हणायचे का? तर मग एकाच जागी बसून राहायचे का?

**दादाश्री :** नाही, आपले विज्ञान तर वेगळ्याच प्रकारे आहे. आपण तर 'व्यवस्थित'मध्ये जे असेल ते असो, पण तेव्हा आज्ञेत राहायला हवे. जिथे निखारे असतात, तिथे आज्ञेत राहतो की नाही? निखाऱ्यांना तर चुकूनही स्पर्श करत नाही. असेच त्याला विषयाच्या बाबतीत पण जपून राहावे लागेल, कारण हे पण निखारे आहेत, प्रकट अग्नि आहे. 'या जगात आकर्षण वाटते अशा सर्व गोष्टी म्हणजे प्रकट अग्नि आहेत', म्हणून तिथे सावध राहायला हवे.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ असा की आपण जे पाहतो ते आपले नसते, तरी त्यावर भाव उत्पन्न होतो, तो होता कामा नाही, असेच ना?

**दादाश्री :** ते आपले नसतेच, पुद्‌गल आपले नसतेच. हे आपले पुद्‌गलसुद्धा 'आपले' नाही, तर त्याचे पुद्‌गल आपले कसे असेल?

आकर्षण म्हणजे प्रकट अग्नि. भगवंतांनी तर आकर्षणाला मोह म्हटले आहे. मोहाचे मूळ आकर्षण हेच आहे. तुम्ही तर समोरच्यात शुद्धात्मा पाहता, पण तरीही जर भाव उत्पन्न झाला असेल, आकर्षण झाले असेल, तर प्रतिक्रमणाने उपटून टाकता येते. असे सगळे समजून ध्यानात ठेवायला हवे ना? औषधाची माहिती तर असली पाहिजे ना? यावर कोणते औषध आहे हे जाणून घेतले पाहिजे ना?

हे विज्ञान आहे. संपूर्णभावे विज्ञान आहे. निखाऱ्यांना का स्पर्श करत नाही? तिथे का सावध राहता? कारण त्याचे फळ लगेच मिळते आणि विषयाच्या बाबतीत तर प्रथम तर लालसा होते, म्हणून त्या लालसेत अडकून जातो. ह्या निखाऱ्यांना स्पर्श केलेला एकवेळ चांगला, कारण त्यावर उपाय आहे. काहीतरी मलम लावले तर आग कमी होते. परंतु विषय तर आताही लालसेत फसवतो आणि मग पुढचा जन्म पण दाखवतो. तो तर आपल्या ज्ञानाला पण धक्का मारील असा आहे. हे असे मोठे विज्ञान आहे, याला पण धक्का मारील, असा आहे, म्हणून सावध राहा.

खायच्या-प्यायच्या गोष्टीत आकर्षण झाले तर हरकत नाही. आंबे खायचे तर खा. जिलेबी खा, लाडू खा. तिथे कोणी दावा मांडणारा नाही ना? 'वन साईडेड - एकतर्फी' असेल तर हरकत नाही. 'दुतर्फी' झाले तर जबाबदारी येते. तुम्ही म्हणाल मला आता नको, तर ती म्हणेल मला आता हवे आहे. तुम्ही म्हणाल मला आता माथेरानला जायचे नाही, तर ती म्हणेल मला माथेरानला जायचे आहे. यामुळे उपाधी होईल. आपले स्वातंत्र्य हिरावून जाईल. म्हणून सावध राहावे! ही फार समजून घेण्यासारखी गोष्ट आहे. याला सूक्ष्मपणे नीट समजून घेतली तर काम होईल.

**प्रश्नकर्ता :** सिनेमा, नाटक, साड्या, घर, फर्निचर यांचा जो मोह आहे, त्याला हरकत नाही ना?

**दादाश्री :** त्याला काही हरकत नाही. फारच झाले तर त्यामुळे तुम्हाला त्रास होईल. फार तर 'हे' (आत्म) सुख येणे थांबेल. पण यात कोणी तुमच्याविरुद्ध तक्रार करणारा नाही ना? आणि विषयवाला तर क्लेम (दावा) करील. म्हणून सावध राहा.

## 'वाहवा'चे जेवण

**प्रश्नकर्ता :** मी जे दान देतो, त्यात माझा धर्माचा, चांगले काम करण्याचा भाव असतो. त्यात लोकांनी वाह-वाह केली तर मग ते (दान) पूर्णपणे नष्ट होईल ना?

**दादाश्री :** यात मोठी रक्कम दिली असेल तर ती माहिती लोकांना कळते आणि त्याची वाह-वाह होते. आणि दानात अशा रकमा पण असतात की ज्या लोकांना कळत नाहीत आणि लोक त्यांची वाहवा करत नाहीत, आणि म्हणून त्याचा लाभही मिळतो! आपल्याला त्या झंझटीत पडायचेच नाही. आपल्या मनात असा भाव नाही की लोकांनी आपल्याला (वाहवाचे) जेवण घालावे. एवढाच आपला भाव असावा. जग तर महावीरांची पण वाह-वाह करत असे! पण 'ते' ती स्वीकारत नसत ना? या दादांची पण लोक वाहवा करतात, पण आम्ही ती स्वीकारत नाही आणि हे भुकेलेले लोक तर लगेच स्वीकार करतात. दानाचा पत्ता लागल्याशिवाय राहतच नाही ना? लोक तर वाहवा केल्याशिवाय राहतच नाहीत, परंतु जर त्याने ते स्वीकारलीच नाही तर काय समस्या आहे? स्वीकारली तरच रोग घुसेल ना? जे वाहवा स्वीकारत नाहीत त्यांना काहीच होत नाही. जे वाहवा स्वीकारत नाहीत त्यांचे काही नुकसान होत नाही. आणि जे कौतुक करतात त्यांना पुण्य मिळते. सत्कार्याला अनुमोदन दिल्याबद्दल पुण्य मिळते. म्हणजे या सर्व आतल्या गोष्टी आहेत. हे सर्व नैसर्गिक नियम आहेत.

जे कौतुक करतात, त्यांच्यासाठी ते कल्याणकारी आहे. आणि जे

ऐकतात, त्यांच्या मनात पण चांगल्या भावांचे बीज पडते की 'हो, असेही करण्यासारखे आहे. आम्हाला तर हे माहीतच नव्हते!'

**प्रश्नकर्ता :** आम्ही चांगले काम तन, मन, धन लावून करतो परंतु तरी पण लोक आमच्याबद्दल वाईटच बोलत असतील, अपमान करत असतील, तर त्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** जो अपमान करत आहे, तो भयंकर पापकर्म बांधत आहे. पण त्यामुळे आपले कर्म धुतले जात आहे. आणि अपमान करणारा तर फक्त निमित्त आहे.

## प्रतिक्रमणाचा गहनपणा!

**प्रश्नकर्ता :** यात आम्हाला कधी-कधी वाईट वाटते की मी इतके सर्व करतो, तरी हा माझा अपमान करतो.

**दादाश्री :** तुम्ही त्यासाठी प्रतिक्रमण करायला हवे. हा तर व्यवहार आहे. यात सर्व प्रकारचे लोक असतात. ते आपल्याला मोक्षाला जाऊ देत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** आम्ही का प्रतिक्रमण करायचे?

**दादाश्री :** प्रतिक्रमण यासाठी करायचे की 'हा माझ्याच कर्माचा उदय होता आणि त्यामुळे त्याला असे कर्म बांधावे लागले. त्यासाठी मी प्रतिक्रमण करतो, आणि पुन्हा कधी मी असे करणार नाही की ज्यामुळे माझ्या निमित्ताने कोणाला असे कर्म बांधावे लागेल. यासाठी हे प्रतिक्रमण करायचे आहे.

कोणाला मोक्षाला जाऊ देईल असे हे जग नाही. सर्व प्रकारे हे आकडे आपल्याला खेचून घेऊनच येतात. आपण जर प्रतिक्रमण केले तर ते आकडे सुटतील. म्हणून महावीर भगवंतांनी आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान, या तीनही गोष्टी एकाच शब्दात दिल्या आहेत. दुसरा मार्गच नाही. पण 'स्वत:' प्रतिक्रमण केव्हा करू शकेल? तर स्वत:

जागृत असेल तेव्हाच; 'ज्ञानी पुरुषां'कडून ज्ञान प्राप्त झाल्यावर जागृती उत्पन्न होते.

तुम्ही प्रतिक्रमण करून घ्यावे, जेणे करून तुम्ही जबाबदारीतून सुटाल.

सुरुवातीला तर सगळे जण माझ्यावर 'ॲटॅक' (हल्ला) करत असत ना? पण शेवटी सर्व थकले! जर आपण पण समोरच्यावर हल्ला केला तर मात्र समोरचा थकणार नाही!

हे जग कोणाला मोक्षाला जाऊ देईल असे नाही. इतके अधिक बुद्धीवाले जग आहे. यात जर सावध राहून चालाल, आकसून चालाल तर मोक्ष मिळवाल!

## शुद्धात्मा आणि प्रकृतीचे परिणाम

'स्वत:च्या स्वरूपाचे' भान आल्यावर 'मी शुद्धात्मा आहे' असे बोलतो तेव्हापासूनच निर्विकल्प होऊ लागतो आणि त्याऐवजी जर कोणी 'मी असा आहे, मी तसा आहे' असे बोलला तर ते सगळे विकल्प आहेत, त्यामुळे संसार उत्पन्न होतो आणि शुद्धात्मा म्हणणारा निर्विकल्प पदात जातो. आता असे असले तरी या 'चंदुभाई'ची तर चांगली व वाईट दोन्ही कार्ये चालूच राहतील. तो उलटही करील आणि सुलटही करील. हा प्रकृतीचा स्वभाव आहे. फक्त उलट किंवा फक्त सुलट तर कोणी करूच शकत नाही. कोणी थोडे उलट करतो तर कोणी जास्त उलट करतो!

**प्रश्नकर्ता :** करायचे नसेल तरी पण होईल का?

**दादाश्री :** हो, होईलच. म्हणून 'मी शुद्धात्मा आहे' असे ठाम ठरवून हे सर्व उलट-सुलट पाहा! जर तुझ्या आत काही उलट-सुलट आले तर 'माझ्याकडून उलट झाले. माझा शुद्धात्मा बिघडला!' अशी कल्पना करायची नाही. शुद्धात्मा म्हणजे मुळात ते तुझेच स्वरूप आहे. हे जे उलट-सुलट होत आहे ते तर परिणाम आलेले आहेत. पूर्वी चुका

केल्या होत्या त्यांचे हे परिणाम आहेत. त्या परिणामांना 'पाहत' राहा. आणि हे उलट-सुलट तर या लौकिक भाषेत आहे. भगवंतांच्या भाषेत उलट-सुलट असे काही नाहीच.

**प्रश्नकर्ता :** जर भगवंतांच्या भाषेत उलट-सुलट असे काही नाहीच तर मग डोकेफोड करायला शिल्लकच काय राहिले?

**दादाश्री :** डोकेफोड करायची गरजच नाही. म्हणून मी म्हणतो की 'पाहा.' आणि कोणाला दु:ख होता कामा नये. जर दु:ख झाले तर त्याचे प्रतिक्रमण करा, असे भगवंतांनी सांगितले आहे.

**प्रश्नकर्ता :** जर भगवंतांच्या भाषेत उलट-सुलट असे काही नाहीच तर मग प्रतिक्रमण करायची गरजच काय?

**दादाश्री :** समोरच्याला दु:ख झाले म्हणून. समोरच्याला दु:ख होता कामा नये, ही भगवंतांची भाषा आहे ना?

**प्रश्नकर्ता :** पण आमचा आशय चांगला असतो, तरी पण ते दु:खी होत असतात?

**दादाश्री :** आशय चांगला असो, काहीही असो, पण त्याला दु:ख होता कामा नये. समोरच्याला दु:ख झाले तर कर्म चिकटेल. म्हणून समोरच्याला दु:ख होणार नाही, अशा तऱ्हेने त्याच्याशी वागावे.

**प्रश्नकर्ता :** लोकांना खरी गोष्ट आवडतच नाही, म्हणून मग बोलायला काही उरलेच नाही?

**दादाश्री :** नाही, खरी गोष्ट आवडत नाही, असे नसतेच. खरी गोष्ट, ही खरी गोष्ट आहे असे कधी मानले जाईल? फक्त सत्याकडेच पाहायचे नसते. त्याचे आणखी तीन पैलू असायला हवेत. सत्य हितकर असायला हवे. समोरचा खुश व्हायला हवा. तुमची गोष्ट उलट असो की सुलट, पण समोरचा खुश व्हायला हवा. पण त्यात तुमची नीयत खोटी असता कामा नये, आणि सत्य बोलण्यामुळे जर कोणाला दु:ख

होत असेल तर याचा अर्थ तुम्हाला सत्य बोलताच येत नाही. सत्य तर प्रिय, हितकारी आणि मित असले पाहिजे. मित म्हणजे समोरच्याला 'हे काका उगीचच बडबडत आहेत!' असे वाटता कामा नये. समोरच्याला आवडेल असे बोलणे तेच सत्य. ज्यांनी ज्यांनी या सत्याची कास धरली त्या सर्वांनी तो त्रास सोसलेला आहे.

**प्रश्नकर्ता :** मस्का मारणे, याला सत्य म्हणायचे का? 'हो ला हो म्हणणे?'

**दादाश्री :** त्याला सत्य म्हणत नाहीत. मस्का मारणे असे काही नसतेच. तो त्याचा स्वतःचाच शोध आहे. स्वतःच्या चुकीमुळे तो दुसऱ्याला मस्का मारतो. समोरच्याला फिट होईल (पटेल) असे आपण बोलले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** 'समोरच्याला कसे वाटेल', असा विचार करत बसलो तर कधी शेवट येणार?

**दादाश्री :** त्याचा विचार तुम्हाला करायची गरज नाही. तुम्ही तर चंदुभाईला म्हणावे की 'तू प्रतिक्रमण कर'. बस फक्त एवढेच सांगावे. हे 'अक्रम विज्ञान' आहे. म्हणून प्रतिक्रमण ठेवावे लागले आहे. हे सर्व फक्त समजून घ्यायचे आहे. हे तर विज्ञान आहे. म्हणून एकदा ही गोष्ट समजली की मग काहीही स्पर्श करणार नाही. आणि चंदुभाईला तुम्ही विचारले की 'तुम्ही शुद्धात्मा आहात की चंदुभाई?' तर ते सांगतील 'मी शुद्धात्मा आहे' बस, मग आणखी विचारायला उरलेच काय? मग तो जर वेडावाकडा वागेल, तर त्याचे सुख थांबेल, एवढेच!

जगात तुम्ही सर्वांना आवडू लागलात तर काम होईल. जगाला तुम्ही आवडत नसाल, तर ती तुमचीच चूक आहे. हे समजून घ्यायची गरज आहे. म्हणून 'ॲडजस्ट एव्हरीव्हेअर.' नाहीतर हा गोंधळ कधी संपणारच नाही ना? मी वेगळे बोलणार, तो वेगळे बोलणार, तर लोक ऐकणारच नाहीत ना? लोक म्हणतात की तुम्ही बोलता ते आम्हाला 'फिट' व्हायला हवे.

मला पुष्कळ लोक सांगतात की 'दादा, तुम्हाला हे येत असेल आणि ते येत असेल.' तेव्हा मी सांगतो, 'अरे बाबा, मला यातले काहीच येत नाही. म्हणून तर मी हे आत्म्याचे शिकलो.'

आपण विनाकारण लांबण लावण्याची काय गरज आहे? लांबण लावल्याने तर येता-येता पण लग्न होईल (आपापसात व्यवहार करत करत कर्मबंधन होईल) आणि जाताना पण लग्न होईल. म्हणजेच सगळे योग्य प्रकारे व्हायला हवे आणि उगाचच अति खोलात जायची पण गरज नाही.

आपण तर सर्वांना फिट होईल असे वागावे. माझे कोणाशी मतभेद होत नाहीत. मतभेद झाला तर मला लगेच समजते की माझी चूक आहे आणि मग मी लगेच जागृत होतो. तुम्ही माझ्याबरोबर कितीही वाकडे बोलत असाल, पण त्यात तुमची चूक नाही, चूक तर माझी आहे, सरळ बोलणाऱ्याची चूक आहे. मी असे कसे बोललो की त्यामुळे त्याच्याशी मतभेद झाला? म्हणजेच जगाशी कसे 'ॲडजस्ट' होता येईल हे पाहायचे आहे. तुम्ही समोरच्याचे हित पाहत असता, हॉस्पिटलमध्ये एखादा पेशंट असतो, तुम्हाला त्याचे संपूर्ण चांगले व्हावे असेच वाटत असते, म्हणून तुम्ही त्याला 'असे कर, असे करू नकोस' असे सांगत बसता, पण पेशंट (तेच तेच) ऐकून कंटाळून जातो, त्याला वाटते उगाच हे का त्रास देतात?

म्हणजेच ज्या पाण्याने मूग शिजू शकतील, त्या पाण्याने मूग शिजवावेत. आजव्याच्या (बडोद्यातील एका तळ्याचे नाव) पाण्याने शिजले नाहीत तर आपण दुसरे पाणी वापरावे, विहिरीचे वापरा, आणि तरी पण शिजले नाहीत तर गटाराचे पाणी वापरून देखील मूग शिजवा. काहीही करून आपले मूग शिजले पाहिजेत. आपल्याला तर मूग शिजायशी काम आहे.

## समोरच्याला समाधान द्या

आपण सर्वांनी काय शिकायचे आहे की मतभेद होता कामा नयेत,

असे वर्तन हवे. मतभेद झाले, म्हणजे तुमचीच चूक, तुमचाच कमकुवतपणा. आपल्याकडून समोरच्याचे समाधान व्हायलाच हवे. त्याचे समाधान करणे ही आपली जबाबदारी आहे.

तुम्हाला समोरच्याचे समाधान करता आले नाही तर तुम्हाला काय वाटते? समोरच्याला कमी समज आहे, असेच वाटते ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** एखाद्याशी तुमचा वादविवाद झाला, त्यावेळी तुम्ही माघार घेऊनही समोरच्याचे समाधान होईल असे वागायला हवे. जर तुम्ही समजदार असाल तर तुम्हीच माघार घ्या आणि समाधान करा (वाद मिटवा). आणि जर तुम्ही माघार घेतली नाही तर मात्र तुम्ही समजदार नाहीत. समोरचा तर माघार घेणार नाहीच. म्हणूनच मी कोणाला माघार घ्यायला लावत नाही. उलट मीच त्याला म्हणतो 'बाबा रे मीच माघार घेईन, बरे का!' आपण सरळ राहावे.

अकरा वाजता जर तुम्ही मला म्हणालात, की 'तुम्ही आता जेवून घ्या.' मी विचारेन, 'थोड्या वेळाने जेवलो तर नाही का चालणार?' मग तुम्ही मला म्हणाल, 'नाही, जेवण करून घ्या म्हणजे काम आटपेल. तर मग मी ताबडतोब जेवायला बसेन. मी तुमच्याबरोबर 'ॲडजस्ट' होईन. जो 'ॲडजस्ट' होत नाही त्याला लोक मूर्ख म्हणतील. जर तुम्ही प्रत्येक गोष्टीत 'ॲडजस्ट' झाला नाहीत, तर समोरची व्यक्ती तुमच्याबद्दल काय अभिप्राय देईल?

समज कशाला म्हणतात? तर जी फिट होते ती समज! मग ती बरोबर आहे की चूक आहे हे पाहायचे नाही. आणि जी फिट होत नाही तिला चुकीची समज म्हणतात. ही एकच गोष्ट समजून घ्यायची आहे.

**प्रश्नकर्ता :** चैतन्य तर इंद्रिय ज्ञानाच्या खूपच पुढे आहे ना? चैतन्य असेल तर संघर्ष होणारच नाही.

**दादाश्री :** नाही, संघर्ष तर होताच कामा नये. जिथे संघर्ष असेल तिथेच आपली चुकीची समज आहे. यात चैतन्याचा प्रश्नच नाही. चैतन्य, चैतन्यच आहे. आणि संघर्ष तर चुकीची समज भरलेली आहे म्हणून होत असतो! चुकीची समज का उत्पन्न होते? कारण आतमध्ये अहंकाराचे मूळ आहे, म्हणून. जोपर्यंत अहंकाराचे मूळ आहे, तोपर्यंत खाली-वर असे होतच राहणार! ते मूळ आपल्याला त्रास देते, हैराण करते, चैनच पडू देत नाही. म्हणूनच आपण हळूच त्या अहंकाराचे मूळ उपटायला हवे. कोणी काही बोलले तर लगेच आतमध्ये अहंकाराचे मूळ उभे राहते, मग ते चैनच पडू देत नाही. त्याला दाबण्याचा खूप प्रयत्न करतो, तरी पण बैचेनीच वाटते.

त्याऐवजी आपल्याला 'हम कुछ नहीं जानते' (आम्हाला काही समजत नाही) असा भाव आला, तर बस! आपण 'शुद्धात्मा' स्वरूपाने ज्ञानी आहोत आणि व्यावहारिक रीत्या असे आहोत.

## असमाधानाच्या वेळी ॲडजस्टमेंट की प्रतिक्रमण?

**प्रश्नकर्ता :** एखादी व्यक्ती आज्ञापूर्वक म्हणाली की तुम्ही असे करा आणि त्या व्यक्तीवर जर आमचा विश्वास नसेल, तर अशावेळी प्रकृती 'ॲडजस्ट' होत नाही, मग काय करावे?

**दादाश्री :** विश्वासाशिवाय तर या जमिनीवर दोन पावले पण टाकता येणार नाहीत. 'ही जमीन पोकळ आहे' असे कळले तर तिथे कोणी जाणारच नाही ना! या स्टीमरला भोक पडले आहे; असे कळले तर त्या स्टीमरमध्ये कोणी बसेल का?

**प्रश्नकर्ता :** पण ज्ञानानंतर जी सहजता राहायला हवी आणि समोरच्याशी ॲडजस्ट होता यावे, तसे जर होत नसेल तर काय करावे?

**दादाश्री :** असे होत असेल तर असे 'पाहावे'! 'आपण' तर फक्त 'चंदुभाई' काय करत आहेत, ते पाहावे. असे आपले ज्ञान सांगते.

**प्रश्नकर्ता :** जर आपण समोरच्याबरोबर 'ॲडजस्ट' झालो नाही,

तर त्याला आपला आडमुठेपणा (अहंकाराचा वाकडेपणा) असे म्हणायचे का?

**दादाश्री :** नाही, असे काही नाही. समोरच्याचा हिशोब असेल त्याप्रमाणे सर्व घडते.

**प्रश्नकर्ता :** पण समोरच्या माणसाला 'हा माझा मान राखत नाही' याचे दु:ख तर होणारच ना?

**दादाश्री :** तर मग त्यासाठी तुम्ही 'चंदुभाई'कडून प्रतिक्रमण करून घ्यावे. त्यात आणखी काही अडचण नाही.

या भाज्यांचे किती प्रकार आहेत?

**प्रश्नकर्ता :** खूप खूप प्रकार आहेत.

**दादाश्री :** तसेच ही सर्व माणसे वेगवेगळ्या प्रकारची आहेत. त्यावर फक्त प्रतिक्रमण हाच एकमेव उपाय आहे.

**प्रश्नकर्ता :** तर मग अशा वेळी आपण आपले मत सोडून द्यावे की पकडून ठेवावे?

**दादाश्री :** काय घडत आहे ते 'पाहावे'.

**प्रश्नकर्ता :** कित्येकदा तर आमची पकड दोन-दोन, तीन-तीन दिवस चालते. त्यावेळी प्रकृती 'ॲडजस्ट' होत नाही, त्याचा खेद वाटतो.

**दादाश्री :** तुमची प्रकृती कोणाला त्रासदायक होत असेल तर प्रतिक्रमण करवून घ्या. प्रकृती तर तऱ्हेतऱ्हेचे दाखवत राहते.

**प्रश्नकर्ता :** परंतु अशा वेळी समजा आपण 'ॲडजस्ट' होऊ शकलो नाही आणि समोरच्याला दु:खच होत असेल, तर मग काय करावे? आम्ही 'ॲडजस्ट' व्हावे का?

**दादाश्री :** आपण तर फक्त प्रतिक्रमणच करायचे आहे. 'ॲडजस्ट' व्हायचेही नाही आणि होता येत पण नाही. आपल्याला ॲडजस्ट व्हायचे

असेल तरी होता येत नाही, तिकीट चिकटतच नाही. तू सतत चिकटवत राहिलास तरी पण ते पडून जाते. म्हणून समोरच्याला आपल्याकडून दु:ख होवो की सुख होवो, आपण मात्र प्रतिक्रमण करायला हवे.

कोणाला दु:ख होत असेल म्हणून आपण 'ॲडजस्ट' व्हायलाच पाहिजे असे कुठेही लिहिलेले नाही. आणि असे 'ॲडजस्ट' होता येत पण नाही. 'ॲडजस्ट' व्हायचे आहे असा भाव, असा अभिप्राय असताच कामा नये.

**प्रश्नकर्ता :** हे समजले नाही, जरा पुन्हा समजावून सांगा.

**दादाश्री :** 'ॲडजस्ट' व्हायचा अभिप्राय असताच कामा नये. जिथे 'ॲडजस्ट' होणे शक्यच नसेल तिथे मग 'ॲडजस्ट' होण्याचा अभिप्राय काय कामाचा? त्यापेक्षा प्रतिक्रमण करा, ते सर्वात उत्तम आहे! 'ॲडजस्ट' व्हावे असा भाव पण चांगला नाही. हा सगळा संसार आहे. या रूपात किंवा त्या रूपात, सगळा संसारच आहे. यात धर्मही नाही आणि आत्माही नाही.

**प्रश्नकर्ता :** 'फाइल्स्'चा समभावाने निकाल झाला नाही तर समोरच्या व्यक्तीला दु:ख होईल.

**दादाश्री :** त्याचा निकाल दहा दिवसांनी होईल, आज महागाईत निकाल झाला नाही, तर जेव्हा स्वस्त होईल तेव्हा होईल. त्यासाठी आपण रात्रभर जागण्याची गरज नाही. आपण 'शुद्धात्मा' आहोत, प्रथम स्वत:चे काम करून घ्यावे, आणि दुसऱ्यांना दु:ख झाले तर त्यासाठी प्रतिक्रमण करावे. दुसऱ्या कुठल्याच भानगडीत पडायचे नाही. तू जे करायला सांगत आहेस, तसे जर 'ज्ञानी पुरुषां'नी केले तर मग त्याचा शेवट कधी होणार? अशा किती भानगडी?

**प्रश्नकर्ता :** तुम्ही सांगितलेत की समोरच्याबरोबर 'ॲडजस्ट' व्हायचा भाव पण करता कामा नये. त्याचा अर्थ असा की दुसऱ्याबरोबर 'ॲडजस्टमेंट' करण्याच्या भावात तन्मयाकार होण्याची गरज नाही, 'सुपरफल्युअस' (वरकरणी) करावे, असे तुम्हाला म्हणायचे आहे का?

**दादाश्री :** 'ॲडजस्टमेंटस्' खूप प्रकारची असतात. काही 'ॲडजस्टमेंटस्' तर करण्यासारखीच नसतातच. पण काही 'ॲडजस्टमेंटस्' करण्यासारखी असतात, पण त्यासाठी तसा भाव ठेवायची गरज नाही. 'काय होत आहे' ते फक्त 'पाहत' राहावे. एवढे केले तर एका जन्मात सुटू शकाल. थोडेसे उधार बाकी राहिले तर ते पुढच्या जन्मात चुकते होईल.

यात मनात विचारांचा पीळ बसता कामा नये. विचारांचे वादळ निर्माण होत असेल तर ती गोष्ट बंद करा. वादळ निर्माण झाले तर प्रथम आतमध्ये खूप दु:ख होते, घाबरायला होते आणि जास्त वादळे निर्माण झाली तर काळजी वाटू लागते. म्हणून तसे होण्याआधीच तो विषय बंद करावा, ही त्याची लेव्हल (पातळी) आहे.

**प्रश्नकर्ता :** पण कित्येकदा काय होते की समोरच्या व्यक्तीला दु:ख वाटते आणि त्याच्या मनाचे समाधान होतच नाही!

**दादाश्री :** त्याचे समाधान कदाचित वर्षभर पण होणार नाही. त्याला आपण काय करू शकतो? आपण मनात असा भाव ठेवावा की समोरच्या व्यक्तीचे समाधान होईल अशी वाणी निघावी. जर उलट बोलले गेले असेल तर प्रतिक्रमण करायला हवे. नाहीतर या संसाराचा अंत येणारच नाही. उलट हेच आपल्याला फरपटत घेऊन जातील. समोरचा तलावात पडला असेल तर तो तुला पण त्यात ओढून घेईल! आपण आपली सेफसाईड (सुरक्षितता) ठेवून सर्व काम केले पाहिजे. या संसारात आता खोल उतरण्यासारखे काही नाहीच. हा तर संसार आहे. जिथून कापाल तिथून अंधाराच्याच 'स्लाईस' (फोडी) निघतील. जर कांदा कापला तर त्याच्या सर्व फोडी कांद्याच्याच निघतील ना?

प्रतिक्रमण करून पण कोणाचे समाधान होत नसेल तर पुढील जन्मात (हिशोब) चुकता होईल. परंतु आता तर आपण आपले काम करून घ्यावे. समोरच्याचे सुधारता सुधारता आपले बिघडणार नाही, हे सर्वात प्रथम पाहा. सब सबकी संभालो... सर्वांनी आपापले सांभाळावे!

**प्रश्नकर्ता :** संसारातील व्यवहार करताना शुद्ध आत्महेतू कसा सांभाळावा?

**दादाश्री :** तो सांभाळलेलाच आहे. तुला संभाळायची गरज नाही. 'तू' 'तुला' स्वत:लाच सांभाळ! 'चंदुभाई' स्वत:ला सांभाळतील!

**प्रश्नकर्ता :** अशी जागृती आल्यानंतर ती परत निघून जाणार नाही ना?

**दादाश्री :** नाही, ती निघून जाणार नाही. पण हा काळ विचित्र आहे. धूळ उडाली ना, तरी जागृती कमी होईल असे आहे, आणि शिवाय हे 'अक्रम विज्ञान' आहे, म्हणजेच कर्मे न संपवता मिळालेले ज्ञान आहे. ही कर्मे संपवताना तुमच्यावर धूळ उडेल. मला तर काही त्रास होत नाही. कारण माझी जास्त कर्मे शिल्लक नाहीत. आपले हे 'अक्रम विज्ञान' तर सर्व कर्मांना संपवून टाकेल असे आहे, मात्र आपली तयारी हवी. हे विज्ञान असे आहे की ते सर्व जगाची वादळे संपवू शकते, मात्र आपण त्यात स्थिर राहिलो तर! जर आपण ज्ञानात स्थिर राहिलो तर कोणी नावही घेणारा नाही.

हा तर जागृतीचा मार्ग आहे, आपण जागृत राहायला हवे. समोरच्याला दु:ख झाले तर त्याचे प्रतिक्रमण करणे हा उपाय आपल्याकडे आहे. आणखी काय करायचे? बाकी हा देह, मन आणि वाणी हे सर्व तर 'व्यवस्थित'च्या ताब्यात आहे.

## अप्रतिक्रमण, दोष प्रकृतीचा की अंतराय कर्माचा?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणे होत नाहीत हा प्रकृतीचा दोष आहे की हे अंतरायकर्म आहे?

**दादाश्री :** हा प्रकृतीदोष आहे. आणि हा प्रकृतीदोष सगळ्या बाबतीत होत नाही. काही बाबतीत होतो, काही बाबतीत होत नाही. प्रकृतीदोषामुळे प्रतिक्रमणे होत नसतील तर हरकत नाही. आपण फक्त इतकेच पाहावे की आपला भाव काय आहे? आणखी काही आपल्याला पाहायचे नाही. तुम्हाला प्रतिक्रमण करायची इच्छा आहे ना?

**प्रश्नकर्ता :** हो, अगदी पूरेपूर.

**दादाश्री :** तरी पण प्रतिक्रमणे होत नसतील, तर तो प्रकृती दोष आहे. प्रकृतीदोषासाठी तुम्ही जोखीमदार नाही. कधी कधी प्रकृती बोलते आणि कधी बोलतही नाही, हा तर बाजा आहे. वाजला तर वाजला, नाही वाजला तर नाही वाजला, याला अंतराय म्हणत नाहीत.

खूप जण मला म्हणतात, 'दादा, समभावाने निकाल करायला जातो, पण होत नाही.' तेव्हा मी म्हणतो, "अरे बाबा, निकाल करायचा नाही! तुला समभावाने निकाल करण्याचा फक्त भावच ठेवायचा आहे. समभावाने निकाल होईल किंवा होणारही नाही. ते तुझ्या आधीन नाही. तू 'माझ्या आज्ञेत रहा ना!' त्यामुळे तुझे बहुतेक सर्व काम पूर्ण होईल, आणि जर पूर्ण झाले नाही तर ते निसर्गाच्या आधीन आहे."

आम्ही तर एवढेच सांगतो की 'मला समभावाने निकाल करायचा आहे', एवढे तू ठाम ठरव. मग तसे झाले की नाही झाले ते आम्ही पाहत नाही. कधीपर्यंत हे नाटक बघत बसणार? याचा अंतच कधी येणार? आपण तर पुढे चालू लागावे. कदाचित समभावाने 'निकाल' होणारही नाही. आता होळी पेटली नाही तर नंतर पेटवू. अशा तऱ्हेने उड्या मारून ती थोडीच पेटेल? आपण काडी पेटवली, आणखी काही पेटवले, मग आता आपले काय काम? म्हणून आता सोडा आणि पुढे चालू लागा.

**प्रश्नकर्ता :** जर प्रतिक्रमण करता आले तर ते धर्मध्यानात गणले जाते की शुक्लध्यानात?

**दादाश्री :** नाही, ते धर्मध्यानातही गणले जात नाही आणि शुक्लध्यानातही गणले जात नाही. प्रतिक्रमण म्हणजे ध्यान नव्हे. प्रतिक्रमण तुम्हाला चोख (स्वच्छ, शुद्ध) करते. खरे तर आत्मा प्राप्त केल्यानंतर प्रतिक्रमण करण्याची गरजच नाही, पण हे तर 'अक्रम विज्ञान' आहे. तुम्हाला रस्त्यावरून चालता चालता आत्मा प्राप्त झाला आहे. म्हणून मागील दोष धुऊन टाकण्यासाठी प्रतिक्रमणे करावी लागतात.

एवढे सारे दोष असताना जर प्रतिक्रमणे केली नाहीत तर ते दोष खूप उड्या मारू लागतील. हे कपडे घाण झाले तर ते धुवावे लागतीलच ना? आणि 'क्रमिक मार्गात' तर कपडे स्वच्छ केल्यानंतरच आत्मा प्राप्त होतो. म्हणून त्यांना डाग पडण्याचा प्रश्नच नसतो ना?

## अक्रम मार्गाने एकावतारी

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केले तर नवीन चार्ज (कर्मबंधन) होणार नाही ना?

**दादाश्री :** आत्मा स्वतः कर्ता झाला तरच कर्मबंधन होईल. नाहीतर या ज्ञानात प्रतिक्रमणे करायचीच नसतात. परंतु इथे चौथ्या इयत्तेतील माणसाल 'ग्रॅज्युएट' बनवतो, तर मग मधल्या इयत्तांचे काय होणार? म्हणून आम्ही हे प्रतिक्रमण ठेवले आहे.

हे 'अक्रम ज्ञान' प्राप्त झाल्यावर एक किंवा दोन जन्मात निपटारा (सुटका) होईल असे आहे. आता जन्म बाकी राहणे किंवा न राहणे हे ध्यानावर आधारित आहे. जर निरंतर फक्त शुक्लध्यानच राहत असेल तर दुसरा जन्म होणारच नाही. परंतु 'अक्रम मार्गात' धर्मध्यान आणि शुक्लध्यान दोन्हीही होत असतात. आत शुक्लध्यान असते आणि बाहेर धर्मध्यान असते. धर्मध्यान कशामुळे होते?

तर 'दादा'जींच्या सांगण्यानुसार 'आज्ञां'चे पालन करायचे असते त्यामुळे. आज्ञापालन करणे हे शुक्लध्यानाचे काम नाही, हे धर्मध्यानाचे काम आहे. ह्या धर्मध्यानामुळे एक-दोन जन्मापुरती कर्मे 'चार्ज' होतात.



# [ 25 ]

## आराधना करण्यासारखे... आणि जाणण्यासारखे...!

**प्रश्नकर्ता :** आता जेव्हा हे 'रियल' पाहतो, तेव्हा 'रियल'बद्दल जे प्रेम उत्पन्न व्हायला हवे ते होत नाही आणि 'रिलेटिव्ह' उपचार स्वरूप झाले आहे, तर याला काय म्हणावे?

**दादाश्री :** जर प्रेम असेल तर समोर द्वेष उत्पन्न होईल. प्रेम उत्पन्न करण्याची गरज नाही. आराधना करण्यायोग्य, रममाण होण्यायोग्य फक्त हे 'रियल'च आहे! 'शुद्धात्म्या'ची रममाणता म्हणजेच निरंतर 'शुद्धात्म्या'चे ध्यान असणे! आता स्व-रममाणता करायची आहे, बाकी काही करायचे नाही.

**प्रश्नकर्ता :** 'रिलेटिव्ह'ला जाणायचे आहे आणि 'रियल'ला पण जाणायचे आहे का?

**दादाश्री :** नाही, 'रियल'ची आराधना करायची आहे आणि 'रिलेटिव्ह'ला जाणायचे आहे! जाणण्यासारखे फक्त 'रियल'च आहे. 'रियल' तर आम्ही तुम्हाला दाखवून दिले आहे!

आता हे सर्व जग 'ज्ञेय' स्वरूप आहे आणि तुम्ही 'ज्ञाता' आहात. तुम्हाला 'ज्ञायक' स्वभाव उत्पन्न झाला आहे. मग आता बाकी काय उरले? 'ज्ञायक' स्वभाव उत्पन्न झाल्यावर 'ज्ञेया'ला पाहतच राहायचे आहे!

आता तुम्हाला शुद्धात्म्यावर प्रेम करण्याची गरज नाही. कारण तुम्ही आता शुद्धात्मस्वरूपच झाला आहात, मग आता कुणावर प्रेम कराल? तुम्हाला आता ज्ञान, दर्शन आणि चारित्र्य सुरू झाले आहे! नाहीतर पाहणे-जाणणे यामुळे राग-द्वेष उत्पन्न झाले असते. पाहतो आणि जाणतो पण त्याबद्दल राग-द्वेष होत नाहीत, याला वीतराग चारित्र्य म्हटले जाते.

आता तर तुमचे चारित्र्य देखील उच्च प्रकारचे झाले आहे. हे तर आश्चर्यच झाले आहे! पण आता तुम्ही ते सांभाळून ठेवलेत तर चांगले! कोणी चॉकलेट देऊन तुमच्या बांगड्या पळवून नेल्या नाहीत तर उत्तम! आता तर तुमचे ज्ञान-दर्शन चारित्र्य आणि तप सर्व काही चालूच राहील. परंतु तप केव्हा होत आहे हे तुम्हाला समजत नाही. आमच्या 'आज्ञा'च अशा आहेत की तप करावेच लागते.

आम्ही मोटारीतून फिरत असताना कोणाबरोबर वार्तालाप करत नाही, कारण आम्ही उपयोगातच राहतो. आम्ही अजिबात उपयोग चुकत नाही!

एवढे चांगले विज्ञान हातात आल्यानंतर कोण सोडील? पूर्वी तर पाच मिनिटे पण उपयोगात राहता येत नव्हते. एक *गुंठाणा* सामायिक करायची असेल तरी अतिशय कष्टपूर्वक (उपयोगात) राहिले जात असे. आणि आता तर जिथे जाल तिथे सहजपणे उपयोगपूर्वक राहता येते.

**प्रश्नकर्ता :** ते समजते, दादा.

**दादाश्री :** आता जरा चुकांना आवर घाला, म्हणजे प्रतिक्रमण करा. तुम्हाला असे ठरवूनच बाहेर पडायचे की 'आज असेच करायचे आहे', शुद्ध उपयोगातच राहायचे आहे. असे जर ठरवले नाहीत तर मग उपयोगात राहणे जमणार नाही. आणि आपले विज्ञान तर खूप चांगले आहे. दुसरा काहीच खटाटोप नाही!

## निजवस्तु रममाणता

**प्रश्नकर्ता :** 'निजवस्तु' रममाणता कोणत्या प्रकारची असते?

**दादाश्री :** रममाणता तर दोन-चार प्रकाराने होते. दुसरी कसली रममाणता करता आली नाही तर 'मी शुद्धात्मा आहे, मी शुद्धात्मा आहे' असे तास, दोन-तास बोललात तरी चालेल, असे करत करत रममाणता वाढत जाईल.

**प्रश्नकर्ता :** रममाणता तर विविध प्रकारची असते ना?

**दादाश्री :** यात तर ज्याला ज्या प्रकारे जमते, तसा तो करतो. स्थूलमध्ये असेल तर 'मी शुद्धात्मा आहे, मी शुद्धात्मा आहे' असे बोलत राहतो, किंवा मग वहीत 'मी शुद्धात्मा आहे, मी शुद्धात्मा आहे' असे लिहीत राहतो. त्यामुळे काय होते? की हे शरीर पण रममाण होते, वाणी पण रममाण होते, मन पण त्याच्यातच येऊन जाते.

प्रथम स्थूल रूपात करतो त्यामुळे पुद्गल रमणता सुटू लागते. असे करत करत मग सूक्ष्म होत जाते. आणि जर त्याचेच गुण बोलत राहिला तर ती खरी रममाणता म्हटली जाते. ती 'ऑन दि मोमेंट' तत्क्षणी फळ देते! स्वतःचे सुख अनुभवाला येते.

**प्रश्नकर्ता :** ज्या प्रकारे या पुद्गलाचे रस आहेत, तर त्याचप्रकारे आत्म्याचे रस, आत्म्याचा आनंद प्रकट झाला पाहिजे ना?

**दादाश्री :** त्याचे काय आहे की तुम्ही अपरिग्रही कोणत्या आधारावर आहात? 'अक्रम विज्ञाना'च्या आधारावर! परंतु व्यवहाराने तुम्ही अपरिग्रही नाहीत, म्हणजेच जोपर्यंत अपरिग्रह दशा येत नाही, तोपर्यंत अंतिम 'वस्तू' (आत्मा) हाती लागत नाही.

**प्रश्नकर्ता :** तोपर्यंत खरा रस, आनंद प्राप्त करण्यासाठी आम्ही काय केले पाहिजे?

**दादाश्री :** 'मी अनंत ज्ञानवाला आहे', 'मी अनंत दर्शनवाला आहे', मी अनंत सुखाचे धाम आहे, 'मी अनंत शक्तीवाला आहे'... असे बोललात तर खरा रस उत्पन्न होईल! आत्मा स्वतः तर आनंदमयच आहे, म्हणजेच 'वस्तू' सर्वरसमयच आहे आणि तो स्वतःमध्ये

असतोच. परंतु स्वत:च्या जागृतीच्या उणीवेमुळे तो कुठून येत आहे ते कळत नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण पुद्‌गलाचे रस दाबले, तर आत्म्याचे रस उप्तन्न होतील का?

**दादाश्री :** नाही, दाबण्याला काहीच अर्थ नाही. ते तर आपोआपच फिके पडतील. आत्म्याचे गुण जर एकेक तास बोललात तर ताबडतोब खूपच फळ देतात. ही तर रोख फळ देणारी गोष्ट आहे, किंवा मग प्रत्येकात 'शुद्धात्मा' बघत बघत गेलात तरी पण आनंद वाटेल असे आहे.

**प्रश्नकर्ता :** समोरच्या व्यक्तीत शुद्धात्मा पाहिला, तर समोरच्या व्यक्तीला आनंद व्हायला हवा ना?

**दादाश्री :** नाही होणार. कारण त्यावेळी त्याची वृत्ती कुठे असेल ते काय सांगता येत नाही! तो कसल्याही विचारात गुंतलेला असतो! हो, पण त्याच्यात 'शुद्धात्मा' पाहिल्यामुळे तुम्हाला खूप फायदा होईल. समोरच्या व्यक्तीचा फायदा फक्त 'ज्ञानी पुरुष'च करू शकतात!

**प्रश्नकर्ता :** दादाजी, तुम्ही चार प्रकारची आत्मरममाणता सांगितली. त्या जरा परत सांगा ना!

**दादाश्री :** काही लोक 'मी शुद्धात्मा आहे', 'मी शुद्धात्मा आहे' असे बोलत असतात. काही जण 'मी शुद्धात्मा आहे' असे लिहितात, असे केल्यामुळे देह पण रममाणतेत आला असे म्हणता येईल. लिहिताना देह, वाणी आणि मन तीनही गोष्टी हजर असतात. आणि काही जण, बाहेरील व्यवहार चालू असताना देखील वास्तवात मनाने 'शुद्धात्म्या'च्या गुणात रममाण असतात. शुद्धात्म्याच्या गुणात रममाणता करणे म्हणजे 'मी अनंत ज्ञानवाला आहे, मी अनंत शक्तीवाला आहे...' याला सिद्धस्तुती म्हणतात. ती खूपच फलदायी आहे!

**प्रश्नकर्ता :** दादाजी, आपण दुसऱ्यांच्या सुखासाठी प्रयत्न करता

आणि कित्येकांना भयंकर दुःखांच्या यातनेतून बाहेर काढून परम सुखी बनवता, आम्हालाही जर तसे बनायचे असेल तर आम्ही तसे बनू शकतो का?

**दादाश्री :** हो, बनू शकता. पण तुमच्यात तेवढी कपॅसिटी (सामर्थ्य) आली पाहिजे. तुम्ही निमित्तरूप बनावे यासाठीच मी तुम्हाला तयार करत आहे. नाहीतर तुम्ही स्वतःच तसे करायला जाल किंवा बनायला जाल, तर काहीच होऊ शकणार नाही.

**प्रश्नकर्ता :** मग निमित्त रूप बनण्यासाठी आम्ही काय करायला हवे?

**दादाश्री :** हे जे सर्व मी सांगत आहे तेच. आणि निमित्त रूप बनण्यापूर्वी काही प्रकारचा गंज (कचरा) निघून जायला हवा.

त्यात कोणावर रागावण्याचा, कोणावर चिडण्याचा असे कोणतेही हिंसक भाव असता कामा नयेत. खरे म्हणजे प्रत्यक्षात तुमच्यात हे हिंसक भाव आता नाहीतच. जे आहेत ते तुमचे 'डिस्चार्ज' हिंसकभाव आहेत, पण जे 'डिस्चार्ज' हिंसकभाव आहेत ते जेव्हा संपतील तेव्हा या सर्व शक्ती ओपन (प्रकट) होतील! 'डिस्चार्ज चोऱ्या', 'डिस्चार्ज अब्रह्मचर्य', हे सर्व 'डिस्चार्ज' जेव्हा संपतील त्यानंतर इतरांसाठी निमित्त बनण्याची शक्ती उत्पन्न होईल! हे सर्व संपले म्हणजे तुम्ही परमात्माच झालात. आणि माझे हे सर्व संपले आहे, म्हणून तर मी निमित्त बनलो आहे!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे प्रथम आम्हाला 'गंज' काढून टाकण्याचे काम करायचे आहे.

**दादाश्री :** पुरुषार्थ केल्याने सर्व काही होईल! पुरुष झालात म्हणून तुम्ही पुरुषार्थात येऊ शकता, असे सर्व मी करून दिले आहे. आता तुम्ही तुमच्या परीने जेवढा पुरुषार्थ करायचा असेल तेवढा करू शकता.

**प्रश्नकर्ता :** मी माझ्या शुद्धात्म्यात राहीन, परंतु त्याचबरोबर समोरच्याच्या शुद्धात्म्याशी अनुसंधान पण व्हायला हवे ना?

**दादाश्री :** समोरच्याचा शुद्धात्मा तुमची स्वतःची शुद्धी वाढवण्यासाठी पाहायचा आहे, ते काही समोरच्या व्यक्तीला लाभ होण्यासाठी नाही. स्वतःची शुद्ध दशा वाढविण्यासाठी समोरच्या व्यक्तीत शुद्धात्मा पाहा, त्यामुळे तुमची दशा वाढत जाईल!

**प्रश्नकर्ता :** एका शुद्धात्म्याचे दुसऱ्या शुद्धात्म्याशी अनुसंधान होते का?

**दादाश्री :** अनुसंधान असे काही नाही, हा स्वभाव आहे. हा 'लाइट' (प्रकाश), हा 'लाइट' आणि हा 'लाइट' - हे तिन्ही 'लाइटस्' एकत्र केले तरी पण त्यातील प्रत्येक 'लाइट'चे स्वतःचे व्यक्तित्व वेगळेच राहील. यात कोणीच एकमेकाला फायदा देत नाही.

**प्रश्नकर्ता :** तर मग समोरच्याबद्दल आमच्या मनात जे चुकीचे भाव आहेत, वाईट भाव आहेत, ते प्रतिक्रमण केल्याने कमी होतील का?

**दादाश्री :** आपले वाईट भाव संपतात, हे सर्व आपल्यासाठीच आहे. समोरच्याचे आपल्याशी काहीच देणेघेणे नाही.



## [ 26 ]

## शुद्धात्मा आणि कर्मरूपी पाचर

'स्वरूपज्ञान' प्राप्त झाल्यानंतर बाकी काय राहिले? सगळ्यांमध्ये शुद्धात्मा दिसतो, स्वत:मध्ये शुद्धात्मा दिसतो, तर आता बाकी काय राहिले? तर कर्मरूपी पाचर! (फर्नीचर बनवताना दोन गोष्टीत अंतर ठेवण्यासाठी वापरलेला लाकडाचा तुकडा) स्वत: परमात्मा झालात, सगळे काही जाणता, परंतु होते काय? तर कर्मरूपी पाचर बाधक आहे. ही कर्मरूपी पाचर कशामुळे निघेल? 'फाइल्स'चा समभावाने निकाल केल्यामुळे.

समोर आलेल्या 'फाइल्स्'चा राग-द्वेष न करता समभावाने निकाल करणे हाच कर्मरूपी पाचरींना बाहेर काढण्याचा उपाय आहे. पाचर काढण्यासाठी आपण सर्वकाही करू शकतो. अरे, कोणाला आपला हात लागला, तरी पण राग-द्वेष होत नाहीत. 'फाइल' येण्यापूर्वीच तुम्ही ठरवलेले असते की याचा समभावाने निकाल करायचा आहे. पूर्वी स्वत:च तयार केलेले वहीखात्याचे हिशोब, यांनाच कर्मरूपी पाचर म्हणतात. कर्मरूपी पाचर जेव्हा तुम्हाला घेरते तेव्हा ती विनाकारण तुम्हाला गुंतवत राहते. त्या तुम्ही 'जाणा' की आज ह्या पाचरीने चंदुभाईला खूप गोंधळून टाकले आहे. तुम्हाला ते समजेलच ना?

सगळ्यांची कर्मरूपी पाचर वेगवेगळ्या प्रकारची असते की एकाच प्रकारची असते? वेगवेगळ्या प्रकारची असते. कारण सगळ्यांचे चेहेरे

वेगवेगळे असतात. या आजी जर या ताईला शिकवायला गेल्या तर कसे जमेल? दादाजींना समजते की या आजींमध्ये ही पाचर आहे आणि या ताईमध्ये ही पाचर आहे. आम्हाला तर हे पण समजते की ह्या लोकांची कर्मरूपी पाचर कोणत्या कारणामुळे उत्पन्न झाली आहे. त्या व्यक्तीचे निरीक्षण केले तर या भाईंची पूर्वीची पाचर कशी आहे हे लक्षात येते. आजचे निरीक्षण असे सांगते की हे सर्व चुकीचे आहे, ही झंझट आपली नाहीच. परंतु पूर्वीच्या पाचरींचा शिक्का लागलेला आहे, त्यांचे काय? त्या तर भोगल्याशिवाय उपायच नाही. या पाचरी कडू आणि गोड रस पाजून जातात. घटकेत गोड रस देतात आणि घटकेत कडू रस देतात! गोड रस आवडतो का तुम्हाला?

जोपर्यंत गोड रस आवडत असेल तोपर्यंत कडू रस आवडणार नाही. गोड रस आवडेनासा झाला की कडू रसाची नावड पण बंद होईल. हा गोड रस कधीपर्यंत चांगला वाटेल? तर जोपर्यंत फक्त मोक्षातच सुख आहे, असा अभिप्राय पूर्णपणे पक्का होत नाही तोपर्यंत. सध्या तरी अभिप्राय कच्चा आहे, म्हणून 'खरे सुख मोक्षातच आहे आणि हे सर्व खोटे आहे, असे आहे, तसे आहे.' असे बोलत राहावे. अशा तऱ्हेने थोड्या थोड्या वेळाने 'तुम्ही' 'चंदुभाई'ला समजावत राहा. जेव्हा खोलीत कोणी नसेल, तुम्ही एकटेच असाल तेव्हा 'चंदुभाई'ला तुम्ही उपदेश पण देऊ शकता की 'चंदुभाई! बसा, गोष्ट नीट समजून घ्या ना!' जेव्हा कोणी नसेल तेव्हा तुम्ही असे केलेत तर तुम्ही नाटक करत आहात हे कोणाला कळणार आहे का? कोणी असेल तर तो तुम्हाला म्हणेल की हा चक्रम झाला की काय? 'अरे, चक्रम झालो नाही, चक्रम झालो होतो, तो चक्रमपणा मी आता काढून टाकत आहे!' तरी पण तो तर असेच म्हणेल, 'तुम्ही चंदुभाईशी बोलत होता, असे कसे तुम्ही? तुम्हीच तर चंदुभाई आहात ना?' म्हणूनच जेव्हा एकटे असाल, तेव्हा खोली बंद करून चंदुभाईला म्हणावे, 'चंदुभाई बसा, आपण थोडे बोलूया. तुम्ही असे करता, तसे करता, त्यात तुमचा काय फायदा? आमच्याबरोबर तन्मयाकार व्हा ना? आमच्याजवळ तर अपार सुख आहे!' हे तर चंदुभाईला वेगळेपणा आहे म्हणून तुम्हाला असे म्हणावे

लागते. ज्याप्रमाणे छोट्या मुलांना समजावावे लागते, सांगावे लागते, तसेच 'चंदुभाई'ला पण सांगावे लागते. तरच सर्व सुरळीतपणे चालेल.

## आरसा सामायिक

तुम्ही कधी आरशात पाहून चंदुभाईला रागावता का? तुम्ही चंदुभाईंना आरशासमोर बसवून म्हणावे की, 'तुम्ही पुस्तके छापून घेतली, ज्ञानदान केले, हे तर खूप चांगले काम केले, पण त्याशिवाय तुम्ही असे करता, तसे करता, असे कशासाठी करता?' असे तुम्हीच तुम्हाला सांगावे लागेल की नाही? का फक्त दादाच वारंवार सांगत राहणार? त्याऐवजी तुम्ही पण सांगाल तर तो जास्त ऐकणार, तुमचे जास्त ऐकणार! मी सांगितले तर तुम्हाला काय वाटेल? की दादा माझ्या आसपासच्या लोकांना तर काहीच सांगत नाहीत, फक्त मलाच का बोलतात? म्हणून तुम्हीच तुम्हाला रागवायला हवे.

दुसऱ्यांच्या चुका काढणे तर पुष्कळ जमते पण स्वतःची एक पण चूक काढायला जमत नाही. आणि तुम्हाला तर चुका काढायच्या नाहीत, तुम्हाला फक्त 'चंदुभाई'ला थोडे रागवायचेच आहे. 'तुम्ही' तर तुमच्या सर्व चुका जाणता. म्हणून आता 'तुम्ही' 'चंदुभाई'ला रागे भरायचे आहे, तसे तर 'चंदुभाई' नरम पण आहेत, आणि 'मानी' पण तितकेच आहेत, सर्व तऱ्हेने 'मानवाले' आहेत. म्हणून त्यांना जरा पटवले तर सर्व काम पार पडेल.

आता हा रागावण्याचा सराव कधी करू शकता? तुम्ही घरी एक-दोन जण रागावणारे ठेवू शकता पण ते काही खरोखर रागावणारे नसतात ना! खरोखर रागावणारे असतील तरच परिणाम होईल. नाहीतर खोटे, बनावट रागावणारा असेल तर त्याचा परिणाम होणार नाही. तुम्हाला कोणी रागावणारा असेल तर तुम्ही त्याचा लाभ घेतला पाहिजे. पण तुम्हाला असे आयोजन करता येत नाही ना!

**प्रश्नकर्ता :** रागावणारे असतील ते तर आम्हाला आवडत नाहीत.

**दादाश्री :** ते आवडत नाहीत, परंतु रोजच रागावणारे भेटले तर

आपल्याला निकाल करता यायला हवा ना, की हे तर आता रोजचेच झाले आहे. असे कसे चालेल? त्याऐवजी आपण आपल्या 'गुहेत' (आत्म्यात)च शिरा ना!

## आरशात ठपका सामायिक

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हणता की, 'मी जीव नाही, पण शिव आहे.' पण असे वेगळेपण होत नाही ना?

**दादाश्री :** पुद्गल आपला भाव सोडत नाही ना! ते आपला हक्क सोडणार का? म्हणून त्याला समजावून-उमजावून, पटवून-पटवून, आपण आपले काम करून घ्यायला हवे. कारण पुद्गल तर भोळे आहे. 'पुद्गलाचा' स्वभाव कसा आहे? भोळा आहे. म्हणून असे कौशल्याने ते आपल्या ताब्यात येईल. 'जीवभाव' आणि 'शिवभाव' दोन्ही वेगळेच आहेत ना! आता जेव्हा जीवभावात येईल तेव्हा ते बटाटेवडे वगैरे सर्व खाईल आणि शिवभावात येईल तेव्हा दर्शन करील!

**प्रश्नकर्ता :** पण जीवाचे मन स्वतंत्र आहे का?

**दादाश्री :** हो, बिलकुल स्वतंत्र आहे. कधी मन तुमचा विरोध करते असे तुम्ही अनुभवले आहे की नाही? अरे, मन जर 'माझे' असेल तर ते माझ्या विरोधात कसे जाईल? ते जेव्हा असा विरोध करते तेव्हा कळतेच ना, की ते स्वतंत्र आहे!

**प्रश्नकर्ता :** वाणीवर कंट्रोल नाही, म्हणून मनावर पण कंट्रोल नाही.

**दादाश्री :** जे जे विरोध करतात त्यांच्यावर आपला कंट्रोल नाही.

पूर्वी तर तुम्ही 'मी जीव आहे' असे मानत होता. आता ती मान्यता तुटली आहे, आणि 'मी शिव आहे' हे समजले आहे. पण तरीही जीव आपला भाव सोडणार नाही, त्याचा हक्क वगैरे काहीही सोडणार नाही. परंतु जर त्याला पटवले तर तो सर्व काही सोडून देईल असे आहे. ज्या प्रकारे कुसंगाच्या प्रभावाने कुसंगी होतो आणि सत्संगाच्या

प्रभावाने सत्संगी होतो, त्याच प्रकारे जर त्याला समजावले तर सर्व काही सोडून देईल, असा तो समजदारही आहे! आता तुम्ही काय करायला हवे की, चंदुभाईला बसवून, चंदुभाईबरोबर वार्तालाप करावा लागेल की वयाच्या 67 व्या वर्षी देखील तुम्ही रोज सत्संगात येता, अगदी बरोबर लक्षात ठेवून येता, ही खूप चांगली गोष्ट आहे!' पण त्याचबरोबर त्यांना तुम्ही हे पण समजवावे, सल्ला द्यावा की, 'शरीराकडे इतके लक्ष का देता? शरीरात असे होत आहे, तसे होत आहे, तर खुशाल होऊ द्या ना. तुम्ही आमच्याबरोबर ह्या टेबलावर या ना! आमच्याजवळ अपार सुख आहे.' असे तुम्ही चंदुभाईला सांगायला हवे. चंदुभाईला जर असे आरशासमोर बसवले तर चंदुभाई तुम्हाला 'एक्झॅक्ट' दिसतील की नाही?

**प्रश्नकर्ता :** आतमध्ये तर मी तासन्तास वार्तालाप करत असतो.

**दादाश्री :** पण आत वार्तालाप करता-करता, ते इतर फोन पण घेतात, म्हणून त्यांना समोर बसवून त्यांच्याशी मोठ्याने वार्तालाप करायला हवा. म्हणजे ते इतर कुठलेही फोन घेणारच नाहीत!

**प्रश्नकर्ता :** स्वत:ला समोर कसे बसवावे?

**दादाश्री :** तुम्ही जर 'चंदुभाईला' समोर बसवून त्याच्यावर रागावलात, तर 'चंदुभाई' खूप समजदार होतील. तुम्ही स्वत:च रागावलात की, 'चंदुभाई, असे करायचे असते का? तुम्ही हे काय चालविले आहे? आणि केलेत तर केलेत, आता तरी सरळ वागा ना?' असे तुम्ही म्हटलेत तर त्यात काय वाईट आहे? दुसरे कोणी रागावले तर चांगले वाटेल का? म्हणून तर आम्ही तुम्हाला 'चंदुभाई'ला रागावयास सांगतो, नाहीतर पूर्ण अंधारच चालू राहील! हे पुद्‌गल काय म्हणते, 'तुम्ही तर शुद्धात्मा झालात, पण आमचे काय?' ते दावा करते, त्याला पण पूर्ण हक्क आहे. त्याची पण इच्छा असते की 'आम्हाला पण काहीतरी हवे आहे.' म्हणून त्याला समजावून सांगायला हवे. पुद्‌गल तर भोळे आहे. भोळे असे की मूर्खाची संगत मिळाली की

मूर्ख बनते आणि समजदाराची संगत मिळाली की समजदार बनते. चोराची संगत मिळाली की चोर बनते! जसा संग, तसा रंग! पण तरी ते स्वत:चा हक्क सोडून देईल, असे नाही.

तुम्ही 'चंदुभाई'ला समोर बसवून असा प्रयोग करायला हवा. आरशात तर चेहरा वगैरे सर्व दिसते. मग आपण 'चंदुभाई'ला म्हणायला हवे की 'तुम्ही असे का केलेत? तुम्ही असे करता कामा नये. बायकोबरोबर सारखे मतभेद का होतात? मग तुम्ही लग्नच का केलेत? लग्न केल्यानंतर असे का वागता?' असे सर्व बोलायला हवे. आरशात बघून जर तासभर अशी खरडपट्टी काढलीत, तर खूप शक्ती वाढेल. ही खूप मोठी सामायिक आहे. तुम्हाला 'चंदुभाई'च्या सर्व चुका समजतात ना? जेवढ्या चुका दिसल्या तेवढ्या चुका तुम्ही 'चंदुभाई'ला आरशासमोर एक तासभर बसवून सांगितल्यात तर ती खूप मोठी सामायिक!

**प्रश्नकर्ता :** आम्ही आरशासमोर न बसता असाच एकांतात बसून मनाशी वार्तालाप केला तर हे होऊ शकणार नाही का?

**दादाश्री :** नाही, तसे होणार नाही. यासाठी तर आरशात तुम्हाला 'चंदुभाई' दिसायला हवेत. एकटे-एकटे मनातल्या मनात केलेत तर करता येणार नाही. एकटे-एकटे करणे हे तर 'ज्ञानी पुरुषां'चेच काम! पण तुम्हाला तर असे बालभाषेतच शिकवायला हवे ना? आणि हा आरसा आहे म्हणून बरे आहे, नाही तर लाख रुपयांचा आरसा विकत आणावा लागला असता. हे तर स्वस्त आरसे आहेत! ऋषभदेव भगवंतांच्या वेळी तर फक्त भरत चक्रवर्ती महाराजांनीच आरसाभवन (काचेचा महल) बांधले होते! आणि आता तर मोठेमोठे आरसे सर्वत्रच पाहायला मिळतात!

ही सगळी परमाणूंची थिअरी आहे. परंतु जर आरशासमोर बसून केलेत तर तुमचे बरेचसे काम होऊनच जाईल. पण कोणी करत नाही ना? आम्ही सांगतो तेव्हा एक-दोन वेळा करतात आणि नंतर परत विसरून जातात.

## आरसाभवनात केवळज्ञान!

भरत राजाला ऋषभदेव भगवंतांनी 'अक्रम ज्ञान' दिले, आणि शेवटी जेव्हा त्यांनी आरसाभवनाचा आसरा घेतला तेव्हा कुठे त्यांचे काम झाले. आरसाभवनमध्ये एका बोटाची अंगठी निघाली होती, जेव्हा ते बोट रिकामे दिसले तेव्हा त्यांच्या लक्षात आले की इतर बोटे अशी दिसतात आणि हे एकच बोट असे वेगळे का दिसते? मग त्यांना समजले की या बोटातील अंगठी निघाल्यामुळे असे दिसत आहे. अंगठीमुळे बोट किती सुंदर दिसत होते. मग आत खूप मोठे (विचारांचे) वादळ सुरू झाले! ते थेट 'केवळज्ञान' होईपर्यंत थांबले नाही! खोल विचारात शिरले की अंगठीमुळे बोट सुंदर दिसत होते? माझ्यामुळे नाही का? मग उत्तर मिळाले की तुझ्यामुळे कसे काय? आणि नंतर 'हे माझे नाही, हे माझे नाही, हे माझे नाही' असे करत करत 'केवळज्ञान' प्राप्त झाले!!! म्हणून आपण आरसाभवनचा लाभ घ्यायला हवा. आपले 'हे' अक्रम विज्ञान आहे. जो कोणी याचा लाभ घेईल, त्याचे (मोक्षाचे) काम होऊन जाईल. पण याची कोणाला माहितीच नाही ना? जरी तो आत्मा जाणत नसला तरीही आरसाभवनची सामायिक मात्र फार उत्तम होऊ शकते.

**प्रश्नकर्ता :** बऱ्याच लोकांना तुम्ही ज्ञान देता, त्यातील काही जणांना ते लगेच फिट होते आणि काहीजणांना कितीही डोकेफोड केली तरी ते फिट होत नाही. तर यात त्यांची शक्ती कमी पडते का?

**दादाश्री :** ती शक्ती नाही. ते लोक कर्माच्या वेड्या-वाकड्या पाचरी सोबत घेऊन आलेले असतात. काही लोकांच्या पाचरी सरळ असतात. सरळ पाचरीवाले लोक आपल्या पाचरी स्वत:च ओढून काढतात आणि वाकड्या पाचरीवाल्यांच्या पाचरी आतून वाकड्या असतात, त्या अशा ओढून निघत नाहीत. आटे वेडेवाकडे असतात. आमच्या पाचरी सरळ होत्या म्हणून झटपट निघाल्या. आम्हाला वाकडे जमत नाही. आमचे तर सगळे एकदम चोख आणि उघड-उघड! आणि तुम्ही काही तरी वाकडे शिकला असाल. तुम्ही आहात तर चांगल्या घरचे, परंतु लहानपणीच वाकडेपणा घुसला असेल तर काय होईल? आतमध्ये

वाकडे खिळे असतील तर उपटताना खूप जोर लागेल आणि वेळही लागेल. स्त्री जात आतमध्ये थोडे कपट राखते, आतमध्ये त्यांचे 'स्वच्छ' नसते. कपटामुळेच तर स्त्री जन्म मिळाला आहे. पण आता 'स्वरूपज्ञान' प्राप्तीनंतर आपल्याला 'स्त्री' असे काही राहिलेच नाही ना? परंतु खिळे मात्र वाकडे आहेत, म्हणून ते काढताना थोडा जास्त वेळ लागतो. जर सरळ असते तर वेळ लागलाच नसता ना? पुरुष तर भोळे असतात. बायकोने समजावले तर ते समजतात. बायकोलाही समजते की यांना समजले आहे आणि ते आता बाहेर जातील. पुरुषांमध्ये भोळेपणा असतो. थोडेसे कपट केले होते म्हणून मल्लीनाथांना तीर्थंकर अवतारात स्त्री व्हावे लागले होते. एक थोडेसेच कपट केले होते तरी! कपट सोडतच नाही ना! तरी पण स्वरूपज्ञान झाल्यानंतर आता आपल्याला पुरुषपणा आणि स्त्रीपणा राहिला नाही. आपण 'शुद्धात्मा' झालो!

## कुसंगाचा रंग...

स्वत:ची इच्छा नसते तरी पण लोक बाहेर जातात आणि कुसंगात अडकतातच. कुसंग लागल्याशिवाय राहतच नाही. बरेच लोक म्हणतात की मी दारूड्याबरोबर फिरतो पण मी दारू पिणारच नाही. पण तू (त्याच्याबरोबर) फिरतोस, म्हणजे तेव्हापासूनच तू दारू पिऊ लागशील. एक ना एक दिवस संगत आपला प्रभाव दाखविल्याशिवाय राहत नाही. म्हणून संगत सोड.

प्रत्यक्षात तुम्हाला शुद्धात्म्याची प्रतीती तर आली आहे, परंतु खऱ्या अनुभवाचा जो स्वाद आहे, तो अजून येत नाही.

तुमची खरी परीक्षा झाली असे कधी म्हणता येईल? तर जेव्हा घरात समोरची व्यक्ती उग्र झाली, तेव्हा तुम्ही पण उग्र झालात तर तुमच्यात अजून उणीव आहे हे समजूनच चाला.



# [ 27 ]

## अटकणमुळे लटकण आणि लटकणमुळे भटकण...

**दादाश्री :** कधी तुम्हाला गुदगुल्या (वृत्तींसाठी लालच उचंबळून येणे) होतात का?

**प्रश्नकर्ता :** रविवार आला आणि रेसची वेळ आली की आतमध्ये गुदगुल्या होतात.

**दादाश्री :** हो, शनिवारी होत नाहीत आणि रविवारीच का होतात? कारण द्रव्य-क्षेत्र-काळ आणि भाव, चारही गोष्टी एकत्र आल्या की मगच गुदगुल्या होतात.

अनंत काळापासून लटकत आले आहेत, सगळे जण आपापल्या *अटकणीमुळे* लटकले आहेत. अनादि काळापासून का लटकले आहेत? अजूनही त्याचा निकाल का होत नाही? त्याचे कारण स्वत:चीच *अटकण* आहे. प्रत्येकामध्ये वेगवेगळ्या प्रकारची काही ना काही *अटकण* असते आणि त्यामुळे लटकलेला आहे!

*अटकण* म्हणजे काय ते तुम्हाला समजले का? ही घोडागाडी चालत असेल, घोडा ताकदवान असेल, आणि वाटेत जर एखादी कबर असेल आणि त्या कबरीवर हिरवे कापड झाकलेले असेल तर घोडा ते पाहताच उभा राहतो, ते का? तर त्याने कबरीवर जे हिरवे कापड पाहिले ते त्याला नवीन वाटते. म्हणून तो घाबरतो, मग त्याला कितीही

मारले तरी तो तिथून हलत नाही. नंतर तो मालक त्याला मारून, समजावून, पटवून डोळ्यावर हात ठेवून पुढे घेऊन जातो, ती गोष्ट वेगळी आहे. पण परत दुसऱ्या दिवशी तो तिथेच अडकतो. कारण ती *अटकण* पडलेली आहे, त्यावेळी तो समज, भान, ज्ञान सर्व काही विसरून जातो. त्याला जर मारू लागलो तर तो घोडागाडी पण उलटून टाकील.

याच प्रकारे माणूस जर एखाद्या जागी मूर्च्छित झाला, कशात तरी मूर्च्छित झाला म्हणजे त्याला तिथे *अटकण* पडलेली असते. त्याची ती *अटकण* मग जात नाही. म्हणजे कुठेही मूर्च्छित न होणारी व्यक्तीसुद्धा *अटकण* असलेल्या ठिकाणी आली की मूर्च्छित होऊनच जाते. तिथे मग त्याचे ज्ञान, भान सर्व हरपते आणि त्याच्या हातून काहीतरी चुकीचे घडते. म्हणून कविराज म्हणतात :

*''अटकणथी लटकण, लटकणथी भटकण,*
*भटकणनी खटकण पर, छांटो चरण-रजकण.''*

जर आता भटकंतीपासून सुटायचे असेल तर 'चरण-रजकण' शिंपडा! चरणरज शिंपडून भटकंती संपवा आता, जेणेकरून मग *अटकणची* भीती राहणार नाही.

## अटकण, अनादि काळापासून!

म्हणजेच प्रत्येकाला *अटकण* पडलेली आहे, म्हणूनच सर्व अडकलेले आहेत. तर आता कसली *अटकण* पडलेली आहे ती शोधून काढायला हवी. कब्रस्थानासमोर *अटकण* होत आहे की अन्य कुठे होत आहे? ते शोधले पाहिजे. अनंत जन्म भटकणे चालू आहे. ते फक्त *अटकणमुळेच* आहे, इतर काहीच नाही! *अटकण* म्हणजे मूर्च्छित होणे. स्वभान गमावणे. सर्व ठिकाणी *अटकण* नसते. घरातून बाहेर पडलेला सगळीकडे मारझोड करत नाही, राग-द्वेष करत नाही. परंतु त्याला *अटकणीत* राग-द्वेष होतात. तुम्हाला समजावून सांगण्यासाठी हे घोड्याचे उदाहरण दिले. स्वत:ची *अटकण* शोधून काढली तर मग कुठे कुठे तो

मूर्च्छित होत आहे, मूर्च्छित होण्याची जागा कुठली आहे ते त्याला समजेल.

**प्रश्नकर्ता :** *अटकण* म्हणजे पकड का?

**दादाश्री :** नाही. पकड नाही. पकड म्हणजे तर आग्रह. आणि *अटकणमुळे* तर माणूस मूर्च्छित होऊन जातो. ज्ञान-भान सर्व काही हरवून बसतो. याउलट आग्रहामध्ये ज्ञान, भान सर्व काही शाबूत असते.

सर्वच माणसात काही तरी कमतरता असतेच ना? त्या कमतरतेमुळेच मनुष्यपणा कायम राहिला आहे. कमतरता गेली तर तो मुक्तच होईल. पण ती कमतरता जाणार अशी नाही. ती कोण काढील? 'ज्ञानी पुरुषां'खेरीज कोणीही ही कमतरता काढू शकत नाही ना! 'ज्ञानी पुरुष' स्वतःच त्याला त्याची कमतरता स्पष्टपणे समजावतात आणि ती दूर करतात. घोडा कितीही अडला असो तरी पण 'ज्ञानी पुरुष' त्याला पुढे घेऊन जातात. कानात फुंकर मारून, समजावून, मंत्र म्हणून पण त्याला पुढे घेऊन जातात. नाहीतर काही केल्या घोडा पुढे जातच नाही. अरे, घोडाच काय, अगदी मोठे मोठे हत्तीसुद्धा *अटकण* समोर आली तर तिथून हलत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** पण भगवंत, मागील जन्माचे काही तीव्र संस्कार असतील म्हणूनच आम्ही तुमच्या चरणी आलो आहोत.

**दादाश्री :** संस्कारांच्या आधारावर तर हे मिळते, पण यापासून दूर कोण करते? तर *अटकण* त्याला दूर करते. *अटकण* वेगळे करते! म्हणून *अटकण* कुठे आहे? ते प्रथम ओळखून घ्यावे. मग त्या त्या ठिकाणी सतत सावधच राहायचे. तू *अटकण* ओळखली आहेस का? चारी बाजूने ओळखली आहेस का? अगदी आपल्या पाठीमागून जात असेल तरी लक्षात येते की ही आपली *अटकण* जात आहे. हो, इतके सावध राहिले पाहिजे.

*अटकण* फक्त 'ज्ञानी'च शोधू शकतात, आणखी कोणी शोधू शकत नाही. भोळ्या माणसाची *अटकण* पण भोळी असते, ती लवकर

सुटते आणि कपटी माणसाची *अटकण* कपटी असते, ती तर खूपच विकट असते.

## अटकणमुळे अनंत सुख अडकले आहे

आता आत पूर्ण क्लीअरन्स (स्वच्छ, निर्मळ) व्हायला हवे. हे 'अक्रम ज्ञान' मिळाले आहे, आणि स्वतःला निरंतर सुखात राहायचे असेल तर राहता येईल असे 'ज्ञान' आपल्याजवळ आहे. म्हणून आता *अटकणपासून* कसे सुटता येईल, तिच्यापासून आपण कसे मोकळे होऊ, याचे उपाय करावे. त्यासाठी 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान' करून देखील निराकरण करावे लागेल. पूर्वी सुख नव्हतेच, तोपर्यंत तर माणूस *अटकणीत* अडकूनच राहणार ना? पण आता शाश्वत सुख उत्पन्न झाल्यानंतर कशासाठी? खरे सुख का उत्पन्न होत नाही? तर ह्या *अटकणीमुळेच* उत्पन्न होत नाही.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, चोवीस तास आत्म्याचा अनुभव, लक्ष आणि प्रतीती असेल, तरी पण *अटकण* हा प्रश्न राहील का?

**दादाश्री :** नाही, असे तर सर्वांनाच असते, पण *अटकण* तर आत असते ना, म्हणून शोधून काढली पाहिजे की *अटकण* कुठे आहे?

*अटकण* निघून गेल्यावर जग तुमच्यावर आफरीन होऊ लागेल. तुम्हाला पाहूनच जगातील जीवांना आनंद होऊ लागेल. सध्या *अटकणमुळे* आनंद होत नाही.

हा आरसा आहे, तो एकाच व्यक्तीचा चेहरा दाखवतो की सर्वांचा दाखवतो? जो कोणी समोर येईल त्याचा चेहरा तो दाखवतो. तर असे आरशासारखे क्लीअरन्स (स्वच्छ) झाले तर ते कामाचे!

या *अटकणमुळे* लोकांना 'अट्रॅक्शन' (आकर्षण) होत नाही. 'अट्रॅक्शन' झाले पाहिजे, मग त्या व्यक्तीचा शब्दच 'ब्रह्मवाक्य' म्हटले जाते. म्हणून *अटकण* कुठे आहे ते शोधून काढा. अनुभव, लक्ष आणि प्रतीती, तर अन्य सर्वांनाही असते, पण तरी आकर्षण का वाढत नाही?

जगात आकर्षण तर झाले पाहिजे ना? रोख म्हणजे रोख. ते उधार दिसता कामा नये ना? म्हणून आतील कारणे शोधायलाच हवीत. *अटकण* तर... दहा दिवस हॉटेल दिसले नाही तर तोपर्यंत काहीच होत नाही. पण हॉटेल दिसले की आत घुसतो! संयोग मिळाले की आतून गुदगुल्या होतात! (वृत्ती उफाळून येतात.)

तुम्ही एका व्यक्तीची दारू सोडविली असेल, तर मग तो सत्संगात शांतीपूर्वक बसतो. खूप दिवस तो दारू विसरतो, मग कधी तरी तो तुमच्याबरोबर फिरायला येतो आणि तेव्हा तो दुकानाचा बोर्ड वाचतो, 'दारूचे दुकान', बॉर्ड वाचल्यावर लगेच त्याच्या आत सर्व बदलून जाते, आत गुदगुल्या होऊ लागतात. आणि मग तो तुम्हाला म्हणतो, 'चंदुभाई, मी जरा मॅकवॉटर करून येतो' (लघवीला जाऊन येतो.) अरे, मेल्या मध्येच मॅकवॉटरची गोष्ट कशाला काढतोस? तेव्हा आपल्याला समजते की याला गुदगुल्या होत आहेत. काही ना काही खोटेनाटे सांगून तो मागील दाराने दुकानात शिरतो आणि थोडीशी दारु ढोसूनच येतो!

आता *अटकण* म्हणजे काय ते तुम्हाला समजले ना? *अटकण* आपल्याला मूर्च्छित करून टाकते. त्यामुळे तेवढा वेळ, पाच-दहा मिनिटे त्याचे ज्ञान-दर्शन सगळेच मूर्च्छित होऊन जाते.

## जोखमीचे, निकाचित कर्म की अटकण?

**प्रश्नकर्ता :** ज्याला निकाचित कर्म म्हणतात तेच *अटकण* आहे ना?

**दादाश्री :** *अटकण* तर निकाचित कर्माहूनही जास्त कठीण गोष्ट आहे. निकाचित कर्म हा तर खालचा शब्द आहे. निकाचित कर्म म्हणजे असे कर्म की जे भोगावेच लागते. *अटकण* पण भोगावीच लागते, एवढेच नाही, तर ती परत भोगण्याचे बी पण पेरते. ज्ञान असेल तरी निकाचित कर्म भोगण्याशिवाय गत्यंतरच नाही. तुम्हाला भोगायची इच्छा नसेल तरी पण ते भोगावेच लागते. म्हणजेच निकाचित कर्म असेल तरी हरकत नाही. निकाचित कर्म हा आपल्यासाठी एक प्रकारचा दंड आहे. जेवढा दंड आहे तेवढा होणारच. परंतु ह्या *अटकणचा* मात्र खूप त्रास असतो.

**प्रश्नकर्ता :** वेदांतात क्रियमाण म्हणतात तेच आहे ना हे?

**दादाश्री :** क्रियमाण नाही, काही कर्मे अशी असतात की फक्त विचार केल्याने ती सुटतात, ध्यानाने सुटतात आणि काही कर्मे अशी असतात की ती भोगावीच लागतात, इच्छा असो, नसो भोगावीच लागतात. त्यांना निकाचित कर्म म्हणतात. त्यांना चिकट कर्मे म्हटली जातात. आणि *अटकण* ही गोष्ट तर अशी आहे की ती दुसरे वादळ उभे करते! म्हणूनच ही *अटकण* खूप विचार करून, समजून घेऊन घालवावी लागते. म्हणूनच ही तरूण मुले लहान वयातच या *अटकणला* तोडण्याच्या पुरुषार्थामागे लागली आहेत.

## अटकणला तोडणारा - पराक्रमी भाव

**प्रश्नकर्ता :** *अटकणला* तोडण्यासाठी अगदी त्याच्यामागे लागलो तर जबरदस्त पराक्रमभाव उत्पन्न होईल ना?

**दादाश्री :** पराक्रम असेल तरच *अटकणच्या* मागे लागू शकतो. *अटकणच्या* मागे लागणे यालाच पराक्रम म्हणतात. पराक्रमाशिवाय *अटकण* सुटूच शकत नाही. ते 'पराक्रमी पुरुषां'चे काम आहे. तुम्हाला हे 'ज्ञान' दिले आहे, त्यामुळे पराक्रम होऊ शकतो!

निकाचित तर भोगावेच लागते. त्यात कोणाचे काही चालतच नाही. पण त्यातून दुसरे वादळ निर्माण होत नाही, कारण त्यात स्वत:ची इच्छा असे काही नसते. आंबा मिळाला तर खाईल, नाही मिळाला तर काही हरकत नाही. आंबा भोगावाच लागतो, खावाच लागतो. भोगायचा नसेल तरी पण भोगावाच लागतो, कारण ती पुद्गल स्पर्शना आहे, तिथे कोणाचे काही चालत नाही. परंतु *अटकण* म्हणजे आतमध्ये खोल दडलेली का असेना पण इच्छा शिल्लक आहेच. म्हणून या काळात या 'ज्ञानी पुरुषां'च्या हजेरीत राहून, स्वत:ची जी *अटकण* असेल तिला मुळापासून उपटून दूर करा. आणि ती दूर करणे शक्य आहे. या 'ज्ञानी पुरुषां'च्या हजेरीत सर्व रोग मिटतात! सर्व रोगांना मिटवते तीच 'ज्ञानी पुरुषां'ची हजेरी. तुम्हाला *अटकण* प्रिय आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही, *अटकण* आहे असे कळल्यावर तर डोळ्यातील कचऱ्यासारखी ती टोचत राहते. मग ती प्रिय कशी वाटेल?

**दादाश्री :** हो, टोचते! त्याला 'मायाशल्य' असे म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** एकीकडे *अटकण* चालू असते, आणि ते लक्षातही येते आणि दुसरीकडे एका मनाला ते आवडत असते आणि एका मनाला ते आवडत नसते, असे सगळे एकदम होत असते.

**दादाश्री :** हो, पण *अटकण* म्हणजे *अटकण.* तिला उपटून दूर करावी. ती पुन्हा बीजाच्या रूपाने उगवणार नाही अशा तऱ्हेने तिचे मुख्य मूळ उपटून टाकायला हवे आणि पराक्रमाने तसे करता येते.

**प्रश्नकर्ता :** ती *अटकण* जेव्हा येते तेव्हा 'दादा' पण हजर असतात. आम्ही म्हटले की दादा पाहा, असे सर्व येत आहे, तर?

**दादाश्री :** नाही, *अटकण* तर मूर्च्छित करून टाकते. त्यावेळी 'दादा' आठवत नाहीत, दादांचा विसर पडतो. आत्म्याचाही विसर पडतो आणि आपल्याला मूर्च्छित करून टाकते! जागृती राहतच नाही. 'दादा' हजर राहत असतील तर तिला *अटकण* म्हणत नाही, तर निकाचित कर्म म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** *अटकणची* जाणीव मागाहून झाली, तर त्यावर काय उपाय करावा?

**दादाश्री :** ती मूर्च्छा आहे, असे आपण समजून घ्यावे. त्यासाठी सामायिक करावी लागेल. इथे हे सर्व जण करतात ना, त्याच प्रकारे सामायिकमध्ये ती स्टेजवर ठेवावी लागेल.

**प्रश्नकर्ता :** लहान मुलाला बॅट-बॉल मिळत नाही तोपर्यंत त्याच्या मनात तेच राहते, आरडाओरडा करतो तर ती त्याची *अटकण* म्हणायची का?

**दादाश्री :** नाही, तिला *अटकण* म्हणत नाहीत. अनादि काळापासून

ज्यामुळे भटकत राहिला आहे, ती *अटकण*! बॅट-बॉल तर फक्त तेवढ्यापुरतेच आहे, 5-7 वर्षांचा होईपर्यंत ती गोष्ट राहील. बाल्यावस्था आहे तोपर्यंतच ती राहील. एकदा मोठा होऊन व्यापारात पडला की मग त्याला त्याबद्दल काहीच वाटत नाही. याउलट *अटकण* तर कायम राहते, पंधराव्या वर्षापासून म्हातारा झाला तरी *अटकण* राहतेच.

**प्रश्नकर्ता :** पुरुषार्थाने, पराक्रमाने *अटकण* काढू शकतो का?

**दादाश्री :** हो, सगळे काही होऊ शकते. म्हणून तर आम्ही सावधान करतो की, आता तुम्हाला आत्मा प्राप्त झाला आहे, तुम्ही आता पुरुष झाला आहात, पुरुषार्थ आहे, पराक्रम करू शकता असे आहे, म्हणून आता (मोक्षाचे) काम उरकून घ्या. पुन्हा अडकणे म्हणजे खूप मोठा धोका आहे, म्हणूनच आता त्याचे निराकरण (निपटारा) करून टाका!

स्वत:चे कोणतेही सुख प्राप्त झालेले नसेल तोपर्यंत कोणतीही *अटकण* पडू शकते. पण आता स्वत:चे स्वयंसुख उत्पन्न झाले आहे, आता तुम्हाला दुसऱ्या कोणत्याच सुखाच्या अवलंबनाची गरज नाही. म्हणून त्या सुखांना एका बाजूला ठेवून द्या. हे सुख आणि ते सुख दोन्हीही एकाच वेळी उत्पन्न होऊ शकत नाहीत. म्हणून *अटकणला* शोधून काढा.

अनुभव, लक्ष आणि प्रतीती तर सर्वांनाच असते. ते पुरुषार्थाचे फळ नाही. ते तर 'दादांच्या' कृपेचे फळ आहे. आता पुरुषार्थ आणि पराक्रम केव्हा म्हटला जाईल? तर ज्या दोरीने तुम्ही लोंबकळत आहात ती दोरी तुटेल तेव्हा, आणि पराक्रम आता तुम्हालाच करायचा आहे. हे जे तुम्हाला प्राप्त झाले आहे ते तर तुमच्या पुण्यामुळे तुम्हाला ज्ञानींची कृपा प्राप्त झाली, आणि त्या कृपेमुळे तुम्हाला हे प्राप्त झाले आहे!

तुमची ही *अटकण* जर सुटेल तर तुमचे बोलणे सर्वांना खूप आवडू लागेल. बोलणे चुकीचे नसते, पण *अटकणमुळे* बोलण्यात तणाव असतो. *अटकणमुळे* मुक्त हास्य पण उत्पन्न होत नाही. *अटकण*

संपल्यावर वाणी चांगली निघेल, हास्य चांगले होईल. म्हणून सगळ्या *अटकणी* काढून टाकून जगाचे कल्याण करा!

ह्या तीन गोष्टी मनोहर झाल्या पाहिजेत - वाणी, वर्तन आणि विनय. तुमच्यातील या तीन गोष्टी सुंदर झाल्या, म्हणजेच समोरच्याचे मन हरण करतील अशा झाल्या तर मग समजून जा की तुम्ही आता 'दादां'सारखे होऊ लागलात. मग काहीच अडचण नाही. मग 'सेफ साइड' आहे! म्हणजेच वाणी, वर्तन आणि विनय ही प्रत्यक्ष लक्षणे दिसायला हवीत. लक्षणाखेरीज खरी गोष्ट ओळखता येणारच नाही ना?

## अटकण संपवून टाका

नाश्ता वगैरे करा, तो तर करायचाच असतो. त्याला दादांचा काहीच विरोध नाही. पण कशामुळे तुम्ही लटकले होते ती *अटकण* शोधून काढा आणि अजूनही ती तार जुळलेली असेल तर मला सांगा, आणि सांगता येईल असे नसेल तर तुम्ही स्वतः ती शोधून काढून त्याच्यासाठी पराक्रम कराल तरी चालेल. त्याच्यासाठी इथे विधी करून मनात मागणी करा, तर मग आतमध्ये शक्ती उत्पन्न होईल. आणखी काहीच नाही!

निकाचित कर्मापासून तर तुम्ही वाचू शकतच नाही. त्याचा अर्थच असा की इच्छा नसेल, अजिबात इच्छा नसेल तरी पण ते भोगावेच लागते. स्वतःच्या मनात जरी 'मला आता काहीही नको' असे असेल तरी कर्मे त्याला उचलून घेऊन जातात, ते म्हणजे निकाचित. ज्या भावाने बंधन निर्माण केले गेले होते, त्याच भावाने सुटले! म्हणून निकाचित कर्म असले तरी हरकत नाही. निकाचित तर, खरे म्हणजे हा सर्व संसार निकाचितच आहे. तुम्हाला जरी स्त्रीची इच्छा नसेल किंवा स्त्रीला पुरुषाची इच्छा नसेल तरी पण ते भोगावेच लागते, त्याला निकाचित कर्म म्हणतात. पण *अटकणला* मात्र हरकत आहे! अजूनही त्याला कुठे गुदगुल्या होत आहेत याकडे लक्ष देण्याची गरज आहे. गुदगुल्या होतात तिथे माणूस मूर्च्छित होतो. गुदगुल्या हा शब्द समजला का तुम्हाला?

**प्रश्नकर्ता :** शब्द ऐकला आहे, पण एक्झॅक्ट (नेमका) अर्थ समजला नाही.

**दादाश्री :** एका खानदानी मुलाला नाटकात नाच करायची सवय लागली असेल, आपण ती सवय सोडवून त्याला दुसऱ्या परिचयात (व्यवसायात) ठेवतो, तर एक-दोन वर्षे त्याला काहीच त्रास होत नाही. पण त्यानंतर तो जेव्हा नाटकाच्या थिएटरजवळून जातो आणि तेथील बोर्ड वाचतो तेव्हा त्याला गुदगुल्या होतात. कारण मागील अज्ञान त्याला घेरून टाकते. त्याला मूर्च्छित करून टाकते. मग तो कसेही करून, खोटे बोलूनसुद्धा थिएटरमध्ये घुसतो. त्यावेळी तो काय खोटे बोलेल ते काही सांगता येत नाही.

अर्थात जोपर्यंत आत्म्याचे सुख नसते तोपर्यंत कोणत्या ना कोणत्या सुखात तो रमलेलाच असतो. परंतु आत्मज्ञान प्राप्त झाल्यावर तुमचे सुख किती सुंदर असते! जसे राहायचे असेल तसे राहू शकतो. समाधी दशेत राहता येते. म्हणजे जुन्या सर्व गोष्टी संपवता येईल. असे शक्य आहे. आपले 'ज्ञान' असे आहे की जर पाच 'आज्ञेत' निरंतर राहिला तर अगदी महावीर भगवंतांसारखी स्थितीत राहता येते. पण तसे राहता येत नाही याचे काय कारण आहे? तर पूर्व कर्मांच्या उदयाचे धक्के लागतात. आपल्याला जायचे असते उत्तरेला पण होडी दक्षिण दिशेला जाते. तरी पण आपण ते जाणावे, आपल्या लक्षात असते की आपल्याला जायचे आहे उत्तरेला पण (होडी) नेत आहे दक्षिणेला, हे लक्ष कधीही चुकता कामा नये. परंतु जर वाटेत दुसरा होडीवाला भेटला आणि त्याने बाटल्या दाखवल्या की आतमध्ये गुदगुल्या होऊ लागतात, त्याला हरकत आहे. मग तो उत्तर दिशा पार विसरून जातो आणि तिथेच मुक्काम ठोकतो. याला *अटकण* म्हणतात.

म्हणून आम्ही म्हणतो की तुम्ही सगळीकडून सुटा. आता 'पुरुष' झाले आहात तर पराक्रम करू शकाल. नाहीतर माणूस पूर्णपणे प्रकृतीच्या आधीन असतो, भोवऱ्यास्वरूप असतो. पण आता तुम्ही भोवरा रूपातून मुक्त होऊन पराक्रमी बनला आहात, स्व-पुरुषार्थ आणि स्व-पराक्रम

सहित आहात. आणि तुमच्यावर 'ज्ञानी पुरुषा'ची छत्रछाया आहे. मग आता तुम्हाला कसली भीती?

**प्रश्नकर्ता :** त्यासाठी तुमच्याबरोबर राहण्याची गरज आहे का?

**दादाश्री :** नाही, बरोबर राहण्याचा प्रश्नच नाही. परंतु जास्त संपर्कात असण्याची गरज तर आहेच ना? संपर्कात असाल तर (रोग) निघून गेला हे कळेल ना? आणि संपर्कात राहिलात तर मग हा रोग काढण्याची शक्ती पण उत्पन्न होईल ना? स्वतःच्याच शक्तीने *अटकण* दूर करणे आणि पराक्रम करणे हे सोपे नाही. 'इथून' शक्ती मिळवून कराल तरच पराक्रम होईल.

प्रथम तर ह्या *अटकणी* ओळखताच येत नाहीत की त्यांचे रूप कसे असते आणि त्यांचे चरितर (पाखंडाने भरलेले वर्तन) कसे असते ते कळत नाही. म्हणून त्या *अटकणला* शोधून काढायचे की गुदगुल्या कुठे होत आहेत, ज्ञान-भान कुठे हरवून जात आहे. एवढेच पाहायचे आहे. 'तुम्हाला' या चंदुभाईवर किती लक्ष ठेवले पाहिजे? त्याला सांगा, 'तुम्ही सर्व काही खा, प्या, ह्या दादांच्या आज्ञेनुसार वागा, त्यात कमतरता राहिली तर पाहून घेऊ.' परंतु चंदुभाईला गुदगुल्या कुठे होत आहेत त्याकडे 'आपण' लक्ष ठेवायचे. C.I.D. सारखे त्याच्यावर लक्ष ठेवा. कारण अनादिकाळापासून *अटकणमुळेच* या जगात लटकून पडला आहे, आणि ही *अटकण* तर सुटतच नाही. तर आता हे 'ज्ञानी पुरुष' आहेत, ते *अटकणीपासून* मुक्त करतील.

## सर्वात मोठी अटकण विषयविकारासंबंधित

कृपाळूदेव यांना लल्लूजी महाराजांनी सूरत इथे पत्र लिहिले होते की मला तुम्हाला भेटण्यासाठी मुंबईला यायचे आहे. तेव्हा कृपाळूदेव यांनी म्हटले, 'मुंबई मोहमयी नगरी आहे. साधु-आचार्य यांच्यासाठी ही योग्य नाही. इथे तर इकडून-तिकडून सगळीकडून मोह घुसेल. तुमच्या तोंडातून घुसेल, नाहीतर कानातून घुसेल, डोळ्यातून घुसेल. शेवटी ही जी हवा जाण्याची छिद्रे आहेत, तिथून

सुद्धा मोह घुसेल!! म्हणून येथे येण्यात काहीच फायदा नाही.' मुंबईचे नाव कृपाळूदेव यांनी काय ठेवले? 'मोहमयी नगरी!' त्यात मी तुम्हाला हे ज्ञान दिले आहे. तर काय आता ही मोहमयी राहिली नाही? आता बी-ओ-एम-बी-ए-वाय बॉम्बे झाले आहे का? नाही, मोहमयीच आहे. म्हणून आम्ही तुम्हाला सांगतो की इतर पाच इंद्रियांच्या विषयांबद्दल नाही, पण स्त्रियांना आणि पुरुषांना एवढेच सांगतो की जेव्हा स्त्री-विषयक किंवा पुरुष-विषयक काही विचार आला तर ताबडतोब तिथल्या तिथे प्रतिक्रमण करायला हवे. 'ऑन द स्पॉट' तर करायलाच हवे, पण नंतर परत त्यासाठी शंभर-दोनशे वेळा प्रतिक्रमण करायला हवे.

कधी हॉटेलात नाश्ता करायला गेलात तर त्यासाठी प्रतिक्रमण केले नाही तर चालेल. मी त्याचे प्रतिक्रमण करवून घेईन. परंतु हा विषयसंबंधी रोग घुसता कामा नये. हा तर फार भयंकर रोग आहे. हा रोग काढण्याचे औषध काय? तर प्रत्येक माणसाला जिथे *अटकण* असेल, तिथे हा रोग असतो. एखाद्या पुरुषाला एखादी स्त्री जात असेलली दिसली तर लगेच आतील वातावरण बदलून जाते. तशी तर ही सर्व टरबुजेच आहेत, पण त्यात त्यांने विस्तारपूर्वक एक विशिष्ट रूप शोधून काढलेले असते! या चिबूडांचा ढीग पाहून कोणाला राग (मोह, आसक्ती) उत्पन्न होतो का? परंतु माणूस आहे म्हणून त्याला रूपाची सवय पूर्वीपासूनच आहे. 'हे डोळे किती सुंदर आहेत, मोठे मोठे डोळे आहेत!' असे म्हणतात. अरे, असे सुंदर मोठे मोठे डोळे तर या म्हशीच्या भावाचेही असतात. मग तिथे मोह का होत नाही? मग तो म्हणतो 'तो तर रेडा आहे आणि हा माणूस आहे.' अरे, हीच तर अडकण्याची जागा आहे!

## कार्य सिद्ध करून घ्या

म्हणून जिथे जिथे ज्या ज्या दुकानात आपले मन अडकले असेल त्या त्या दुकानात जे शुद्धात्मा आहेत, तेच आपल्याला सोडवणारे आहेत. म्हणून त्यांच्याकडे मागणी करायची की मला ह्या अब्रह्मचर्य विषयांतून

मुक्त करा. इतर जागी तुम्ही सुटण्यासाठी व्यर्थ प्रयत्न कराल हे चालणार नाही, तर त्याच दुकानातील शुद्धात्मा तुम्हाला या विधीद्वारे सोडवणारे आहेत!

आता अशी कोणाची पुष्कळशी 'दुकाने' नसतात. थोडीच 'दुकाने' असतात, ज्यांची पुष्कळ 'दुकाने' असतील त्यांना जास्त पुरुषार्थ करावा लागेल. पण ज्यांची थोडीशीच 'दुकाने' असतील त्यांनी तर साफ करून सर्व 'एक्झॅक्ट' (ठीक) करून घ्यायला हवे. खायला, प्यायला हरकत नाही, पण ह्या विषयाचीच अडचण आहे. स्त्री-विषय आणि पुरुष-विषय, हे दोन्ही शत्रुत्व निर्माण करण्याचे कारखाने आहेत, म्हणून कसेही करून त्याचे निराकरण करा.

**प्रश्नकर्ता :** यालाच आपण कार्य सिद्ध करून घेणे म्हणता का?

**दादाश्री :** नाही तर काय? हे जे सगळे रोग आहेत ते काढून टाकावेत! यात मी तुम्हाला काही करायला सांगतच नाही. फक्त 'जाणा' असे सांगत आहे. हे ज्ञान जाणण्यासाठी आहे, करण्यासाठी नाही. जे ज्ञान जाणले त्याचा परिणाम आल्याखेरीज राहणारच नाही. अर्थात तुम्हाला काहीही करायचे नाही. महावीर भगवंतांनी म्हटले होते की वीतराग धर्मात 'करोमि, करोसि, करोति' असे नसते. ही आपली *अटकण* आहे, ते तुम्हाला समजते की नाही?

**प्रश्नकर्ता :** ताबडतोब समजते.

**दादाश्री :** ज्या प्रमाणे लफड्याला लफडे आहे, असे समजल्यावर ते सुटते. तसेच *अटकणला अटकण* आहे असे जाणले तर ती सुटेल. भगवंतांनी विचारले, की 'तू *अटकण* ओळखली आहेस का?' तर म्हणतो 'हो.' मग भगवंत म्हणतात, 'तर मग तू मुक्त आहेस.' मग तुम्ही कुठल्या 'खोलीत' बसायचे ते तुम्हीच ठरवायचे! बाहेर खडे उडत असतील तर 'तुम्हाला' तुमच्या 'खोलीत' बसले पाहिजे आणि 'क्लीयरन्स' (शांतते)ची घंटा वाजली की मग बाहेर पडायचे.

**प्रश्नकर्ता :** पुरुषार्थाचा जो भाग आहे, त्यातील सूक्ष्म समज हा भाग, म्हणजेच पुरुषार्थ का? इंद्रियावरील लगाम सोडून देणे हे यात मोडते का?

**दादाश्री :** तुम्ही सकाळी बोला की आज इंद्रियांच्या घोड्यांचे लगाम सोडून देत आहे, असे शुद्धभावाने पाच वेळा बोला. मग त्या सुटलेल्या लगामाला तुम्ही पाहत तर राहा. रविवारचा पूर्ण दिवस असा व्यतीत होऊ द्या. हे तर तुम्हाला सतत वाटत राहते 'काय होईल? काय होईल?' 'अरे, काहीही होणार नाही. तुम्ही भगवंत आहात. भगवंताला कसे काय होईल?' मी भगवंत आहे अशी हिंमत तुमच्यात यायला नको का? 'दादां'नी मला भगवंत पद दिले आहे! असे ज्ञान आहे, म्हणून तुम्ही भगवंत झाला आहात. पण अजून त्याचा पुरेपुर लाभ मिळत नाही. त्याचे कारण काय? तर तुम्ही त्याला प्रायोगिकपणे घेतच नाही ना? त्या पदाचा कधी उपयोगच करत नाही. थोडेफार असे राहा ना!

**प्रश्नकर्ता :** आम्ही या पाच इंद्रियांच्या विषयात अरुचीने म्हणजे अभिप्रायरहित राहावे, असा याचा अर्थ आहे का?

**दादाश्री :** अभिप्राय तर पूर्णपणे सुटला पाहिजे. अभिप्राय तर अजिबात असताच कामा नये. थोडादेखील अभिप्राय असेल, एखाद्या जागी राहिला असेल, तर तो पूर्ण नष्ट केला पाहिजे. 'या संसारात सुख आहे, या पाच इंद्रियांत सुख आहे', असा अभिप्राय तर अजिबात असता कामा नये! आणि ते सर्व अभिप्राय आपले नाहीत ते सर्व चंदुभाईचे आहेत! 'मी तर दादा भगवानांनी दिलेला शुद्धात्मा आहे' आणि शुद्धात्मा म्हणजेच परमात्मा! एवढे समजून घ्यायची गरज आहे. या ज्या पाच आज्ञा दिल्या आहेत, त्या 'शुद्धात्म्या'च्या 'प्रोटेक्शन'साठी (संरक्षणासाठी) आहेत.

## वैराचा कारखाना

समभावाने निकाल करायचा नियम काय सांगतो की तू कोणत्याही प्रकारे त्याच्याशी वैर निर्माण होणार नाही अशा प्रकारे निकाल कर!

वैरातून मुक्त हो. वैर वाढता कामा नये, एवढी एकच गोष्ट आपल्याकडे करण्यायोग्य आहे. आणि वैर वाढण्याचा मुख्य कारखाना कोणता आहे? तर स्त्री-विषय आणि पुरुष-विषय!

**प्रश्नकर्ता :** त्यात वैर कसे निर्माण होते? अनंत काळाचे वैरबीज पडते असे म्हणतात, ते कसे?

**दादाश्री :** समजा, एक मेलेला पुरुष आहे आणि एक मेलेली स्त्री आहे आणि त्यात औषध भरून तो पुरुष, पुरुषासारखाच आणि ती स्त्री, स्त्रीसारखीच राहत असेल तर मग काही हरकत नाही. त्यांच्याबरोबर वैर निर्माण होणार नाही, कारण ते जिवंत नाहीत. पण हे तर जिवंत आहेत म्हणून वैर बांधले जाते.

**प्रश्नकर्ता :** वैर का निर्माण होते?

**दादाश्री :** अभिप्राय वेगवेगळे असतात म्हणून. तुम्ही म्हणाल 'आता मला सिनेमाला जायचे आहे.' तेव्हा ती म्हणेल 'नाही, आज तर मला नाटक बघायला जायचे आहे.' म्हणजे टाइमिंग जुळत नाहीत. जर एक्झॅक्ट टाइमिंग जुळत असतील तरच विवाह करा.

**प्रश्नकर्ता :** तरी पण कोणी असाही असेल की जसे तो म्हणेल तसेच खरोखर होईलही.

**दादाश्री :** जर कोणी खूपच अद्‌भुत पुण्यवान असेल तर त्याची बायको सतत त्याच्या आधीन राहील. त्या स्त्रीपाशी नंतर स्वत:चे वेगळे असे काही नसते, स्वत:चे काही अभिप्राय नसतात, ती सतत आधीनच राहते.

त्याचे काय आहे, की या संसारी लोकांना ज्ञान दिले आहे. मी साधू बनायला सांगितलेले नाही. पण ज्या फाइल्स आहेत त्यांचा 'समभावाने निकाल' करा असे सांगितले आहे! आणि प्रतिक्रमण करायला सांगितले आहे. हेच दोन उपाय सांगितले आहेत. हे दोन्ही करत राहाल तर तुमची दशा अडवणारा कोणी असणारच नाही. उपाय सांगितले

नसतील तर मग किनाऱ्यावर उभे राहता येणारच नाही ना? किनाऱ्यावर जोखीम आहे.

जेव्हा तुमचे तुमच्या बायकोबरोबर मतभेद होत असत, तेव्हा तुम्हाला राग व्हायचा की द्वेष?

**प्रश्नकर्ता :** या दोनही गोष्टी तर आळीपाळीने होतात. आपल्याला 'स्युटेबल' (हवे तसे) असेल तर राग होतो आणि 'अपोझिट' (नकोसे) असेल तर द्वेष होतो.

**दादाश्री :** म्हणजेच हे सर्व राग-द्वेषाच्या आधीन आहे. अभिप्राय एकाकार होतच (जुळतच) नाहीत ना? क्वचितच अशी एखादी पुण्यवान व्यक्ती असेल की ज्याची बायको म्हणेल 'मी तुमच्या आधीन राहीन, तुम्ही कुठेही गेलात, अगदी चितेवर गेलात तरी मी तुमच्याच आधीन राहीन!' याला तर धन्य भाग्यच म्हणावे लागेल ना? पण असे एखाद्यालाच असते!! म्हणजेच यात मजा नाही. आपल्याला आता नवा संसार उभा करायचाच नाही. आता मोक्षालाच जायचे आहे. कसेही करून, फायद्या-तोट्याच्या सर्वच खात्यांचा निकाल करून, मांडवली करून निपटारा करायचा आहे.

खरोखर हा मोक्षाचा मार्ग आहे. कोणत्याही काळात कोणी नावही घेणार नाही असे ज्ञान दिले आहे. परंतु जर तुम्ही जाणूनबुजून उलट वागाल तर मग सर्व बिघडेल. तरी पण परत काही काळाने निराकरण होईलच. म्हणजेच एकदा जे प्राप्त झाले आहे, ते सोडण्यासारखे नाहीच.

## लोकसंज्ञेमुळे अभिप्राय अवगाढ बनतात

संपूर्ण जग अभिप्रायांमुळे चाललेले आहे. अभिप्राय ही गोष्ट अशी आहे की तुमच्याकडे आंबे आले आणि इतर सर्व वस्तू आल्या. आता इंद्रियांना आपल्या प्रकृतीनुसार सर्व आवडते, आणि इंद्रिये ते सर्व खातात, जास्तही खातात, पण इंद्रिये काही अभिप्राय बनवत नाहीत. ही तर आपली बुद्धी ठरवते की हे आंबे खूप चांगले आहेत! अर्थात त्याला

आंब्याबद्दल अभिप्राय बनतो. मग तो दुसऱ्यांनाही सांगतो 'अहो, आंब्याइतकी चांगली वस्तू जगात दुसरी नाहीच. मग त्याला सारखी आंब्यांची आठवण पण येते, आंबे मिळत नाहीत हे खटकत राहते. परंतु इंद्रियांना असे काहीच नसते, आंबे आले तर खातात, नाही आले तर नाही खात. म्हणजे हे अभिप्रायच आहेत, तेच त्रास देतात. आता यात फक्त बुद्धीच काम करते असे नाही, तर लोकसंज्ञेचाही यात खूप प्रभाव पडतो. लोक जे मानतात, तशी प्रथम त्याची बिलीफ बनते की हे चांगले आणि हे वाईट. आणि जर त्याच्या आवडत्या व्यक्तीने तसे सांगितले तर त्याची बिलीफ जास्त बळकट होत जाते!

अशाच प्रकारे अभिप्राय कोणी देत नाही, पण लोकसंज्ञेमुळे अभिप्राय बनतात की माझ्याशिवाय कसे होईल? मी असे केले नाही तर कसे चालेल? अशी संज्ञा फिट झाली आहे, म्हणून आम्ही तुम्हाला 'व्यवस्थित शक्ती' कर्ता आहे असे ज्ञान दिले आहे. यामुळे तुमचा अभिप्राय आता बदलला आहे की प्रत्यक्षात आपण कर्ता नाही, तर 'व्यवस्थित' कर्ता आहे!

लोकसंज्ञेमुळे अभिप्राय निर्माण झाले आहेत, ज्ञानींच्या संज्ञेने ते तोडून टाकायचे आहेत! सर्वात मोठा अभिप्राय म्हणजे 'मी कर्ता आहे', तो अभिप्राय तर ज्या दिवशी ज्ञान दिले त्या दिवशी 'ज्ञानी पुरुष' यांनी तोडून टाकला. पण प्रत्येकाच्या प्रकृतीनुसार इतर छोटे छोटे अभिप्राय बनलेले असतात. काही लोकांचे तर खूप मोठे अभिप्राय असतात, त्यांना *अटकण* म्हणतात. असे तर करावेच लागते ना? असे सर्व अभिप्राय अजून राहिलेले आहेत, ते सर्व जेव्हा काढून टाकाल, तेव्हाच वीतराग मार्ग पूर्णपणे खुला होईल.

मगनभाईने खोलीत पाय ठेवल्याबरोबर तुमच्या मनात त्यांच्याबद्दल अभाव निर्माण होतो, असे का? तर मगनभाई नालायक स्वभावाचेच आहेत, असा अभिप्राय बनलेला आहे. म्हणून ते जर काही चांगले सांगू लागले, तरी पण तुम्ही त्यांना वाकडे तोंडच दाखवता. हे जे अभिप्राय बनले आहेत, ते सर्व काढावे तर लागतीलच ना?

म्हणजेच कुठल्याही प्रकारचे अभिप्राय ठेऊ नयेत. ज्यांच्याबद्दल वाईट अभिप्राय बनले असतील ते सर्व काढून टाकावेत. हे सर्व व्यर्थ अभिप्राय बनलेले आहेत. गैरसमजुतीतून उत्पन्न झाले आहेत.

कोणी म्हणेल 'मी माझे अभिप्राय काढून टाकले तरी पण त्याचा प्रकृती स्वभाव थोडाच बदलणार आहे?' तेव्हा मी म्हणतो त्याचा प्रकृती स्वभाव जरी बदलला नाही तरी पण आपल्याला काय? त्यावर तो म्हणेल, 'आमच्यातील संघर्ष तर तसाच राहिल ना?' तर मी सांगतो 'नाही, समोरच्याबद्दल जसे तुमचे परिणाम असतील तसेच परिणाम समोरच्याचेही होतील.' हो, आता तुमचे त्याच्याबद्दलचे अभिप्राय तुटलेत आणि तुम्ही त्याच्याशी खुश होऊन गप्पा मारल्या, तर तो पण तुमच्याबरोबर खुश होऊन गप्पा मारील. मग तेव्हा तुम्हाला त्याची प्रकृती दिसणार (जाणवणार) नाही.

म्हणजेच तुमच्या मनाची सावली त्याच्यावर पडते. आमच्या मनाची सावली सगळ्यांवर कशी पडते? अगदी घनचक्कर माणूस असेल तरी तो शहाणा होतो. जर तुमच्या मनात असे असेल, की रमणभाई तुम्हाला आवडत नाहीत, तर रमणभाई येताच तुमच्या मनात नापसंती उत्पन्न होईल आणि त्याचा फोटो त्याच्यावर पडेल! तुमच्या मनात काय चालू आहे याचा फोटो लगेचच त्याच्या आत उमटतो. आपल्या आतील हे परिणाम समोरच्याला गोंधळवतात. त्याला स्वत:ला ते समजत नाही पण गोंधळ निर्माण होतो. म्हणून तुम्ही अभिप्राय मोडून काढले पाहिजेत. तुमचे सर्व अभिप्राय तुम्ही धुऊन टाकावेत, तर मग तुम्ही सुटाल.

नाही तर सगळ्यांसाठी काही तुम्हाला असे होत नाही. कोणी जर रोज चोरी करत असेल तरी तुम्हाला तो चोर आहे असा अभिप्राय बनवायची काय गरज आहे? तो चोरी करतो, ते त्याचे उदयकर्म आहे! आणि तो ज्याचे चोरतो, ते त्याचे उदयकर्म आहे. यात आपले काय देणेघेणे? परंतु जर आपण त्याला चोर म्हटले तर तो अभिप्रायच आहे ना? आणि खरोखर तर तो आत्माच आहे ना?

भगवंतांनी सर्वांना निर्दोष पाहिलेले. त्यांनी कोणालाही दोषी पाहिले नव्हते, आणि जेव्हा आपली दृष्टी तशी शुद्ध होईल तेव्हा वातावरण शुद्ध होईल. मग सर्व जग बागेसारखे वाटेल. प्रत्यक्षात लोकांमध्ये दुर्गंध नाही. लोकांच्या बाबतीत स्वतःच अभिप्राय बनवतो. आम्ही कोणाबद्दलही बोललो तरी आमच्या मनात तो असाच आहे, असा अभिप्राय नसतो.

मग 'आपण' अभिप्राय काढून टाकले म्हणून समोरच्या व्यक्तीत परिवर्तन झाले असा अनुभव देखील आपल्याला येतो. अभिप्राय बदलण्यासाठी काय करावे? तर तो जर चोर असेल तर आपण तो सावकार आहे असे म्हटले पाहिजे. मी याच्यासाठी जो अभिप्राय बनवला होता तो चुकीचा आहे, म्हणून मी आता हा अभिप्राय काढून टाकतो. तर अशा प्रकारे 'चुकीचा आहे, चुकीचा आहे' असे म्हणावे. माझा अभिप्राय 'चुकीचा' आहे असे म्हटल्यावर तुमचे मन बदलेल. नाहीतर बदलणार नाही.

काही लोकांची वाणी खूप बिघडलेली असते. अभिप्रायांमुळेच तसे होते. अभिप्रायांमुळे कटू शब्द निघतात, *तंतीली* (बोचणारी) वाणी बाहेर पडते! म्हणजे स्वतः अशी तंतीली वाणी बोलतात त्यामुळे समोरच्याला पण तसेच बोलायला उद्युक्त करतात.

अनंत जन्मांपासून लोकसंज्ञेनेच चाललो आहोत. त्याचाच हा सगळा भरलेला माल आहे! म्हणजे जे अभिप्राय भरले आहेत, त्यांचीच ही भानगड आहे. जे अभिप्राय बाळगलेलेच नाहीत, त्यांची काहीच भानगड नसते.

## कमिशन दिल्याशिवाय तप

आपण तप करावे पण जे घरबसल्या आलेले असतात ते तप, त्यांना बोलवायला जायची गरज नसते! पुण्यवान लोकांना सर्व गोष्टी घरबसल्या मिळतात. जर कधी गाडीत कोणी भांडू लागला तर समजावे की हे तप आले आहे. 'अहाहा! मला शोधत शोधत घरी आले!' असे

समजून त्यावेळी तप करायला हवे. महावीर भगवंत असे प्राप्त तप व्यतिरिक्त कोणतेच तप करत नसत. जे प्राप्त तप समोर आले असेल त्याला ढकलून दूर करायचे नाही. आणि हे तर काय करतात? जे आलेलेच नाही त्याला बोलावतात, म्हणतात परवापासून मी तीन दिवस उपास करणार आहे, आणि जे तप समोर आले आहे त्याचा तिरस्कार करतात.' म्हणतील 'माझा पाय दुखत आहे, तर मी सामायिक कसे करू? हा पायच असा आहे.' असे म्हणत पायाला शिव्याही देत बसतात! 'माझा पाय दुखत आहे' हे कोणाला का कळू द्यायचे. कोणाला कळू दिले तर त्याला तप म्हणताच येणार नाही. असे जर कोणाला कळले तर तो तुमच्या तपातला वाटा घेऊन गेला, असे म्हटले जाईल. तप आपण करायचे आणि तपाच्या फायद्यातील दोन आणे तो दुसराच खाणार, याला काय अर्थ? त्याने आपले बोलणे ऐकले त्याचे त्याला दोन आणे मिळतात. असे आश्वासन घेऊन कमिशन का द्यायचे?

मुंबईहून बडोद्याला कारने जायचे होते आणि बसताक्षणीच म्हटले, 'आता सात तास एका जागी बसायचे आहे, तप समोर आले आहे!' म्हणजे आम्ही तुमच्याबरोबर तर वार्तालाप करतो पण आतही वार्तालाप चालूच असतो. 'आज तुम्हाला प्राप्त तप आले आहे. म्हणून एक अक्षर पण बोलायचे नाही.' लोकांना तर दिलासा द्यावासा वाटतो, 'दादा, आपल्याला ठीक वाटत आहे की नाही?' तर आम्ही म्हणतो 'खूप छान वाटत आहे.' पण आम्ही कोणाला कमिशन देत नाही. कारण आम्ही भोगून घेतो! एक अक्षरही बोलले, तर ते दादा नव्हे! याला प्राप्त तप केले असे म्हणतात.

## उद्दीरणा, पराक्रमाने प्राप्त होऊ शकते

**प्रश्नकर्ता :** ही जी उद्दीरणा (भविष्यात फळ देणाऱ्या कर्मांना त्यांच्या वेळेपूर्वी बोलावून ती संपविणे) करतात, त्याला खरे तप म्हणत नाहीत का?

**दादाश्री :** उद्दीरणा, तो तर पुरुषार्थ मानला जातो. पण पुरुष

झाल्यानंतरचा तो पुरुषार्थ आहे. खरे तर तो पराक्रमात येतो. सातव्या गुंठाण्यापूर्वी कोणी उद्दीरणा करू शकत नाही, तो पराक्रमभाव आहे! आता ह्या ज्ञानानंतर तुम्ही सर्व उद्दीरणा करू शकता! वीस वर्षानंतर तुम्हाला जी कर्मे उदयास येणार आहेत, ती तुम्ही आज भस्मिभूत करू शकता (संपवू शकता).

**प्रश्नकर्ता :** पण जे वीस वर्षानंतर येणारे कर्म आहे ते आम्हाला आज कसे कळणार?

**दादाश्री :** का बरे? ती गाठ संपूर्ण विरघळली तर मग सर्व संपले! मग तर फक्त 'एविडन्स' एकत्र येतील एवढेच, पण ते दुःखदायी राहिले नाही.

**प्रश्नकर्ता :** आम्ही जे प्रतिक्रमण करतो, त्यामुळे उद्दीरणा होत आहे ना?

**दादाश्री :** त्यात उद्दीरणाच होते. कारण आज अडचण आली नाही तरी पण प्रतिक्रमण का करतो? मौजमजा करण्यासाठी नाही. शिवाय प्रतिक्रमण करता करता जो आनंद होतो, तो अतिरिक्त लाभ आहे.

आपली 'अक्रम'ची जी सामायिक तुम्ही करता, त्यात सर्व कर्मांची उद्दीरणा होईल असे आहे. आपण चरम शरीरी नाही, म्हणून ज्यांना ही कर्मे राहू द्यायची असतील त्यांनी ती राहू द्यावीत. परंतु चरम शरीरीला तर उद्दीरणा करावीच लागते. कारण त्यांना वाटते की आता आयुष्याचा अंत जवळ झाला आहे आणि दुकानात अजून खूप माल शिल्लक आहे, असे दिसत आहे. तो संपविल्याशिवाय कसे काय जाता येईल? एकीकडे मुदत संपत चालली आहे, म्हणून भगवंत काही उपाय करा. तेव्हा भगवंत म्हणतात, 'कर्मांचा विपाक करा. विपाक म्हणजे त्यांना पिकवा.' आंबे जसे गवतात भरून त्यांना आपण पिकवतो, तसेच तुम्ही कर्मांना पिकवा. मग ती उदयात येतील. उद्दीरणा म्हणजे कर्मांचा उदय होण्यापूर्वीच त्यांना बोलावून ती संपविणे.

**प्रश्नकर्ता :** त्याला पराक्रम म्हणतात ना?

**दादाश्री :** हो, त्याला खूप मोठा पराक्रम म्हणतात. पुरुषार्थात तर तुम्ही आहातच, परंतु याला पराक्रम म्हणतात. हा तर पुरुषार्थापेक्षाही खूप पुढे आहे.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हणता की कर्मांचा नाश केला जातो, तर मग जी संचित कर्मे आहेत, त्यांचे काय करावे?

**दादाश्री :** संचित कर्मे तर जेव्हा वेळ येईल, तेव्हा आपोआप पिकतील आणि तुमच्यासमोर येतील. आपल्याला ती शोधायची गरज नाही. संचित कर्मे आपली फळे देऊन निघून जातात आणि जे पुरुष झाले आहेत, ते एक विशिष्ट प्रकारच्या योगाद्वारे ठराविक प्रकारची कर्मे नष्ट करू शकतात, पण पुरुष झाल्यानंतरच. तुम्ही सध्या ज्या दशेत आहात त्या दशेत तसे होऊ शकत नाही. सध्या तुम्हाला ते जमणार नाही. सध्या तर तुम्हाला प्रकृती नाचवते आणि तुम्ही नाचता. पुरुष झाल्यानंतर ज्या योगाद्वारे कर्मे संपविली जातात, त्याला उद्दीरणा असे म्हणतात.

उद्दीरणा म्हणजे काय? कच्च्या फळांना पिकवून त्यांना झटकून टाकणे. कर्मांचा विपाक झाल्याशिवाय, खिचडी कच्ची असेल तर काय करतात? तशीच कर्मे कच्चीच राहिली आणि जाण्याची वेळ आली तर काय करणार? म्हणून मग त्यांना पिकवतात आणि त्या कर्मांची उद्दीरणा होते. परंतु पुरुष झाल्यानंतरच हा पुरुषार्थ होऊ शकतो. पुरुषार्थ केल्यानंतर त्या व्यक्तीला तेवढा अधिकार आहे!

उद्दीरणाचे दोन फायदे आहेत. एक तर उद्दीरणा करण्यासाठी तुम्हाला आत्मस्वरूप व्हावे लागते. आणि दुसरे त्यामुळे कर्मांची उद्दीरणा होते.

आत्मस्वरूप कधी होता येते? जेव्हा सामायिक आणि कायोत्सर्ग दोन्हीही होतात, तेव्हा आत्मस्वरूप होता येते. आपल्याइथे तर फक्त सामायिकद्वारे आत्मस्वरूप होत असतात, त्यामुळे उद्दीरणा होऊन जाते.

हे 'अक्रम ज्ञान' आहे, म्हणूनच तुम्ही आत्मस्वरूप होऊ शकता आणि तेव्हाच सर्व पुरुषार्थ आणि पराक्रम होऊ शकतो!

नाहीतर, सर्व जग ज्याला पुरुषार्थ मानते, त्याबद्दल हे दादा जे म्हणतात त्याचा जरा विचार तर करा. ह्या कडुनिंबाचे प्रत्येक पान कडू असते, प्रत्येक फांदी कडू असते, त्यात कडुलिंबाचा काय पुरुषार्थ? तसेच लोक तप, त्याग करतात, त्यात त्यांचा काय पुरुषार्थ?

स्वत: तर भोवरा आहे, तो उद्दीरणा करायला कसा काय बसला? पुरुष झालेलेच नाहीत, म्हणून त्यांना भोवरा म्हटले आहे. मग भोवऱ्याचा आणि उद्दीरणेचा, दोघांचा मेळ कसा बसेल?

निकाचित कर्मे तर नेहमी कडूच लागतात. गोड निकाचित कर्म असेल, पण शेवटी जेव्हा त्याचा वीट येतो तेव्हा ते कडू लागते, आणि वाटते आता हे इथून गेले तर बरे.

निकाचित कर्मे दोन प्रकारची असतात : एक कडू आणि एक गोड. गोड कर्मे देखील अधिक प्रमाणात आली तर आपण त्यात अडकतो. खूप आइस्क्रीम दिलेत तर तुम्ही किती खाणार? शेवटी त्याचा पण वीट येणारच ना? आणि कडूमध्ये तर खूपच वीट येतो. त्यात तर काही प्रश्नच नाही. पण भोगल्याशिवाय गत्यंतरच नाही.

निकाचित कर्मे म्हणजे जी भोगावीच लागतात. आणि इतर सर्व कर्मे अशी असतात की ती संपू शकतात. ज्याला उद्दीरणा म्हणतात, त्याला तप म्हटले तरी चालेल. ते तप पण नैमित्तक आहे. तप जर तो स्वत: करू शकत असता तर त्याला कर्ता म्हटले असते. अर्थात ते नैमित्तिक तप आहे. म्हणजेच तप जर उदयात आले तर ती कर्मे संपतात, नाहीतर तसे होत नाही तो जर असे म्हणेल की मी उद्या तप करीन, तर तसे होणार नाही आणि असे करत करत तिरडी निघेल! तेव्हा मग कोणाच्या तरी खांद्यावरून जावे लागेल. उद्दरीणा झाली नाही तर ऋण फेडण्यासाठी परत यावे लागेल.

उद्दीरणा म्हणजे काय? तर ज्यांचा विपाक झाला नाही, अशा

कर्मांचा विपाक करून त्यांना उदयात आणणे. जे चरम शरीरी असतात ते आणू शकतात. जर चरम शरीरीची कर्मे अधिक असतील, तर तो उद्दीरणा करू शकतो. पण तो कसा असावा? सत्ताधीश असला पाहिजे. पुरुषार्थासहित असला पाहिजे. पुरुष झाल्याशिवायचे सर्व भोवरे आहेत. नामधारी सर्व भोवरेच आहेत. या भोवऱ्यात इकडून श्वास आत गेला की तो फिरतो. मग त्याची दोरी उलगडत जाते. त्याची दोरी उलगडत आहे हे आपल्याला दिसतेसुद्धा. म्हणून तर आम्ही सर्व जगाला भोवरा म्हटले आहे. त्याचा खुलासा हवा असेल तर तो मी करीन. आम्ही जे शब्द बोलतो, ते सर्व खुलासा करण्यासाठीच बोलतो. या दादांनी जे ज्ञान पाहिले आहे, ते ज्ञान आणि अज्ञान, दोघांना पूर्णपणे वेगळे वेगळे पाहिले आहे.

पुरुषार्थ उदयाधीन नसतो, पुरुषार्थ तर तुम्ही जेवढा कराल तेवढा तुमचा! आपले महात्मा पुरुष झाले आहेत, त्यांच्या आत निरंतर पुरुषार्थ चालू असतो. पुरुष, पुरुषधर्मात आला आहे, म्हणूनच प्रज्ञा सावध करत असते! साऱ्या जगाला आम्ही भोवरा म्हणतो. भोवरा स्वतः काय पुरुषार्थ करणार? इथून श्वास आत गेला की भोवरा फिरत राहील आणि श्वास दाबला गेला की भोवरा खाली पडेल! आणि आपले महात्मा तर पुरुष झाले आहेत, म्हणून जर त्यांचा श्वास चालला नाही, तर त्यांना आत घुसमट होते. म्हणून मग ते स्वतःच्या गुहेत शिरतात, म्हणतात चला, आपल्या सेफ साइडवाल्या (सुरक्षित) जागी जाऊया. म्हणजे त्यांना स्वतःच्या अमरपदाचे भान आहे.

## पराक्रमभाव

**प्रश्नकर्ता :** 'चार्ज पॉइंट' सोडून बाकीची जी सर्जक शक्ती आहे, ते काय आहे? पुरुषार्थ आहे का?

**दादाश्री :** सर्जक शक्ती म्हणजे आम्हाला काय म्हणायचे आहे, उदाहारणार्थ सूर्योदय केव्हा होतो, तर सर्व 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एव्हिडेन्सेस्' एकत्र येतात तेव्हा उदय होतो. या घड्याळात चार वाजले,

त्याच्या घड्याळात पण चार वाजले, मुंबईतील मोठ्या घड्याळात पण चार वाजले आणि इथे सूर्यनारायण येतील असे होत नाही. सूर्यनारायणाला कितीही घाईगडबड असेल तरी ते इथे येऊ शकणार नाहीत! त्यांचा सूर्योदय कधी होईल? तर जेव्हा सर्व 'एव्हिडेन्सेस्' एकत्र येतील तेव्हाच! म्हणजेच जी उदयकर्मे आहेत ती सर्जक शक्तीच्या आधीन आहेत. सर्जक शक्तीला आम्ही 'चार्ज' म्हणतो. त्याला पुरुषार्थ म्हणत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** भावालाच पुरुषार्थ म्हटले जाते ना? आपला खरा भाव जाणणे, स्वभावाला त्याच्या गुणांनी जाणणे, हाच पुरुषार्थ आहे ना?

**दादाश्री :** भाव-अभाव हे सर्व भोवऱ्याचे आहेत. आणि आपल्याला तर स्वभाव-भाव आहे. भाव-अभाव ती सर्व कर्मे आहेत. आणि स्वभाव-भावात तर ज्ञाता-द्रष्टा आणि परमानंद असतो. आपले महात्मा स्वभाव-भावात राहत असतात, म्हणून त्यांच्या आतमध्ये आनंदच असतो, पण ते आनंद चाखत नाहीत. चाखायची वेळ आलेली असते, तेव्हा ते एखाद्या हॉटेलात गेलेले असतात, म्हणून त्याची त्यांना जाणीवच होत नाही.

**प्रश्नकर्ता :** तर महात्मा ते कोणत्या लक्षणाने चाखतात? जाणल्याशिवाय चाखतात, ते पुरुषार्थ लक्षणाने की उदय लक्षणाने?

**दादाश्री :** पुरुषार्थ तर त्यांचा चालूच असतो, परंतु ते पराक्रमाच्या दृष्टीने चाखतात.

**प्रश्नकर्ता :** महात्म्यांना तर पराक्रम उत्पन्न झालेला नाही. म्हणजे याचा अर्थ असा आहे की त्यांचा पुरुषार्थ यथार्थ नाही.

**दादाश्री :** या सर्व महात्म्यांमध्ये पुरुषार्थ आहेच, पण ते अजून पराक्रम भावात आलेले नाहीत. काही जण सामायिक करून पराक्रम भावात येतात. पुरुष झाल्यावर पुरुषार्थ तर असणारच ना! तो तर स्वभाविकपणे असतो.

**प्रश्नकर्ता :** यात काही नियम नाही ना? कित्येकवेळा सामायिकसाठी बसतो पण तेव्हा (आत्म्याबरोबर) अजिबात तन्मयाकार होता येत नाही आणि अचानक रस्त्यात तन्मयाकार होऊन जातो, तेव्हा आनंदच आनंद वाटतो. तर असे कशामुळे होते? ते उदयानुसार होते का?

**दादाश्री :** हे पण उदयानुसार होते आणि ते पण उदयानुसार होते.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ पराक्रम भाव हा पूर्णपणे वेगळा आहे का?

**दादाश्री :** हो, पराक्रम भाव हा पूर्ण वेगळाच आहे. पराक्रमात स्वत:ला काहीच करायचे नसते. स्वत:चा भाव, पराक्रम भाव उत्पन्न होतो. म्हणून मग प्रज्ञा त्या भावानुसार सर्व करते.

**प्रश्नकर्ता :** पराक्रम भाव म्हणजे ज्ञाता-द्रष्टा भाव?

**दादाश्री :** पराक्रम भाव म्हणजे काय? 'मला पराक्रम भावात यायचे आहे' असा भाव त्यांना होत नाही. जे मूळ भाव आहेत ते भाव आणि पराक्रम भाव या वेगळ्या गोष्टी आहेत. हा 'अॅलर्टनेस' (दक्षता) आहे. मला 'अॅलर्टनेस'मध्यचे राहायचे आहे. असे ज्याने ठरवले आहे, त्याच्यासाठी प्रज्ञा सर्व व्यवस्था करते.

**प्रश्नकर्ता :** पराक्रम भाव म्हणजे स्ट्राँग (दृढ) निश्चय का?

**दादाश्री :** हो, आणि आपला निश्चय असलाच पाहिजे ना? मला स्वभावातच राहायचे आहे. काय व्हायचे ते होवो, मग अशा व्यक्तीला कोण थांबवील? मग प्रज्ञाशक्ती त्यात जास्त जोर लावील. तेव्हा आत अज्ञा शक्ती पण स्वत:चा जोर लावते, परंतु शेवटी अज्ञाशक्ती हरेलच कारण भगवंत यांच्या बाजूने आहेत.



# [ 28 ]

## 'पाहणे' आणि 'जाणणे' आहे जिथे, परमानंद प्रकट होतो तिथे!

**प्रश्नकर्ता :** शुद्धात्म्याचे लक्ष सतत राहत असते, पण तरीही मन 'डिप्रेस' (निराश) होते. त्याचे कारण काय?

**दादाश्री :** आपले ज्ञान तर काय सांगते की 'चंदुभाई'ला काय होत आहे ते पाहत राहा. दुसरा काही उपायच नाही ना? जास्त कचरा भरून आणला आहे, असे आपल्याला समजतेच ना?

**प्रश्नकर्ता :** त्यावेळी ज्ञेय-ज्ञाता असा संबंधच राहत नाही. आणि 'ह्या मन-वचन-काया यापासून मी वेगळाच आहे', असे (वेगळेपण) राहत नाही.

**दादाश्री :** जर ज्ञेय-ज्ञाता असा संबंध राहिला नसेल, तर तुला कळणारच नाही की हे चंदुभाईला होत आहे. ते कुणाला कळले? म्हणजेच तुला अगदीच वेगळेपण राहत आहे. एक एक मिनिटाचे सर्व काही कळते.

**प्रश्नकर्ता :** पण मग कळल्यावर ते बंद व्हायला पाहिजे आणि परत आत्म्याकडे वळायला पाहिजे ना?

**दादाश्री :** वळवल्याने वळेल असे नसते. तुम्हाला काय असे वळवता येते का?

**प्रश्नकर्ता :** तर मग दादा, या प्रकारे 'मशिनरी' चुकीच्या रस्त्यावर चालतच राहील आणि आपण काय फक्त पाहतच राहायचे?

**दादाश्री :** दुसरे आपण काय करणार? बरोबर रस्ता आणि चुकीचा रस्ता, दोन्हीही रस्तेच आहेत, त्यांना पाहतच राहायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** पण चुकीच्या रस्त्यावर संपूर्ण जन्म वाया जाईल ना?

**दादाश्री :** पण त्यात अशी चिडचिड करून काय होणार? ते 'पाहत राहणे' हाच पुरुषार्थ आहे. पुरुषार्थ म्हणजे काय हे न समजल्यामुळे तुम्ही अडकून पडता. हे फक्त 'सफोकेशन' (घुमसट) आहे.

**प्रश्नकर्ता :** शेवटी या सगळ्यांचा वीट येतो. हे सर्व असे का होत आहे, असे वाटते.

**दादाश्री :** वीट आला तर चंदुभाईला येईल. 'तुम्हाला' थोडेच येणार आहे? आणि तुम्ही चंदुभाईला रागावायचे, आणि संध्याकाळी त्याच्याकडून प्रतिक्रमण करून घ्यायचे.

आत्म्याचा स्वभाव असा आहे की जाणण्यात काहीच बाकी राहत नाही. काय काय झाले हे सर्व तो जाणतो! ही बाहेरची माणसे मला आज असे होत आहे, तसे होत आहे अशी तक्रार घेऊन का येत नाही?

**प्रश्नकर्ता :** त्यांना समाधी राहत असेल?

**दादाश्री :** आत्मा प्रकट झालेलाच नाही तिथे समाधी कशी असेल? जिथे अहंकारच काम करत असतो तिथे आत्मा प्रकटच नसतो. तुमचा आत्मा तर प्रकट झाला आहे! म्हणून तुम्हाला हे सर्व समजते. नाही तर इतर कोणी असे का बोलत नाही?

**प्रश्नकर्ता :** तर मग स्वतःचा परमानंद, स्वतःचे अनंत सुख, हे जाताच कामा नये ना?

**दादाश्री :** पण हे अंतराय येतात, त्यामुळे सुख जाते.

**प्रश्नकर्ता :** कोणते अंतराय, दादा?

**दादाश्री :** व्यापारासाठी तू बाहेर जातोस, तिथे चंदुभाई काय काय करतो, ते 'तू' चांगल्या प्रकारे 'पाहत' नाहीस, म्हणून सर्व तुटते. जर सर्व काही पद्धतशीर होत असेल, तर मग असे काही होत नाही.

**प्रश्नकर्ता :** 'पाहत' नाही म्हणजे काय?

**दादाश्री :** तू त्याला 'जाणतोस' पण 'पाहत' नाहीस ना!

**प्रश्नकर्ता :** मी 'जाणले' आणि 'पाहिले', तर मग काय होईल?

**दादाश्री :** 'जाणणे' आणि 'पाहणे' या दोन्ही गोष्टी जेव्हा एकत्र होतात तेव्हा परमानंद होतो.

**प्रश्नकर्ता :** 'जाणणे' आणि 'पाहणे', ते कशा प्रकारे होते?

**दादाश्री :** तुला पूर्ण चंदुभाई दिसतील. 'चंदुभाई काय करत आहेत' ते सर्व दिसेल. चंदुभाई चहा पीत आहेत ते दिसेल, दूध पीत आहेत ते दिसेल, आणि रडत असतील तरी ते दिसेल. राग आला असेल तर तेही दिसेल, चिडत असतील तर तेही दिसेल. नाही दिसणार का? आत्मा सर्व काही पाहू शकतो. पण सध्या 'जाणणे' आणि 'पाहणे' ह्या दोन्ही गोष्टी एकदम होत नाहीत, म्हणून तुला परमानंद मिळत नाही.

**प्रश्नकर्ता :** 'जाणणे' आणि 'पाहणे' ह्या दोन्ही गोष्टी (एकदम) कशा प्रकारे होऊ शकतात?

**दादाश्री :** त्याचा जर आपण अभ्यास (सराव) केला, तर जमेल. प्रत्येक बाबतीत उपयोग राखू, घाईगडबड आणि धांदरटपणा केला नाही तर! कदाचित गर्दी असलेल्या गाडीत चढताना कधी चूक झाली आणि 'पाहणे' जमले नाही तर तेवढे लेट गो करू. पण इतर सर्व ठिकाणी तर उपयोग राहू शकतो ना?

## परमात्मयोगाची प्राप्ती

**प्रश्नकर्ता :** दादा, तुमचे 'ज्ञान' प्राप्त झाल्यावर माया त्रास देते, तिला हटवा ना?

**दादाश्री :** 'स्वरूप ज्ञान' प्राप्त झाल्यावर माया कधी येतच नाही. नंतर माया उभीच राहत नाही. पण तुम्हीच तर तिला बोलावता, 'मावशी, इकडे ये, मावशी इकडे ये!'

**प्रश्नकर्ता :** तुम्ही मायाला मारून टाका ना?

**दादाश्री :** मी मारायला येऊ की तुम्हीच मारायचे असते? मला तर तुमचे अमुकच सांभाळायचे आहे. बाकी सर्व तर तुम्हीच सांभाळायचे आहे. आता तुम्ही पुरुष झाला आहात आणि पुरुष झाल्यानंतर पुरुषार्थात आला आहात. पुरुष झाल्यावर माया येईलच कशी? जर तुम्ही एका तासाचा योग सुरु केलात तर सर्व जग अगदी हलू लागेल, असा योग मी तुम्हाला दिला आहे! संपूर्ण ब्रह्मांड हलेल, असा योग मी तुम्हाला दिला आहे! पण अशा योगाचा तुम्ही उपयोगच केला नाही तर काय होणार?

**प्रश्नकर्ता :** ब्रह्मांड हलत नाही, पण मी मात्र हलतो.

**दादाश्री :** हा योग हातात आला तर कोणीही त्याला सोडणार नाही, एका तासात तर काहीचे काही उडवून देईल!

**प्रश्नकर्ता :** आजपर्यंत मला असे वाटे की कधी तरी दादा स्वतःच मला सांगतील, म्हणून मी काही बोलतच नसे.

**दादाश्री :** दादाजी सर्व काही करतात, पण ते तर एखादा खूपच कमकुवत झाला असेल तर मग तिथे रक्षण ठेवावे लागते. नाहीतर याचा अंतच येणार नाही ना! दादांना खूप कामे करावयाची असतात. दादांना संपूर्ण दिवस योग करावा लागतो. अमेरिकेत फिरावे लागते, इंग्लंडमध्ये फिरावे लागते. दिवस-रात्र फिरावे लागते. संपूर्ण जगावर योग चालू

आहे. साऱ्या जगात शांती पसरली पाहिजे. धर्माची गोष्ट तर जाऊ द्या, पण शांती तर झालीच पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** आमचा तर जिथे (पुरुषार्थ) करायला नको, तिथे होतो आणि जिथे करायला हवा तिथे होत नाही.

**दादाश्री :** तिथेच पुरुषार्थ आहे. पुरुष झाल्यानंतर पुरुषार्थ का होत नाही? आता दिशाभूल होता कामा नये. आता फक्त एकच दिशा, बस पुरुषार्थ, पुरुषार्थ आणि पुरुषार्थ!

अनंत शक्ती व्यक्त होतील असा योग दिला आहे. म्हणून घरी जाऊन जोरदार पुरुषार्थ करा. बाकी सर्व मच्छरांना सांगा, 'गेट आउट, नॉट अलाउड!' (चालते व्हा, इथे परवानगी नाही.)

संपूर्ण ब्रह्मांड हलेल अशी शक्ती आतमध्ये भरेलेली आहे. मी स्वतः पाहिली आहे. म्हणून तर मी हे उघड केले. परंतु तुम्ही कोणत्या लालचमध्ये अडकून पडला आहात? कशाला? सर्व ब्रह्मांड जरी समोर आले तरी पण त्याची लालच का असावी? रात्रं-दिवस चांगल्या प्रकारे योग साधा, आता झोप कशी लागते? आता संपूर्ण योग करा. दहा लाख वर्षात सहजासहज योग प्राप्त झाला आहे, बायको-मुलांसह, कपड्या-लत्त्यांसह! पुन्हा पुन्हा असा योग प्राप्त होईल असे नाही. हा काही असा तसा योग नाही! हा तर परमात्मयोग आहे!

खूपच जागृतीची गरज आहे, संपूर्ण जागृती! जागृतीवरही जागृती, की जी अंतिम प्रकारची जागृती आहे, ती आपल्या इथे आहे! जग जिथे जागे असते तिथे आपण झोपले पाहिजे. आपण जिथे जागे आहोत तिथे जग झोपलेलेच आहे. केवळज्ञान म्हणजे संपूर्ण जागृती! किंचितही उणीव नाही, अशी जागृती! बस फक्त जागृतीचीच गरज आहे. जेवढी जागृती वाढली तेवढा तो केवळज्ञानाच्या जवळ आला. जागृतीत स्वतःचे सर्वच दोष दिसतात, परंतु जर स्वतः पूर्ण निष्पक्षपाती झाला असेल तरच! स्वतः शुद्धात्मा झाला म्हणजे निष्पक्षपाती झाला. 'मी चंदुभाई आहे' असे असेल तर तिथे पक्षपात आहे. स्वतःच

वकील, स्वतःच न्यायाधीश आणि स्वतःच आरोपी! मग निकाल कसा येईल?

**प्रश्नकर्ता :** मी तर असे ठरविले आहे की मला आता चिंता करायची काय गरज? दादांची छत्रछाया आहे ना, मग कसली चिंता?

**दादाश्री :** यामुळे तर सर्व कषाय घुसतील! त्यांना वाटेल की या इथे पोकळ आहे. आता मी तुम्हाला पुरुष बनवले आहे. जोपर्यंत पुरुष बनवलेले नाही, तोपर्यंत दादा आहेत. आता तर तुमच्या हातात पुरुषार्थ दिला आहे. कधी तरी अडचणीच्या वेळी दादा हजर होतील, पण रोज रोज हजर होणार नाहीत.

हा परमात्मयोग तुम्हाला दिला आहे. आता परत तो चुकवू नका. कुठल्याच जन्मात मिळणार नाही, असा हा योग आहे. या जन्मातच योग जुळला आहे. हे या काळातील अकरावे आश्चर्य आहे! तुमच्या पुण्याईमुळे तुम्हाला योग जुळून आला आहे, ज्यामुळे तुम्ही वरपर्यंतचे पाहिले आहे, काही हद्दीपर्यंतचे तर तुम्ही सर्व काही पाहिले आहे. तुम्ही काय काय पाहिले आहे, ते तुमच्या लक्षात आहे ना?

**प्रश्नकर्ता :** हो, आहे.

**दादाश्री :** आणि ही भट्टी तर होतीच ना? कधी नव्हती? हे खरकटे तर आहेच ना?

**प्रश्नकर्ता :** शुद्धात्मा झाल्यावरदेखील त्याला दबाव का घेरतात?

**दादाश्री :** हा जो शुद्धात्मा प्राप्त झाला आहे, तो जर तुमच्या सर्व कर्मांचा निकाल केल्यानंतर मिळाला असेल तर मग आत काही घुसणार नाही. पण इथे तर तुमची न संपविलेली कर्मे हजर आहेत, आणि हे प्राप्त झाले आहे. म्हणून मी काय म्हणतो की आता हे प्राप्त झाल्यानंतर कर्मांचा निकाल करा पटापट. ही सगळी उधारी पटकन संपवून टाका. नाही तर आत्मा, शुद्धात्मा प्राप्त झाल्याशिवाय उधारी संपेल असा काही मार्ग नव्हताच. म्हणजे हे तर दिवाळखोर झालेल्याला

सावकार बनायचे आहे, ही उधारी खूप मोठी आहे. आणि जे आता भटकतील ते मग 81000 वर्षे भटकत राहतील. म्हणून तर आम्ही तुम्हाला उचलून घेत आहोत. आता ज्या ज्या कुणाला हा योग प्राप्त झाला आहे, त्या प्रत्येकाने (मोक्षाचे) काम करून घ्यावे. नाही तर हा स्लीप काळ आहे, घसरणारा काळ आहे. तुमची अपार उधारी असताना देखील तुम्हाला जागृत केले आहे. तुम्हाला जागृती असते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, असते.

**दादाश्री :** त्या जागृतीच्या उच्चतम शिखरावर बसून पाहायला हवे. आतमध्ये काहीही हलले तर लगेच कळते की काय हलले? आणि ते आपल्या हिताचे आहे की आपल्या विरोधाचे आहे, ते ताबडतोब समजायला हवे.

संपूर्ण जग उघड्या डोळ्यांनी झोपलेले आहे. कारण जग कशात जागृत आहे? पैशात जागृत आहे, विषयात जागृत आहे. संपूर्ण जग ताळमेळ बसवत बसवत आता थकून गेले आहे. पण काहीही निष्पन्न होत नाही. म्हणून मी तुम्हाला सांगतो की सर्व काही 'व्यवस्थित' आहे. म्हणजेच तुमचा हिशोब आहे. त्याला कोणी बदलू शकत नाही. म्हणून ताळमेळ बसवायचा प्रयत्न करू नका. तुम्ही तुमचे काम करत राहा. 'व्यवस्थित' तुम्हाला सर्व प्रकारे मदत करीत राहील.

आता माया मात्र दूर राहिली पाहिजे. माया घुसता कामा नये. ती तुम्हाला लहान-लहान गोष्टी देऊन अजगरासारखी गिळून टाकते. जेव्हा एखादी मोठी घटना घडते, तेव्हाच फक्त तुम्ही शुद्धात्म्यात शिरतात. म्हणजेच सर्व बाबतीत जागृती राहायला हवी, यात चूक झालेली चालणार नाही.

**प्रश्नकर्ता :** परंतु दादा, परत वाट चुकता कामा नये ना?

**दादाश्री :** वाट चुकता कामा नये. पण माया अजून त्याला त्रास देत राहते. माया कधीपर्यंत त्रास देते? तीन वर्षापर्यंत. आता ही क्रोध-

मान-माया-लोभ रूपी माया तीन वर्षे अंडरग्राऊन्ड (भूमिगत) राहू शकते, आणि उपाशी राहू शकते असे आहे. आम्ही त्याच्या हातातील सत्ता समाप्त करून ती तुमच्या हातात दिली आहे, म्हणून ते सर्व आता अंडरग्राऊन्ड झाले आहेत. आणि ते पुन्हा परत येण्याची तयारी करत राहतील. म्हणजे तीन वर्षांपर्यंत हा योग जमू शकतो. दादांपासून दूर गेला नाही तर ते परत घुसू शकणार नाहीत, निघून जातील. मग सेफ साइड होईल! तेव्हा मग आमच्या आज्ञेत सहज राहता येईल. हे असे का होते ते आम्हाला माहीत आहे, म्हणून आम्ही तुम्हाला अगोदरच सावध राहायला सांगतो.

**प्रश्नकर्ता :** दैवीशक्ती आणि आसुरीशक्ती, दोन्ही नेहमी लढतच राहतात का?

**दादाश्री :** हो, त्या लढतातच. परंतु त्यात तुम्हाला कृष्णाप्रमाणे काम केले पाहिजे, सांगायचे की मी तुझ्या बाजूला आहे.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही आम्हाला सुदर्शन द्या ना?

**दादाश्री :** सुदर्शन तर तुम्हाला दिलेलेच आहे. एका बोटावरचे नाही, तर सर्व दहा बोटावरचे दिले आहे. ते एका तासातच सर्व काही कापून पूर्ण कौरववंशाचा नाश करू शकेल असे आहे!

## मूळ पुरुषाची महत्ता

**प्रश्नकर्ता :** एखाद्या योग्य व्यक्तीला तुम्ही तुमच्या शक्ती देऊन जाल ना?

**दादाश्री :** पण त्या आधारावर काय आपण बसून राहायचे? ते देऊन जातील, त्याऐवजी तर जोपर्यंत आम्ही आहोत तोपर्यंत तुम्ही तुमचे काम उरकून घ्या ना? नंतरचे वारस तर 'इन्टेलेजेंशिया' (बुद्धीवाले) असतात. ते मूळ गोष्ट मागे-पुढे करतात. म्हणून जोपर्यंत मूळ पुरुष आहेत तेव्हा त्यांच्या हजेरीत काम आटपून घ्यावे, आणि त्यासाठी संसार एका बाजूला ठेवून द्यायला हवे!

असे 'रियल' क्वचितच कधी असते, तिथे संपूर्ण पद प्राप्त होते. तिथे खरे स्वातंत्र्य प्राप्त होते. परमात्मा पण उपरी नाही, असे स्वातंत्र्य प्राप्त होते.

पुरुष झाल्यानंतरचा पुरुषार्थ म्हणजे एकदा डरकाळी फोडली की कितीतरी सिंह आणि सिंहिणी पळून जातील! पण इथे तर कुत्र्याची पिल्ले देखील तोंड चाटून जातात!

आम्ही ज्ञान देतो, मग वास्तविकता 'ओपन' (उघड) होते. मग तुम्ही पुरुष बनता. मग तुम्हाला 'मी परमात्मा आहे' असे भान होते. आम्ही पापे भस्मीभूत करून टाकतो, दिव्यचक्षू देतो, म्हणून मग सगळ्यांच्यात परमात्मा दिसतो! आणि मग असे पद दिल्यानंतर परमात्मयोग दिल्यानंतर, तुम्हाला पाच आज्ञा देतो.

अर्थात तुम्ही परमात्मपद, परमात्मसुख सर्व काही पाहिले आहे. ते तुमच्या लक्षात आहे, तोपर्यंत तुम्ही परत अस्सल स्टेजवर याल. तेव्हा आता असा योग जमवा. आणि संसाराचे तर जे व्हायचे ते होईल. सर्व काही 'व्यवस्थित'च्या ताब्यात सोपवून द्यायचे. आणि वर्तमान योगातच राहायचे. भविष्य तर 'व्यवस्थित'च्या ताब्यात आहे.

## स्थूल पार करा, सूक्ष्मतममध्ये प्रवेश करा

**प्रश्नकर्ता :** तुमच्या गैरहजेरीत एकाग्रता मागे-पुढे होऊन जाते, तेव्हा काय करावे?

**दादाश्री :** जोपर्यंत दादा स्वतः आहेत, तोपर्यंत ते स्थूल आहे. स्थूलमधून सूक्ष्मात जायला हवे. स्थूल तर मिळाले पण आता सूक्ष्मात जायला हवे, आणि दादा हजर नसतील तेव्हा तर सूक्ष्माचाच प्रयोग सुरू करायला हवा आणि हा सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतममध्ये जाण्याचा प्रयोग करायला हवा. आणि मागे-पुढे तर होतच नसते. रोज रोज हीच रेकॉर्ड वाजवणे, हे काय चांगले आहे का?

हा जो परमात्मयोग मी तुम्हाला दिला आहे, त्या योगातच शक्य

तितका वेळ राहा. तुम्ही स्वतः परमात्मा व्हाल असा योग दिला आहे. त्यात कोणीही अडवू शकणार नाही आणि संसाराचे सारे रामायण पूर्ण होईल, अठरा व्यूह-रचना असलेले युद्ध तुम्ही जिंकाल. कारण शुद्धात्मा हेच कृष्ण आहेत, आणि तेच जिंकवणारे आहेत.

आमच्या आज्ञा म्हणजेच 'आम्ही' आहोत, 'आम्ही स्वतः'च आहोत. आमच्या पाच आज्ञेत राहायचा प्रयत्न करा.

## मोक्षस्वरूप तुमच्या समोर आले आहेत

कोट्यावधी अवताराने देखील प्रकट होणार नाही असे हे 'एक्सपर्ट' मिळाले आहेत, म्हणून इथे तुमचे काम होऊन जाईल. 'मी' 'केवळज्ञानात' नापास झालो, म्हणून तुमच्या कामी आलो, मॉनिटर म्हणून!

हे तुमचेच तुम्हाला देत आहे. ज्ञान तर तुमचेच आहे. माझे नाही. मी तर मध्ये केवळ निमित्त आहे. हे तुमचे 'स्वतः'चेच ज्ञान आहे. आता हा जो गारवा वाढत आहे, तो पण तुमचाच आहे. जागृती वाढत जाईल, ती पण तुमचीच! ही मी दिलेली जागृती नाही. हे सर्व तुमचेच आहे!

ही 'थिअरी ऑफ ॲब्सोल्युटिझम' आहे! ती तुम्हाला समजत आहे का? समजत नसेल तर नाही म्हणा. आम्हाला घाई नाही. आपण समजून घेण्यासाठीच इथे बसलो आहोत. आपण काही 'थिअरी' 'ॲडॉप्ट' करण्यासाठी बसलेलो नाही. तुम्ही स्वीकारलीच पाहिजे अशी ही थिअरी नाही! 'खरी गोष्ट' समजली तर तीच आपली थिअरी!

**- जय सच्चिदानंद**

# मूळ गुजराती शब्दांचे समानार्थी शब्द

| | |
|---|---|
| *शाता* | : सुख परिणाम |
| *अशाता* | : दुःख परिणाम |
| *पुद्गल* | : ज्याची निर्मिती आणि नाश होते ते |
| *पूरण*–गलन | : चार्ज होणे–डिस्चार्ज होणे |
| *लागणी* | : भावुकता असलेले प्रेम, आपुलकी |
| *निकाल* | : निपटारा |
| *उपरी* | : मालक, वरिष्ठ |
| राजीपा | : गुरुजनांची कृपा आणि प्रसन्नता |
| *अजंपा* | : बेचैनी, अशांती, भीती |
| *निर्जरा* | : आत्मप्रदेशातून कर्मे वेगळी होणे |
| *गारवरस* | : सांसारिक सुखाच्या गारव्यात पडून राहायची इच्छा |
| *गुंठाणा* | : 48 मिनिटे, गुणस्थानक |
| *वळगण* | : बंधन, बला, भूतावेश |
| *अटकण* | : जी पुढे जाऊ देत नाही, अडकवून ठेवते |
| *तंतीली वाणी* | : बोचणारी वाणी |
| *उद्दीरणा* | : भविष्यात फळ देणाऱ्या कर्मांना त्यांच्या वेळेपूर्वी बोलावून ती संपविणे |
| *गुदगुल्या* | : वृत्तींसाठी लालच उचंबळून येणे |

# प्रतिक्रमण विधी

प्रत्यक्ष 'दादा भगवानांच्या' साक्षीने देहधारी...... (ज्याच्या प्रती दोष झाला असेल त्या व्यक्तीचे नाव) च्या मन-वचन-कायेचे योग, भावकर्म, द्रव्यकर्म, नोकर्माहून भिन्न असे हे शुद्धात्मा भगवान! आपल्या साक्षीने, आजच्या दिवसापर्यंत माझ्याकडून जे जे ★★ दोष झाले आहेत, त्यांची क्षमा मागत आहे, हृदयपूर्वक खूप पश्चात्ताप करीत आहे. मला क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा. आणि पुन्हा असे दोष कधीही करणार नाही, असा दृढ निश्चय करीत आहे, त्यासाठी मला परम शक्ती द्या.

★★ (आयुष्यभरात क्रोध-मान-माया-लोभ, विषय-विकार, कषाय इत्यादीपासून त्या व्यक्तीला जे जे दु:ख दिले गेले असेल, त्या सर्व दोषांना मनात आठवावे.)

# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तके

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
10. भावना सुधारे जन्मोजन्म
11. कर्माचे विज्ञान
12. पाप-पुण्य
13. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
14. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
15. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
16. मानव धर्म
17. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
18. सेवा-परोपकार
19. दान
20. त्रिमंत्र
21. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
22. चमत्कार
23. सत्य-असत्याचे रहस्य
24. वाणी, व्यवहारात (सं)
25. पैशांचा व्यवहार (सं)
26. क्लेश रहित जीवन
27. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
28. प्रेम
29. गुरू-शिष्य
30. अहिंसा
31. आप्तवाणी-1 ते 6
36. आत्मसाक्षात्कार
37. जगत् कर्ता कोण?
38. कर्माचा सिद्धांत

## हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1 से 3)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)
57. आप्तवाणी - 12 (पू)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

**★ दादा भगवान फाउन्डेशनद्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेतसुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहेत. वेबसाइट www.dadabhagwan.org वरसुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता.**

**★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि इंग्रजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित होत आहे.**

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार

**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन :** +91 79 3500 2100, +91 9328661166/77
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **दिल्ली** | : | 9810098564 | **बेंगलूर** | : | 9590979099 |
| **कोलकता** | : | 9830093230 | **हैदराबाद** | : | 9885058771 |
| **चेन्नई** | : | 7200740000 | **पूणे** | : | 7218473468 |
| **जयपुर** | : | 8890357990 | **जलंधर** | : | 9814063043 |
| **भोपाल** | : | 6354602399 | **चंडीगढ** | : | 9780732237 |
| **इन्दौर** | : | 6354602400 | **कानपुर** | : | 9452525981 |
| **रायपुर** | : | 9329644433 | **सांगली** | : | 9423870798 |
| **पटना** | : | 7352723132 | **भुवनेश्वर** | : | 8763073111 |
| **अमरावती** | : | 9422915064 | **वाराणसी** | : | 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 795-92-DADA (3232)

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 402179706

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 91457800

**www.dadabhagwan.org**

## आप्तवाणी, सर्व धर्मांचे सार!

आप्तवाणीची ख्याती दिवसेंदिवस खूपच वाढेल. साऱ्या जगातील खुलासे यातून मिळतील. सर्वच धर्म यातून प्राप्ती करतील, म्हणजेच ह्या आप्तवाणींमधून हेच लोक तत्त्व काढून घेतील, याचीच गरज आहे.

आप्तवाणी वाचून तर अनेक लोक म्हणतात की आता आम्हाला आणखी कोणती धार्मिक पुस्तके वाचण्याची गरज उरणार नाही. म्हणजेच ह्या आप्तवाणींनीच सर्व काही चालेल. आपली ही पुस्तके लोकांना खूप मदत करतील.

म्हणूनच मी सर्वांना सांगितले आहे की ही पुस्तके छापून घ्या. एकदा छापली गेली ना, तर आता यावरून लोक आणखी छापतील. पण आता हे हरवणार नाही. ह्या गोष्टी आता हरवणार नाहीत.

- दादाश्री

आत्मविज्ञानी 'ए.एम.पटेल' यांच्या आत प्रकट झालेल्या

# दादा भगवानना असीम जय जयकार हो



dadabhagwan.org



Printed in India

Price ₹ 150